






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्धारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

अंक २१९

ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर १९८१

संपादक : आनंद यादव



अनुक्रमणिका



महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती-मंडळ पुरस्कृत
महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

संपादक

आनंद यादव



संपादन समिती

व. दि. कुलकर्णी
न. म. जोशी
वसंत सावंत

सल्लागार

गो. म. कुलकर्णी
द. ता. भोसले

ऑक्टोबर १९८१
ते
डिसेंबर १९८१

अंक क्रमांक
२१९

मूल्य पाच रुपये

मुद्रक

चिं. स. लाटकर
कल्पना मुद्रणालय, पुणे ३०

प्रकाशक

न. म. जोशी
कार्यवाह, म. सा. परिषद, पुणे ३०

अनुक्रमणिका





# अनुक्रमणिका

२७६



★

# संपादकीय

स्नेहपूर्वक नमस्कार —

प्रस्तुतचा अंक हा प्रामुख्याने संशोधन क्षेत्राला व त्यातील अनुभवांना वाहिलेला अंक आहे. डॉ. वसंत स. जोशी हे ' भाषा व साहित्य : संशोधन ' या ग्रंथाची जुळवाजुळव करीत असता काही थोर संशोधकांचे आपल्या संशोधनक्षेत्रांतील अनुभव त्या ग्रंथात मार्गदर्शक ठरतील असे त्यांना वाटले. पण काही अडचणींमुळे त्यांना ते प्रत्यक्ष ग्रंथात घेता आले नाहीत. तेच पहिले पाच लेख या अंकात आपणांस दिसतील. याशिवाय डॉ. रा. चिं. ढेरे यांची एक दीर्घ मुलाखत वरील विषयाच्या अनुषंगाने घेण्याची योजना आखली होती. पण त्यांच्या आजारपणामुळे ती प्रत्यक्षात आकाराला येऊ शकली नाही. कै. शंकरराव देव यांच्या अनुभवांचा संपादित लेख डॉ. वसंत जोशी यांनी तयार केला आहे. कै. म. म. डॉ. दत्तो वामन पोतदार यांच्या अनुभवांवर आधारित लेखही त्यांच्याशी वेगवेगळ्या बैठकींत ( डॉ. वसंत जोशी यांच्याशी ) झालेल्या चर्चेतून सिद्ध झाला आहे. महामहोपाध्यायांचा हा अखेरचाच लेख असल्याने त्याचे मोल विशेष आहे. बाकीचे तीन लेख त्या त्या लेखकांनी लिहिले आहेत. त्यांचे आणि डॉ. वसंत जोशी यांनी ते उपलब्ध करून दिल्याबद्दल त्यांचे पत्रिकेतर्फे मनःपूर्वक आभार मानले पाहिजेत.

डॉ. कामतकर आणि डॉ. सौ. नावडीकर यांचे दोन लेख प्रत्यक्ष संशोधन-लेखाचे दोन नमुने म्हणून पाहता येतील. ' समर्थांची काव्य शैली ' हा प्रा. परांजपे यांचा लेख समर्थ रामदासांच्या तिसऱ्या जन्मशताब्दीनिमित्त योजलेला आहे. या प्रकारचे इतर अपेक्षित लेख काही कारणांमुळे येऊ शकले नाहीत. महात्मा जोतिराव फुले यांच्या ' शेतकऱ्याचा असूड ' या पुस्तकाला या वर्षी बरोबर शंभर वर्षे झाली. त्या निमित्ताने म. फुल्यांच्या एकूण साहित्यावर एका वेगळ्या, अनोख्या अंगाने प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केलेला आहे. ' जनसाहित्याची भूमिका ' ही म. सा. पत्रिकेच्या जाणकार वाच-कांना मुद्दाम परिचय करून देण्यासाठी योजलेली आहे. ही नवीन वाङ्मयीन चळवळ

अनुक्रमणिका

विदर्भात मूळ धरू लागलेली आहे. वर्तमान वाङ्मयीन वास्तवाचे भान पत्रिकेच्या डोळस वाचकांना व अभ्यासकांना असावे म्हणूनच प्रा. वडस्कर आणि श्री. शरद फटांगरे यांचे लेख देण्यात आलेले आहेत. परीक्षणाचा नेहमीचा भाग आहेच.

आक्टोबर ते डिसेंबरच्या तिमाहीत दोन महत्त्वाची मराठी साहित्य संमेलने झाली. 'शासन आणि साहित्यिक' यांचे परस्पर संबंध कोणत्या प्रकारचे असावेत; या मूळ प्रश्नाच्या प्रेरणेतून मुंबईचे साहित्य संमेलन भरले गेले आणि अखिल भारतीय पातळीवरचे ५६ वे मराठी साहित्य संमेलन रायपूर (मध्य प्रदेश) येथे भरले गेले. दोन्हीही संमेलने अनेक कारणांनी गाजली गेली आणि एकमेकांना पूरक-पोषकही ठरली गेली. मराठी साहित्य–विश्वाला या तिमाहीत नवचैतन्य प्राप्त झाल्यासारखे वाटत होते, जणू नवउत्साहाचे भरतेच आले होते. अशाच उत्साहानिशी व तळमळीनिशी या संमेलनात वर्तमान मराठी साहित्य–सृष्टीतील नवप्रवृत्तींविषयी अभ्यासू वृत्तीने आणि कसदार ऊहापोह झाला असता तर 'साहित्य संमेलन' हे नाव अधिक अर्थपूर्ण ठरले असे वाटल्यावाचून राहिले नसते.

स्नेहांकित

**आनंद यादव**

अनुक्रमणिका

# मूक प्रतिभावंतांचे स्वागत

मराठी साहित्यातली एक अत्यंत स्वागतार्ह घटना ही की पूर्वी जे मूक होते ते आता शिक्षण मिळाल्यामुळे लिहू लागले आहेत. आपले अनुभव साहित्यात व्यक्त करू लागले आहेत. त्यातले अनेक आपल्या बोलीभाषांत लिहितात. साहित्याच्या क्षेत्रात बोलीभाषा अस्पृश्य आहेत अशी भूमिका पूर्वीदेखील क्वचितच कोणी घेतली असेल. त्यांचे स्वागत करायला पूर्वीही अनेक साहित्यिक तयार होते. परंतु त्या भाषांत तेव्हा लिहिले जात नव्हते. आता लिहिले जात आहे. त्यामुळे मराठी साहित्य व त्याची भाषा समृद्ध होत आहे.

पूर्वी परिस्थितीमुळे जे मूक होते त्यांना सुरुवातीला या सामाजिक बांधिलकीच्या तत्त्वज्ञानाचे आकर्षण वाटावे हे स्वाभाविक होते, नव्हे ते आवश्यकच होते. पण त्या काळातही त्यांच्यातले जे प्रतिभावंत होते, त्यांना त्यांच्या प्रतिभेने या तत्त्वज्ञानाच्या सापळ्यात पूर्णपणे अडकू दिले नाही. आणि आता तर या सामाजिक बांधिलकीच्या विपर्यस्त तत्त्वज्ञानाच्या आहारी गेले म्हणजे साहित्यात फारच तोचतोचपणा आणि बटबटीतपणा येतो हे त्यांना जाणवले आहे. त्यामुळे तोंडाने जरी ते सामाजिक बांधिलकीचा उद्‌घोष करीत असले, तरी प्रत्यक्षात अधिकाधिक जाणत्या कुतूहलाने जीवनाकडे पाहू लागले आहेत. केवळ विद्रोही कविता लिहून त्यांचे आता समाधान होत नाही. आता निरनिराळ्या गद्य साहित्यप्रकारांकडे ते वळत आहेत. प्रांजळ आत्मकथा लिहीत आहेत. केवळ घोषणांतून, जीवनाविषयींच्या सर्वसामान्य भेदक विधानांतून गद्य निर्माण होऊ शकत नाही. केवळ संतापाच्या ऊर्मीवर स्वार होऊन गद्य लिहिता येत नाही. त्यांत मानवी व्यवहारांचा, स्वभावविशेषांचा, व्यक्तिमत्त्वाचा तपशील यावा लागतो. ह्या तपशिलाचे तपमान एकच नसते. तो ठरावीक आकारातच चपलख बसत नाही. त्याचा तोचतोचपणा अगर बटबटीतपणा नादाच्या ठसक्यात अगर संतापाच्या लोटांत छपविता येत नाही. या गोष्टींचा प्रत्यय या नव्याने साहित्याच्या क्षेत्रात प्रवेश करणाऱ्या साहित्यिकांना येत आहे. त्यामुळे त्यांच्या साहित्याला अधिक सच्चेपणा येत आहे. त्याला अधिक विविधता आणि संपन्नता प्राप्त होत आहे.

मात्र अजूनही वाटते की या वर्गातील व्यक्तीच्या कौटुंबिक जीवनात, समाजजीवनात आणि मनोरचनेत असे अनेक अनुभव आहेत की ज्यातून उत्कृष्ट साहित्य निर्माण होऊ शकेल. प्रतिभावंतांच्या नैसर्गिक कुतूहलाने फक्त या अनुभवाचा शोध घेतला पाहिजे.

**—गंगाधर गाडगीळ**

[ ५६ व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या
अध्यक्षीय भाषणातून ]

अनुक्रमणिका






अमृत-महोत्सवानिमित्त

## परिषदेचे सन्मान्य सभासद

अलौकिक विद्वत्ता अथवा मराठी भाषेची महनीय सेवा या गुणांसाठी कोणाही साहित्यिकास किंवा जीवनाच्या विविध क्षेत्रात महनीय कर्तृत्व दाखविलेल्या कोणाही व्यक्तीस, परिषदेचे सन्मान्य सभासद करून घेण्याची घटनेत तरतूद आहे. परिषदेच्या यंदाच्या अमृत महोत्सवाची पर्वणी साधून, कार्यकारी मंडळाने पुढील वयोवृद्ध-ज्ञानवृद्ध व्यक्तींना (त्यांची पूर्वसंमती घेऊन) सन्मान्य सभासद केले आहे. संस्थेच्या इतिहासात ही समुचित गोष्ट प्रथमच घडत असून या व्यक्ती सभासद असणे संस्थेला भूषणास्पद वाटत आहे.

श्री. **बाबा आमटे** (आनंदवन, वरोरा), श्री. **माधवराव बागल** (कोल्हापूर) श्री. **वि. अं. कानोले** (नांदेड), श्री. **सेतु माधवराव पगडी** (मुंबई), श्री. **विश्राम बेडेकर** (मुंबई), श्री. **सोपानदेव चौधरी** (मुंबई), श्री. **दि. गं. तथा राजा केळकर** (पुणे), श्री. **शं. रा. तथा मामा दाते** (पुणे), श्री. **ग. ह. खरे** (पुणे), पं. **महादेवशास्त्री जोशी** (पुणे), श्री. **ह. वि. मोटे** (पुणे)

■

# ' समर्थभक्त ' कै. शंकर श्रीकृष्ण देव यांचे संशोधनातील अनुभव

## संपादन – वसंत स. जोशी

---

धुळ्याच्या ' सत्कार्योत्तेजक सभा ' व ' श्रीसमर्थवाग्देवता मंदिर ' या संस्थांचे संस्थापक समर्थभक्त कै. श्री. शंकर श्रीकृष्ण देव हे प्राचीन मराठी साहित्याच्या, त्यातही रामदासी संशोधनाच्या क्षेत्रास संपूर्ण जीवित वाहून घेणारे थोर संशोधक होऊन गेले. ( जन्म स. १८७१, – मृत्यू स. १९५८ ). इतिहासाचार्य कै. वि. का. राजवाडे यांच्या प्रेरणेने व सहकार्याने त्यांनी प्राचीन मराठी साहित्याचे संशोधन व प्रकाशन सुरू केले. पुढे पुढे रामदासी मठांना भेटी देऊन तेथील हस्तलिखिते जमा करून त्यांचा व्यवस्थित संग्रह करण्यासाठी ' श्रीसमर्थ वाग्देवता मंदिर ' ही संस्था त्यांनी उभी केली. त्या वाङ्मयाच्या प्रकाशन व प्रसारासाठी ' आत्माराम छापखाना ' उभारून ' रामदास ' व ' रामदासी ' हे मासिक सुरू केले. राजवाडे यांचे संशोधनपर साहित्य प्रकाशित करण्यासाठी १९१६ मध्ये शंकररावांनी ' इतिहास व ऐतिहासिक ' या मासिकाचा प्रारंभ केला. धुळ्यातील राजवाडे, भास्करराव भट, गो. कृ. चांदोरकर, शंकरराव देव ह्या सर्व व्यक्ती संशोधनप्रिय, चिकित्सक व सार्वजनिक संस्थांची उभारणी व जोपासना करणाऱ्या अशा होत्या. ' सत्कार्योत्तेजक सभा ' ह्या संस्थेने त्यांच्याभोवती अशाच कित्येक व्यक्तींचा मेळावा उभा केला. कै. प्रा. कृ. पां. कुलकर्णी ह्यांनी ह्या सर्व मंडळींच्या सहवासाचे व संशोधनविषयक तळमळीचे आपल्या एका लेखात मार्मिकपणे वर्णन केले आहे. ते वाचले असता जशी रविकिरण मंडळासारखी कविमंडळे निर्माण होऊन मराठी काव्याला बहर आला व वेगळे वळण लागले, तशीच या संशोधकांच्या अनौपचारिक मेळाव्याची स्थिती होती, याची जाणीव होते. प्रा. कुलकर्णी आपल्या लेखात म्हणतात, " ( सत्कार्योत्तेजक ) सभेचे सर्व सदस्य संध्याकाळी एकत्रच फिरण्यास निघत. पांजरा नदीच्या काठी एकत्रच बसत. त्यांच्या चर्चा चालत, नवीन उपक्रम निघत, त्यांचे वादविवाद होत, वादात मतभेद उत्पन्न होत, त्यामुळे कधी रुसवे फुगवे होत. रामदास व इतर साधुसंत ह्यांच्या कार्यासंबंधी एकदा वाद झाला. त्याची पराकोटी झाली. राजवाड्यांनी त्यात एकांतिक व आग्रही मत प्रतिपादिले. चांदोरकर चिकित्सक खरे, पण किंचित भावनाप्रधान होते. ते त्या मताने दुखावले गेले. अबोला झाला, परंतु तितक्यास तितकाच. असे प्रसंग उद्भवत नाही असे नाही. परंतु त्यांनी कधी कायमची

वितुष्टता निर्माण झाली नाही. प्रत्येकाच्या कार्याचे महत्त्व प्रत्येकजण ओळखीत असे. प्रथम प्रथम राजवाडे, देव, चांदोरकर, भट हे चौघेच त्यात असत. कधीकधी जावडेकर, रणदिवे वगैरे मंडळीही येत. पुढे केशवराव ओगले, खुपेकरशास्त्री, निजसुरे, त्रिंबकराव कुलकर्णी व प्रस्तुत लेखकही कधी कधी त्या मंडळीत जाऊन मिळत. नदीकाठच्या ह्या गप्पा किंवा वाङ्मयीन चर्चा फार रंगत. ती एक वाङ्मयीन मेजवानीच असे. पुढे ज्या संस्था धुळयास स्थापिल्या गेल्या त्यांचे सर्व आराखडे पांजरा नदीच्या काठीच आखण्यात आले." ('महाराष्ट्र साहित्य पत्रिका' : वर्ष ३२ : अंक १२५, एप्रिल-मे-जून १९५८).

श्री. शंकरराव देवांनी रामदासी वाङ्मयाचे संशोधन, संग्रह व प्रकाशन हेच आपले जीवित ध्येय ठरविले. 'श्रीसमर्थ वाग्देवता मंदिरात' तीन-चार हजारांवर हस्तलिखितांचा संग्रह त्यांनी केला. जिव्हाळ्याने ओथंबलेले प्रासादिक लेखन व अस्खलित प्रभावी वक्तृत्व यांमुळे शंकररावांचा प्रभाव पडत असे. त्यांच्या व्यक्तित्वाचे 'उंचीपुरी यष्टी, सडपातळ, निर्मांस परंतु भरदार आणि ताठ शरीर, तेजस्वी गोरा चेहरा, चष्म्याच्या आतील पाणीदार डोळे, निश्चयी मुद्रा, ठाम, स्पष्ट, शुद्ध, सुटसुटीत बोलणे, पांढरा स्वच्छ अंगरखा, टिळक वळणाचे शुभ्र उपरणे, तितकेच शुभ्र नेसू धोतर व डोक्यावरील रुमाल' असे वर्णन प्रा. कुलकर्णी यांनी केले आहे.

'श्री रामदासी संशोधन : खंड १' ह्या ग्रंथात संशोधनाच्या पायपिटीत आलेले विलक्षण अनुभव व त्यातून काढलेले सिद्धांत त्यांनी सांगितले आहेत. हे सर्व रामदासोक्तीप्रमाणे 'आधी केले मग सांगितले' ह्या थाटाचे प्रचीतीचे बोलणे आहे. अज्ञात साधनांचा शोध हे संशोधनातील प्रारंभीचे कार्य त्यांनी मोठ्या निष्ठेने केले. ज्या ज्या स्थळांना भेटी दिल्या, तेथील अनुभव व परिस्थिती त्यांनी टिपून ठेविली. भावी पिढीतील संशोधकांना त्याचा लाभ व्हावा, त्यांचा मार्ग सुकर व्हावा, अशी त्यांची जिव्हाळ्याची भावना यामागे होती. देव, राजवाड्यांसारख्या संशोधकांनी ज्या काळात संशोधनकार्य केले, त्या काळात संशोधनाचे शास्त्र निर्माण झालेले नव्हते. या थोर संशोधकांनी या अज्ञात क्षेत्रात नव्या मळवाटा तयार केल्या आणि नंतरचे संशोधक त्या वाटेने वाटचाल करीत राहिले. तथापि असे संशोधन शास्त्र तयार व्हावे, अशी देवांची प्रामाणिक इच्छा होती. आजही त्यांनी भेटी दिलेल्या स्थळांना संशोधकांनी पुनर्भेटी देऊन उर्वरित साहित्याचा शोध घेतल्यास बरेच हाती लागू शकेल. या संदर्भात माझेच एक उदाहरण येथे देतो. आपल्या शोध यात्रेत श्री. शंकरराव देव यांनी वाई जवळील पसरणी येथील रामदासी मठास भेट दिली. त्यावेळी मठाचे संस्थापक श्री रघुनाथस्वामी यांच्या ओवीबद्ध चरित्रातील फक्त दहावा अध्याय त्यांना सापडला, पूर्ण चरित्र त्यांना मिळू शकले नाही. त्यांच्या या नोंदीमुळे कुतूहल जागृत होऊन मी पसरणी मठात पुन्हा शोध घेतला व आनंदाची

गोष्ट अशी की मला ते संपूर्ण हस्तलिखित चरित्र उपलब्ध झाले. त्याचा परिचय मी माझ्या 'संशोधन साधना' ह्या ग्रंथात करून दिला आहे. श्री. शंकरराव देव ह्यांचे संशोधन विषयक विचार व अनुभव थोडक्यात पुढे देत आहे. ते वाचीत असताना पन्नास वर्षांपूर्वीची समाजस्थिती, वाहतूक व्यवस्थेचा अभाव, उपलब्ध सांस्कृतिक वारशाच्या संगोपनाची अनास्था इ. गोष्टी ध्यानात घेण्याची आवश्यकता आहे. संशोधनातील अनुभव सांगताना आत्मस्तुतीचा दोष आपणाकडे येईल असे श्री. देवांना वाटले. तथापि इतरांना त्याचा फायदा व्हावा, अडचणी टळाव्या या हेतूने त्यांनी निर्भयपणे संशोधनवृत्त सांगण्याचे ठरविले. आपल्या या वृत्तात त्यांनी मांडलेले विचार थोडक्यात पुढे देत आहे :

" आपण आवचितें मरोनि जावें। मग संशोधन कोणे करावे।
याकारणें संशोधनास लावावे। बहुत लोक "

असे, भजनाच्या जागी संशोधन शब्द योजून, काहीसे विनोदाने, गेल्या मार्चात, पुण्यात झालेल्या एका व्याख्यानात म्हटले होते. गेल्या अठ्ठावीस वर्षांत झालेले श्रीरामदासी संशोधन एकवार सविस्तर महाराष्ट्रास सादर करावे, असे कधीचे मनात आहे. हेतू हा, की आजपर्यंत कोठे कोठे संशोधन झाले, कोठे व्हावयाचे राहिले, जेथे झाले तेथे काय मिळाले व काय मिळावयाचे राहिले, संशोधन होत असता अडचणी व अनुभव काय काय आले, हे सर्व कळून पुढिलांचा मार्ग विशद व्हावा, त्या अडचणी त्यांना टाळता याव्या, अनुभवाचा फायदा व्हावा, झाले नाही तेथे त्यांच्याकडून संशोधन व्हावे व जेथे अपुरे राहिले असेल तेथे ते पूर्ण व्हावे. आजपर्यंत जे मिळाले ते सर्व प्रकाशित होणे, निदान लवकर प्रकाशित होणे शक्य वाटत नाही. तेव्हा जे मिळाले आहे त्यात आहे तरी काय, याची स्थूल कल्पना वाचकांस करून द्यावी, असाही एक हेतू आहे.

संशोधन हे एक शास्त्र आहे. त्याचे शास्त्र बनू शकेल. त्यावर अजून कोणी स्वतंत्र ग्रंथ लिहिल्याचे ठाऊक नाही. श्री. वेंद्रे यांचा 'साधनचिकित्सा' हा लेख काहीसा या कोटीतील आहे. संशोधनाचे बाबतीतही पुष्कळांचे अनुभव विचारात घेता काही काही बाबी सिद्धांतवत प्रस्थापित करता येतील. इतिहासाचार्य गेले. ते आज असते तर शास्त्ररचनेच्या कामी त्यांच्या विविध अनुभवांचा फार उपयोग झाला असता. हल्लीही जे संशोधक आहेत त्यांनीही एकत्र जमून विचारविनिमय केला पाहिजे. तोवर प्रत्येकाने आपणास आलेले अनुभव व त्यावरून बसविलेले सिद्धांत नमूद करून ठेवणे आवश्यक वाटते."

या प्रास्ताविकानंतर आपल्या अनुभवाधिष्ठित अठरा सिद्धांताची मांडणी श्री. शंकरराव देव यांनी केली आहे. त्यातील अनुभवांचा केवळ संदर्भ देऊन सिद्धांत त्यांच्याच शब्दात पुढे देत आहे.

( १ ) समर्थशिष्याच्या घराण्यातील जुने कागदपत्र देण्यास वृद्ध पुरुष टाळाटाळ करीत नसल्याचे सांगत. परंतु त्यांच्या निधनानंतर त्यांच्या मुलाने कागदपत्रांचे गाठोडे श्री. देव यांच्या स्वाधीन केले. त्यात साठ-सत्तर समर्थकालीन कागदपत्र मिळाले. यावरून त्यांनी संशोधन कार्यातील पहिला सिद्धांत बांधला, की वृद्ध माणसांच्या शब्दावर केव्हाही विश्वास टेवू नये.

(२) " वृद्ध माणसाने शंभरदा नाही म्हटले तरी ते म्हणणे खरे मानावयाचे नाही व प्रयत्न सोडावयाचा नाही. हे जसे मी टरविले, त्याचबरोबर दुसरा सिद्धांत असा ठरविला, की वृद्ध माणसांच्या तरुण मुलांकडून प्रेमाने आणि विश्वासाने मदत झाल्यावाचून राहणार नाही. तरुणांची अंतःकरणे प्रेमळ असतात, कोरी पाटी कशी असावी तशी ती निर्मल, स्वच्छ असतात, त्यावर उमटवू म्हणाल ते संस्कार उमटले जातील. "

( ३ ) इंदूरबोधन येथील मठातील बंदिस्त खोलीतील चव्वेचाळीस बाडे देवांनी निवडून काढली; परंतु ती प्रत्यक्ष स्वाधीन होण्यात त्यांना बरेच प्रयास पडले. तेव्हा ' संशोधनकार्यात केव्हाच निराश होऊ नये, हा तिसरा सिद्धांत होय '.

( ४ ) ऐन दुपारी भोजनाचे वेळी कागदपत्रांच्या शोधार्थ एक-दोन ठिकाणी गेले असता नीट स्वागत झाले नाही. तथापि आपण जेवण करून आलो आहोत असे सांगितल्यानंतर घरमालकाची वृत्ती खुलली. त्यावरून देव म्हणतात, " गरिबी-मुळे अशी वेळ यावी, हे समाजाचे दुर्दैव होय.. ...तेव्हा एक सामान्य सिद्धांत असा, की संशोधनकार्यात कोणावरही जेवणाचा भार घालू नये. "

( ५ ) आपल्या येण्याने कोणासही अडचण होऊ नये म्हणून पाचवा सिद्धांत असा : गावाबाहेर आधीच फराळ करावा, मग ग्रामी खुशाल प्रवेश करावा.

( ६ ) संशोधकाने या सर्व बाबतीत एक सामान्य नियम पाळावा, तो असा : स्वतःची कितीही गैरसोय झाली किंवा स्वतःस कितीही त्रास पडला तरी संशोधकाने सर्व काही सोडावे, पण शक्यतोवर आपल्यासाठी दुसऱ्याची गैरसोय करू नये किंवा दुसऱ्यास त्रास देऊ नये.

( ७ ) ' द्रव्येन सर्वे वशाः' हे जाणून क्वचित द्रव्यही खर्च करण्याची संशोधकांची तयारी असावी.

( ८ ) संशोधकाने मिळेल ते घ्यावे, अगदी रद्दी कोणी पुढे आणून टाकली तरी तीतूनही त्याने थोडी निवडून घ्यावी. एक तर, अगदी नित्योपयोगी असे काही नसते. शिवाय, जे आज एकाला निरुपयोगी म्हणून वाटेल, ते कदाचित उद्या दुसऱ्याला निराळ्या दृष्टीने उपयोगी पडेल. पहिल्याच भेटीत कोणत्याही ठिकाणचे सर्वच कागद सहसा पाहवयास मिळत नाहीत. तेव्हा संशोधकाने हे चार कागद आपल्याबरोबर अशासाठी न्यावे की दुसऱ्या खेपेस ते परत केले म्हणजे

विश्वास उत्पन्न होऊन आणखी कागद पाहण्याला आणि मिळण्याला मार्ग मोकळा होतो.

( ९ ) मिळालेली कागदपत्रे वगैरे कबूल केल्याप्रमाणे परत करण्याची वेळ सहसा टळू देऊ नये. संशोधकाने हा नियम पाळणे अत्यंत आवश्यक आहे. त्याने तो नियम पाळणे अत्यंय आवश्यक आहे. त्याने तो नियम एखाद्या धार्मिक बंधनाप्रमाणे पाळला पाहिजे. लोक आपल्याजवळची कागदपत्रे संशोधकांना देण्यास बहुधा नाखूष असतात, याची जी अनेक कारणे आहेत, त्यात एक मुख्य कारण हे असते, की दिलेले कागद परत येतील, असा त्यांना भरवसा वाटत नसतो!

( १० ) एका विभक्त झालेल्या शिवकालीन घराण्याच्या दोन्ही घरातील कागदपत्रे मिळविण्याच्या प्रयत्नात एका घरातील मिळालेले कागदपत्रही परत करावे लागले. नजरेने पाहिलेले आणि हाती आलेले शिवकालीन कागद नुसते वाचावयासही न मिळता परत करावे लागले याचे मनस्वी दुःख वाटले. हताश होऊन कागद परत दिले आणि दहावा सिद्धांत ठरविला, की एखाद्या गावी एखाद्याकडे महत्वाचे कागद मिळाले, म्हणजे निदान त्या खेपेस जास्त आढेत न पडता तात्काळ गावाबाहेर पडावे, पाणी पिण्यापुरतेसुद्धा त्या गावी त्यापुढे थांबू नये.

( ११ ) संशोधकाने फार अधाश्यासारखेही करू नये, पण मिळण्याचा संभव असता काही टाकूही नये, तर प्रसंग पाहून वागावे. 'बहुत आणिता घ्यावे। मुष्टी एक।'

( १२ ) कवीला काव्य करताना – कल्पना जुळविताना किंवा योग्य शब्द हुडकताना – जे श्रम होतात, त्यातच एक प्रकारचा असा विलक्षण आनंद असतो. तद्वत संशोधकाला संशोधनाप्रीत्यर्थ जे कष्ट होत असतात, त्यातही खरोखर स्वर्गीय सुख असते. कवीचा आनंद जसा कवीलाच कळतो, तद्वत संशोधनसुखाचे भोक्ते संशोधकच होत. इतर ऐहिक व्यवहाराप्रमाणे संशोधन हा व्यवहार नव्हे. ते एक पवित्र कार्य आहे, आत्मोन्नतीचे एक साधन आहे. म्हणून संशोधन करीत असता "सदा सर्वदा देव संनीध आहे।" याचा क्षणभरही विसर पडू देऊ नये. संशोधनकार्यात अपहारबुद्धी आचारात तर नसावीच, पण विचारातही नसावी. संशोधकाने लोभमूलक पापापासून दूर सरावे, अत्यंत प्रामाणिकपणाने वागावे. काय वाटेल ते होवो, संग्रह मिळो वा न मिळो, त्याने प्राणांतीही अपहारबुद्धीला मनात थारा देऊ नये.

( १३ ) संशोधकाला नुसते श्रीशिवकालीन मोडी लिपीचे ज्ञान असून भागत नाही, तर त्यास फारसी व संस्कृत या दोन भाषांचे चांगले ज्ञान असणे अगत्याचे आहे. मुसलमानी अमलातील अक्षरशः कोट्यावधी फारशी कागद बृहन्महाराष्ट्रात सर्वत्र विखुरलेले आहेत. संशोधन दौऱ्यात संस्कृतात असलेली ताम्रपत्रे, शिलालेख

वगैरे आढळतात, तो वाचता येण्याला संस्कृताचे उत्तम ज्ञान असणे आवश्यक होय.

( १४ ) संशोधकास निरनिराळ्या काळातील प्राचीन लिपींचा परिचय असावयास पाहिजे. सर्वगुणसंपन्नता येण्यास प्राचीन लिपींचे ज्ञान असणे अगत्य आहे. अशी सर्वगुणसंपन्नता कै. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांच्या ठिकाणी होती. म्हणून महाराष्ट्राने त्यांस इतिहासाचार्य ही पदवी अर्पण केली.

( १५ ) पूर्णत्वाच्या दृष्टीने आपण संशोधनाचा विचार करीत आहोत. म्हणून पंधरावा सिद्धात नमूद करण्यास हरकत नाही, की संशोधनाच्या दौऱ्यात संशोधका-बरोबरे फोटो घेण्याचे सामान असल्यास फारच उत्तम. कोठे कोठे जुने कागद नुसते पहावयास तर कोठे फार तर उतरून घेण्यास मिळतात. अशावेळी फोटो घेण्याचे सामान बरोबर असल्यास जुन्या कागदपत्रांचे, पोथ्यांचे वगैरे फोटो घेण्यास सापडते.

( १६ ) परत्र साधण्यासाठी ज्याप्रमाणे ' तरुणींच उठाउठी । ' केली पाहिजे त्याचप्रमाणे संशोधकानेही तरुणपणातच जेवढे होईल तेवढे पदरात पाडून घेतले पाहिजे. २५ ते ४५ या वयात जेवढे संशोधन होईल तेवढे पुढे होऊ शकणार नाही. म्हणून सोळावा सिद्धांत असा, की संशोधकाने आपल्या तरुण वयात होईल तेवढे संशोधन उरकून घ्यावे.

( १७ ) विद्यमान माणसांकडे न पाहता संशोधकाने मूळ पुरुषाकडे पाहावे, त्यांच्या चरणावरून त्याने आपली दृष्टी ढळू देऊ नये. ( मठाच्या ) आद्य संस्था-पकाच्या चरित्राकडे अचल लक्ष जडलेले असले म्हणजे नंतरची स्थिती पाहून मनाला उद्विग्नता येण्याचे कारण राहात नाही.

( १८ ) श्री. शंकरराव देव हे ' समर्थ-भक्त ' होते, त्यामुळे त्यांची सर्व संशोधन-सेवाही समर्थसेवाच होती. याच श्रद्धाभावातून ते अठरावा सिद्धांत सांगताना म्हणतात, ' या सर्व सिद्धांतांचा सिद्धांत, मुख्य सिद्धांत, किंबहुना या सर्व सिद्धांतांना व्यापून उरणारा शेवटचा सिद्धांत असा, की श्रीसमर्थचरणी संशोधकाची पूर्ण निष्ठा असावी. त्या चरणांचा त्यास सारखा निदिध्यास लागलेला असावा. श्रीसमर्थांना त्याने आपल्या हृदयात कायमचे साठवून ठेवावे. आपली सर्व संशोधनकार्ये त्यांच्या चरणी अर्पण करावी. '

संशोधनासारख्या रूक्ष मानल्या गेलेल्या क्षेत्रात जीव ओतला तर किती भव्य कार्य उभे राहू शकते, हे समर्थभक्त शंकरराव देव यांच्या जीवनाच्या अवलोकनाने आणि त्यांच्या कार्याच्या साक्षीभूत ' श्रीसमर्थ वाग्देवता मंदिरा 'च्या दर्शनाने ध्यानात येते. श्रीरामदासी संशोधनाच्या द्वितीय खंडाच्या प्रस्तावनेत, " श्रीसमर्थ वाग्देवता मंदिराची ' उभारणी झाल्यानंतर दोन तीन वर्षांत ते मंदिर पाहण्याकरिता

हजारो स्त्री-पुरुष आले व कौतुक करीत गेले, परंतु पाच दहा दिवस थांबून काही तास तेथे घालविणारे अवघे तिघेच होते," असा अनुभव नमूद केला आहे. कै. देवांच्या सारख्या तपस्वी संशोधकांनी हस्तलिखित संग्रहाचा अमोल सांस्कृतिक वारसा पुढील सशोधकांसाठी निर्माण करून टेविला आहे. यापुढच्या संशोधनाचे व वाङ्मयीन मूल्यमापनाचे कार्य नव्या पिढीतील संशोधकांना करावयाचे आहे.

# माझे संशोधन क्षेत्रातील अनुभव

**वा. वि. मिराशी, नागपूर**

---

माझे आतापर्यंतचे संशोधन संस्कृत आणि प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृति या दोन विषयांतच झाले आहे. म्हणून त्याविषयीच मी लिहिणार आहे.

मी एम्. ए. परीक्षा सन १९१७ मध्ये डेक्कन कॉलेजातून उत्तीर्ण केली. त्या काळी संशोधनाला शिक्षण क्षेत्रात मान नव्हता. कॉलेजातील आमच्या प्राध्यापकांपैकी कोणीही संशोधन केले नव्हते. मुंबई विद्यापीठात तेव्हा पीएच. डी. व डी. लिट्. यांसारख्या संशोधन पदव्या नव्हत्या. त्या पूर्वीच्या काळातील डॉ. रामकृष्णपंत भांडारकर, प्रा. काशीनाथ बापूजी पाठक यांसारख्या अत्यल्प विद्वानांनी जे संशोधनकार्य केले होते ते केवळ अंतःप्रेरणेने. तत्कालीन संस्कृत विद्वानांचा बहुतेक वेळ अध्यापनाखेरीज विद्यापीठीय परीक्षांना लावलेल्या पाठ्य-पुस्तकांच्या सटीप आवृत्त्या काढण्यातच जात असे.

पुढे ही परिस्थिती पालटू लागली. सन १९१६ मध्ये डॉ. श्री. कृ. बेलवलकर अमेरिकेच्या हार्वर्ड युनिव्हर्सिटीतून पीएच. डी. पदवी घेऊन आले. फर्ग्युसनचे डॉ. पां. दा. गुणे हेही जर्मनीतून संशोधन पदवीने विभूषित होऊन आले. तेव्हा प्राध्यापक म्हणून मान्यता मिळवावयाची असेल तर संशोधन पदवी मिळविणे आवश्यक आहे असे वाटून एलफिन्स्टन कॉलेजातील संस्कृतचे प्राध्यापक वि. स. घाटे यांना संशोधन पदवीकरिता पॅरिसला जावे लागले.

सन १९१७ मध्ये पुण्यातील विद्वानांनी डॉ. भांडारकरांच्या नावे प्राच्य विद्या संशोधन संस्था स्थापिली. तेव्हापासून महाराष्ट्रात भारतीय विद्यांच्या संशोधनास चालना मिळू लागली. त्या संस्थेच्या विद्यमाने अखिल भारतीय प्राच्य विद्या परिषदेची स्थापना होऊन सन १९१९ मध्ये त्या परिषदेचे पहिले अधिवेशन पुण्यास भरले. त्याला मध्य प्रदेश वऱ्हाड प्रांताच्या शासनाने आपला प्रतिनिधी म्हणून मला पाठविले होते. त्या अधिवेशनाच्या शेवटी आयोजिलेल्या उपाहार प्रसंगी सेंट झेवियर कॉलेजच्या फादर झिमरमनने "तुम्ही कोणत्या विषयात संशोधन करणार ?" असा प्रश्न मला विचारला, तेव्हा विशेष विचार न करता मी "प्राचीन भारतीय तत्त्वज्ञानात" असे उत्तर दिलेले आठवते. वास्तविक त्यावेळी संशोधनाची यत्किंचितही कल्पना मला नव्हती. आणि एम्. ए. परीक्षेकरिता वेदांत हा माझा ऐच्छिक विषय होता व मला त्यात विद्यापीठीय पारितोषिके मिळाली होती तरी

भारतीय तत्त्वज्ञानात माझ्या हातून पुढे काहीही संशोधन झाले नाही.

या अधिवेशनात डॉ. गुप्ते यांनी आम्हास प्राच्य विद्या संशोधनाकरिता जर्मन व फ्रेंच भाषांचे ज्ञान आवश्यक आहे असे सांगितल्यावरून मी नंतर "स्वयंशिक्षकां"-च्या साह्याने त्यांचे ज्ञान मिळविले. त्याचा मला पुढे उपयोग झाला. पुढे नागपूरच्या मॉरिस कॉलेजात एम्. ए. परीक्षेकरिता "प्राचीन भारतीय संस्कृति" हा विषय शिकवावा लागल्यामुळे मला प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृति या विषयावरील अनेक ग्रंथांचे वाचन करावे लागले. त्यायोगे मला त्या विषयाची गोडी लागली. तितक्यात त्या वेळचे भारतीय पुरातत्त्व खात्याचे उपसंचालक रावबहादूर का. ना. दीक्षित यांच्याशी माझा संबंध आला. त्यांनी माझी प्राचीन भारतीय इतिहासाविषयी रुची पाहून मला कोरीव लेखांचा अभ्यास व संपादन करण्यास सांगितले. इतकेच नाही तर विदर्भातील अमडापूर व बार्शी टाकळी येथील दुर्वाच्य म्हणून गणल्या गेलेल्या दोन कोरीव लेखांचे छाप "एपिग्राफिया इंडिका" या भारत सरकारच्या सुप्रसिद्ध संशोधनपर नियतकालिकात संपादण्याकरिता पाठवून दिले. त्यांचे समक्ष वाचन करण्याकरिता मला त्या स्थळांना भेटी द्याव्या लागल्या. ही माझी पहिली संशोधनयात्रा. नंतर काही काळाने कोरीव लेख 'एपिग्राफिया इंडिका' मध्ये माझ्या नावावर प्रसिद्ध झाले तेव्हा मला धन्यता वाटली. कारण त्या प्रतिष्ठित नियतकालिकात केवळ मुरलेल्या संशोधकांचेच लेख प्रसिद्ध होत असत.

नंतर मी मिळतील ते कोरीव लेख संपादून प्रकाशित करू लागलो. त्या काळी कोरीव लेखांचे संपादन करणारा दुसरा कोणी मध्यप्रान्त वऱ्हाडात नव्हता. म्हणून मला अनेक नवीन नवीन लेख मिळू लागले. प्रत्येक लेखाचा दीर्घकाल अभ्यास करून त्याचे सर्वांगीण विवेचन करण्याची माझी पद्धती असल्याने मला चांगली ख्याती प्राप्त झाली.

सन १९३५ मध्ये अनपेक्षितपणे एक अत्यंत महत्त्वाचे व जबाबदारीचे काम माझ्याकडे चालून आले. गेल्या शे-दोनशे वर्षांत भारताच्या सर्व भागात अनेक कोरीव लेख सापडले आहेत. ते मिळतील तसे युरोपीय व भारतीय विद्वानांनी संशोधनपर नियतकालिकात प्रकाशित केले आहेत. कोरीव लेख हे प्राचीन भारतीय इतिहासाचे अत्यंत महत्त्वाचे साधन आहे. म्हणून या लेखांचे संकलन करून राजवंशानुसार त्यांचे संग्रह प्रसिद्ध करावे अशी सूचना सन १८३७ मध्ये जेम्स प्रिन्सेप याने केली होती व त्या ग्रंथमालेला "कॉर्पस् इन्स्क्रिप्शनम्" (भारतीय उत्कीर्ण-लेखसंग्रह) असे लॅटिन नावही त्याने सुचविले होते. सन १९३५ पर्यंत या मालेतील फक्त तीन ग्रंथ प्रसिद्ध झाले होते : (१) अशोकाचे कोरीव लेख (संपादक, पहिली आवृत्ती : जनरल कनिंगहॅम, दुसरी आवृत्ती : डॉ. हुल्श), (२) खरोष्टी कोरीव लेख (सं. डॉ. स्टेन कोनो), (३) गुप्तांचे कोरीव लेख (सं. डॉ. फ्लीट). या

मालेत कलचुरि-चेदि संवताच्या लेखांचा ग्रंथ प्रसिद्ध म्हणून मध्यप्रान्त-वऱ्हाडचे प्रसिद्ध संशोधक डॉ. राय बहादूर हिरालाल यांनी सूचना केली होती. ती मान्य होऊन तो ग्रंथ संपादण्याचे काम त्यांच्यावर सोपविण्याचे ठरले. पण ते काम सुरू करण्यापूर्वीच त्यांचे निधन झाले. तेव्हा ते काम माझ्यावर सोपवावे अशी भारत सरकारचे एपिग्राफिस्ट डॉ. चक्रवर्ती यांनी सूचना केली. तद्नुसार ते काम माझ्याकडे आले. पण ते पाहताच माझी छाती दडपून गेली. कारण ते मोठ्या बुद्धिमत्तेचे व दीर्घ परिश्रमाचे काम होते. तथापि रा. ब. दीक्षितांच्या प्रोत्साहनावरून मी ते स्वीकारले आणि दहा वर्षांच्या दीर्घ परिश्रमानंतर त्याचे टंकलिखित सन १९४५ मध्ये पुरातत्त्व खात्याकडे पाठविले. पुढे दहा वर्षांनी सन १९५५ मध्ये तो ग्रंथ पूर्वोक्त ग्रंथमालेतील चौथा भाग म्हणून प्रसिद्ध झाला.

मला हे काम दिले त्याच वेळी डॉ. देवदत्तपंत भांडारकर यांना गुप्तांच्या कोरीव लेखांच्या भागाची द्वितीय आवृत्ती तयार करण्याचे काम दिले होते. त्यांनी १५ वर्षे काम केल्यावर सन १९५० मध्ये आपल्या निधनापूर्वी थोडे दिवस त्याची टंकलिखित प्रत पुरातत्त्व खात्याकडे पाठविली होती. पण तीत सुधारणा करणे आवश्यक वाटल्यावरून ते काम डॉ. छावडा यांच्याकडे देण्यात आले. त्याला आता २७ वर्षे झाली पण ती द्वितीयावृत्ती अद्यापि छापण्यास गेली नाही.

जवळ जवळ हजार पृष्ठांच्या या बृहद्ग्रंथाने मला मोठी कीर्ती प्राप्त झाली. त्यात जबलपूर व छत्तीसगड या हिन्दी भाषी विभागातील कलचुरि राजवंशाचा सर्वांगीण इतिहास आला असल्याने तत्कालीन मध्यप्रान्ताचे हिन्दी भाषी मंत्री पं. रविशंकर शुक्ल व पं. द्वारकाप्रसाद मिश्र यांना त्याचे महत्त्व पटून त्यांनी राष्ट्रपति डॉ. राजेन्द्रप्रसाद यांच्या हस्ते मध्यप्रान्त साहित्य परिषदेतर्फे नागपुरात माझा जाहीर सन्मान केला व सागर विद्यापीठातर्फे मला डी. लिट्. ही संमानोपाधि देवविली. त्यानंतर मी त्या प्रान्ताच्या मराठी भाषी विदर्भ प्रदेशावर प्राचीन काळी राज्य करणाऱ्या वाकाटक वंशाच्या सर्व उपलब्ध कोरीव लेखांचा संग्रह व त्या राजवंशाचा सर्वांगीण इतिहास यांचा ग्रंथ पूर्वोक्त ग्रंथमालेचा पाचवा भाग म्हणून सन १९६३ मध्ये प्रसिद्ध केला. याप्रमाणे गेली जवळ जवळ साठ वर्षे मी राहत असलेल्या या प्रदेशाचे ऋण अंशतः फेडण्याचा मी प्रयत्न केला. नंतर गेली सुमारे पंधरा वर्षे माझी जन्मभूमी कोकण व शिक्षणभूमी कोल्हापूर या प्रदेशांवर प्राचीन काळी राज्य करणाऱ्या शिलाहार राजवंशाच्या कोरीव लेखांचे संपादन करण्यात व इतिहास लिहिण्यात मी घालविली आहेत. त्यांचा मराठी ग्रंथ विदर्भ संशोधन मंडळाने तीन वर्षांपूर्वी प्रसिद्ध केला असून, इंग्रजी ग्रंथ पूर्वोक्त उत्कीर्ण लेखसंग्रहमालेचा भाग ६ म्हणून येत्या दोन तीन महिन्यांत प्रसिद्ध होईल.

वरील राजवंशाशिवाय इतर अनेक प्राचीन भारतीय राजवंश – मौर्य, सातवाहन,

गुप्त, राष्ट्रकूट, प्रतिहार, वंग, यादव वगैरे — यांचे अनेक कोरीव लेख व नाणी मला प्रसिद्ध करता आली. हा झाला माझ्या प्राचीन भारतीय इतिहासाच्या संशोधनाचा संक्षिप्त वृत्तांत.

याशिवाय कालिदास, भवभूति, धनंजय, राजशेखर, तोडमल वगैरे संस्कृत कवींविषयी अनेक समस्यांचा उलगडा करणारे लेख मला लिहिता आले. त्यातील कांहीवर माझे मराठी व हिंदी भाषांत ग्रंथही प्रसिद्ध झाले आहेत. त्यामुळे नागपूरजवळचे रामटेक हे कवी कुलगुरु कालिदासाने मेघदूतात वर्णिलेले रामगिरी होय हे सर्वसंमत होऊन तीन वर्षांपूर्वी तेथे कालिदास स्मारक उभारण्यात आले आहे. भंडारा जिल्ह्यातील आमगावाजवळचे पदमपुर हे भवभूतीने आपल्या तिन्ही नाटकांत आपले जन्मस्थान म्हणून उल्लेखिलेले पदमपूर होय हेही आता सर्वमान्य झाले आहे. तेथे त्या कविश्रेष्ठीचे स्मारक होणे आवश्यक आहे.

मागे माझ्या संशोधनाने मला कसे सन्मान प्राप्त झाले याचे संक्षेपाने वर्णन केले आहे. संशोधनक्षेत्रात माझे इतरांशी कसे वाद झाले, आघात प्रत्याघात करावे लागले, व शेवटी फलप्राप्ती काय झाली याचाही थोडक्यात उल्लेख केल्याशिवाय माझे अनुभव-कथन पूर्ण होणार नाही.

मला वाटते ते वर्ष १९२८ असावे. डॉ. श्री. व्यं. केतकर नागपूरच्या मॉरिस कॉलेजच्या स्नेहसंमेलनाकरिता आले होते. त्यावेळी हिस्लॉप कॉलेजात त्यांना माझ्या अध्यक्षतेखाली मानपत्र देण्यात आले. त्याप्रसंगी त्यांनी आपला 'कालिदास आणि विदर्भ' हा विस्तृत निबंध वाचला. त्यात त्यांनी मालविकाग्निमित्र नाटकावरून कालिदासाचा स्वभाव, ते नाटक लिहिण्यात त्याचा उद्देश, सेनापती पुष्यमित्राने अश्वमेध यज्ञ केला असे वर्णन करण्यात त्याचे राजकारणाचे अज्ञान इत्यादिकांविषयी मनमानेल तशी विलक्षण विधाने केली होती. ती ऐकून मला आश्चर्याचा धक्काच बसला. मी माझ्या अध्यक्षीय भाषणात त्यांच्या विधानांचा खरपूस समाचार घेतला. कालिदासाचा स्वभाव असा दुष्ट नव्हता असे दाखविलेच, पण पुष्यमित्राने एक नव्हे तर दोन अश्वमेध केले होते आणि तरीही त्याने आपली 'सेनापती' पदवी टाकून दिली नव्हती, हेही तत्कालीन कोरीव लेखांच्या पुराव्यावरून दाखवून दिले होते. पुढे त्यांचा लेख महाराष्ट्र वृत्तपत्रांत पाच लेखांकात प्रसिद्ध झाला. त्याला मी सहा लेखांकात उत्तर दिले. केतकरांना कालिदासाच्या राजकारणविषयक अज्ञानाबद्दलचे आपले विधान परत घेणे भाग पडले, पण इतर बाबतीत त्यांनी 'मया जितम्'ची आरोळी ठोकण्यास कमी केले नाही.

माझे दुसरे दुराग्रही टीकाकार कलकत्त्याचे डॉ. दिनेशचंद्र सरकार. हे कित्येक वर्षे आपल्या लेखांत माझ्या मताविरुद्ध मत प्रतिपादित असत. त्यांच्या प्रत्येक विधानाचे खंडन करताना मी ते कसे हास्यास्पद आहे हे दाखवीत असे. एकच

उदाहरण देतो. सातारा जिल्ह्यातील मानपूरच्या राष्ट्रकूटवंशी मानांक नृपतीचे वर्णन 'श्रीमत्कुन्तलानां प्रशासिता' असे त्याच्या एका वंशजाच्या ताम्रपटात आले आहे. त्याचे भाषांतर 'समृद्ध अशा कुन्तल देशावर राज्य करणारा' असे मी आपल्या लेखात केले होते. डॉ सरकार यांनी त्याचा अर्थ 'श्रीमान् कुन्तल देशाला शासन करणारा' असे करून आपणांस हास्यास्पद करून घेतले होते. मानांकाचे राज्य कुन्तल देशावरच असल्याने त्याने त्या देशास शासन केले असल्यास तो महामूर्ख किंवा वेडा असला पाहिजे!

अलीकडे सर्वत्र भ्रष्टाचाराचे साम्राज्य माजलेले दिसते. संशोधनाचे क्षेत्रही त्यापासून मुक्त नाही. म्हणून भासाच्या नावावर खपविण्याकरिता एका पंडिताने रचलेले 'यज्ञफल' नाटक आणि आपण थेट प्राचीन चालुक्य वंशात जन्मलो आहो असे सिद्ध करण्याकरिता एका धनाढ्य सरदारच्या आग्रहावरून दुसऱ्या एका पंडिताने रचलेले 'अययणवंशचरित' हे तथाकथित ऐतिहासिक संस्कृत काव्य ही कशी बनावट आहेत हे मला सविस्तर दाखवावे लागले. अलीकडे एका संशोधकाने ताजमहाल हे प्राचीन शिवमंदिर आहे असे प्रतिपादण्याचा उपद्व्याप चालविला आहे. त्याचाही दंभस्फोट मला करावा लागला.

## माझ्या शोधयात्रा

माझ्या पहिल्या शोधयात्रेचा उल्लेख पूर्वी आला आहे. कलचुरि-चेदि संवताच्या लेखांचे छाप घेण्यात मला मदत करण्याकरिता पुरातत्त्व खात्याने एक मेकॅनिक (छाप घेणारा) माझ्याकडे पाठविला होता. त्याला घेऊन एका मित्रासह मी छत्तीसगडातील काही ठिकाणी गेलो. तेव्हाचा अनुभव सांगण्यासारखा आहे. अकलतरा येथे एका गृहस्थाच्या घराच्या मागील भागास लावलेल्या एका कोरीव लेखाचा छाप घ्यावयाचा होता. प्रथम तो गृहस्थ छाप घेण्याकरिता परवानगी देईना. आमच्या कार्याचे महत्त्व त्यास पटविल्यावर त्याने नाखुशीने का होईना, पण अनुमती दिली. आम्ही त्याचे वाचन मोठ्या परिश्रमाने कित्येक तास करीत असलेले पाहून त्याला आमच्याविषयी आदर वाटू लागला आणि त्याने चहा वगैरे देऊन आमचे आतिथ्य केले.

प्राचीन कोरीव लेखांचा शोध करणाऱ्याला छाप घेण्याची साधने व फोटोग्राफीचे सामान जवळ ठेवणे जरूर आहे. मला काही काळ फोटोग्राफीचा नाद होता. पूर्वोक्त शोधयात्रेत छत्तीसगडातील प्राचीन पाली या वनप्रदेशातील गावामधील देवळाचे मी आपल्या कॅमेऱ्याने फोटो घेतले होते. त्यावरून त्या देवळाच्या भिंतींना लावलेले दगडी भिंतीचे टेकू तेथील कोरीव लेखांचा अभ्यास करताना लक्षात आले. त्यावरून

त्या देवळाचा जीर्णोद्धार झाल्याचे सिद्ध झाले आणि त्या वास्तूचा काळ ठरविण्यात मदत झाली.

प्राचीन ताम्रपट पुष्कळांच्या संग्रही असतात. त्यांना ते वाचता येत नसल्याने त्यात आपल्या जमीनजुमल्याच्या स्वामित्वाचा उल्लेख असावा असे वाटून ते ते ताम्रपट दाखविण्यास नाखूष असतात. क्वचित ते न्यायालयातील आपल्या कब्ज्यात पुरावा म्हणून सादर करतात आणि मग ते उघडकीस येतात. गतवर्षी एक निराळाच अनुभव आला. एका तरुणाने आपल्या घरचा ताम्रपट हस्तगत करून त्याचे निरनिराळे पत्रे भिन्न भिन्न तांबटांना मोडीत विकले. काही काळाने ते माझ्याकडे वाचनार्थ आल्यावर त्यातील एक पत्रा कमी असल्याचे दिसले. पुष्कळ शोध करूनही त्याचा पत्ता लागेना. नंतर शंभर रुपयांचे पारितोषिक वृत्तपत्रात जाहीर केल्यावर त्याच तरुणाने तो आणून दिला. अर्थातच त्याला ती रक्कम द्यावी लागली.

## संशोधनाची दुर्लक्षित क्षेत्रे

एके काळी महाराष्ट्र प्राचीन भारतीय कोरीव लेख व नाणी यांचे संशोधन करण्यात अग्रेसर होता. आता या संशोधनात रस घेणारे फारच थोडे विद्वान महाराष्ट्रात आढळतात. हा विषय महाराष्ट्रातील फारच थोड्या विद्यापीठात व कॉलेजात शिकविला जातो. वास्तविक या विषयात संशोधनाला खूप वाव आहे. कुशाग्र बुद्धिमत्ता, विस्तृत वाचन व तर्कशुद्ध विचारसरणी यांची मात्र जरुरी आहे. या विषयात लौकर फलप्राप्ति होणे शक्य नसते. आजकाल सर्व विद्यापीठांत संशोधनाला महत्त्व दिले जात असल्याने अनेक लोक संशोधनपदवी प्राप्त करताना दिसतात. पण ते बहुतांशी इतरांनी केलेल्या संशोधनाचे संकलन असते. त्यात नवीन असे फारसे नसते. अशा संशोधनाने ज्ञानाची प्रगती होत नाही.

शेवटी होतकरू सच्चा अभ्यासकांना काही सूचना करून हा प्रदीर्घ लेख पुरा करतो :—

**( १ ) संशोधनाचा उद्देश :** प्रत्येक संशोधनेच्छूने आपण कशाकरिता संशोधन करावयाचे याचा मनाशी ठाम निश्चय केला पाहिजे. सत्याचा आविष्कार हाच संशोधनाचा एकच एक हेतू असावा. ते प्रतिपक्षावर मात करण्याकरिता, आपली व आपल्या घराण्याची किंबहुना आपल्या देशाचीही प्रतिष्ठा वाढविण्याकरिता खोटीनाटी साधने निर्माण करून केलेले नसावे. तशा तऱ्हेचे संशोधन दीर्घकाळ टिकत नाही. शेवटी सत्याचाच जय होतो, खोट्याचा नाही, हे संशोधनेच्छूने ध्यानात ठेवावे.

( २ ) प्रमाणनिर्देश : संशोधनेच्छूने आपल्या प्रत्येक विधानास प्रमाण दिले पाहिजे. "नामूलं लिख्यते किंचित्" हा नियम त्याने तंतोतंत पाळला पाहिजे. याकरिता मूळ साधनाचा वस्तुनिष्ठ पद्धतीने अभ्यास केला पाहिजे. केवळ अमका लेखक असे म्हणतो – मग तो कितीही थोर असो – म्हणून त्याचे विधान उद्धृत करू नये.

( ३ ) प्रमाणविवेक : एखादी गोष्ट सिद्ध करण्याकरिता अनेक प्रमाणे उपलब्ध असतात, त्यांचे महत्त्व सारखे नसते. समकालीन कोरीव लेख, नाणी, वाङ्मय यांना उत्तरकालीन वाङ्मय पारंपारिक आख्यायिका इत्यादिकांपेक्षा जास्त महत्त्व दिले पाहिजे. समकालीन कोरीव लेख, वाङ्मय वगैरेतही अतिशयोक्ति व हेतुपुरस्सर असत्य विधाने केली असणे शक्य असते. त्याचेही सत्यान्वेषणाच्या दृष्टीने चिकित्सक परीक्षण करणे इष्ट असते.

या ठिकाणी एका प्रमाणमासाचा उल्लेख करणे आवश्यक आहे. अमुक एका ग्रंथात अमुक एका घटनेचा उल्लेख नाही म्हणून ती त्या काळी किंवा तत्पूर्वी घडलीच नव्हती असे अनुमान काही संशोधक करताना आढळतात. याला इंग्रजीत अर्ग्यूमेंट्स् एक्स सायलेन्शिओ असे नाव आहे. पण याने पुष्कळदा फसगत होते. त्या ग्रंथात, विशिष्ट घटना घडली असल्यास तिचा उल्लेख आलाच पाहिजे होता अशी परिस्थिती असल्यास मात्र असे अनुमान प्रमाण मानता येईल. भारतीय तत्त्वज्ञानातही अनुपलब्धिप्रमाण मानले आहे. पण ती अनुपलब्धि "योग्या" असली पाहिजे. "येथे घट नाही, कारण तो दिसत नाही" असे अनुमान कोणी अंधारात करू लागल्यास तो त्या घरावर अडखळल्याशिवाय राहणार नाही. त्या खोलीत घट दिसण्याइतका प्रकाश असल्यास मात्र पूर्वोक्त अनुमान खरे ठरेल. ऐतिहासिक संशोधनात असाच विवेक पाळला पाहिजे.

( ४ ) संयम : अन्य संशोधकांच्या मतावर टीका करताना संशोधकाने संयम पाळला पाहिजे. कोरीव लेख, नाणी वगैरेच्या अभ्यासात नवीन नवीन सामग्री उपलब्ध झाल्याने प्रगती होणे स्वाभाविक असते. अशा परिस्थितीत आपल्या पूर्वीच्या संशोधकांची त्यांच्या चुकीबद्दल हेटाळणी करण्याचा मोह नवोदित संशोधकास होत असतो. अशा प्रसंगी आपण आपल्या पूर्वीच्या संशोधकाच्या खांद्यावर असल्यामुळे आपणांस जास्त दिसत आहे याची जाणीव उदयोन्मुख संशोधकाने ठेवली पाहिजे.

( ५ ) प्रांजळपणा : नवीन साधनसामग्री उपलब्ध झाल्यामुळे किंवा अन्य कारणांनी आपले मत चूक आहे असे कोणी दाखविल्यास संशोधकाने आपल्या पूर्वीच्या मताचा हट्टाने आग्रह न धरता आपली चूक कबूल करून नवीन संशोधनाचे स्वागत केले पाहिजे. तसेच आपल्या संशोधनात पूर्वीच्या संशोधकांच्या श्रमाचा निर्देश संदर्भ देऊन केला पाहिजे. कारण सर्व खऱ्या संशोधनाचा उद्देश सत्याचा

आविष्कार हाच असतो.

### (६) इंग्रजीत तसे मराठीतही संशोधन प्रकाशन :

प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृती तसेच संस्कृत भाषा व वाङ्मय या विषयांतील संशोधनाचे महत्त्व सर्व जगाला वाटत असते. म्हणून संशोधकांनी आपले या विषयातील संशोधन इंग्रजी भाषेमध्ये प्रसिद्ध करणे अत्यावश्यक आहे. त्यामुळे सर्व जगाचे लक्ष त्याकडे जाईल. त्याबरोबरच आपल्या मराठीभाषी बांधवांसही त्याचे ज्ञान होऊन त्यांची बहुश्रुतता वाढावी हे इष्ट आहे. म्हणून मराठीतही त्यातील निदान महत्त्वाचा भाग प्रसिद्ध झाला पाहिजे. मी आपल्या संशोधनाच्या बाबतीत ही दृष्टी सदैव बाळगिली आहे.

याप्रमाणे नवोदित संशोधकांनी सदैव ध्यानात ठेवण्याची तत्त्वे व पाळण्याची पथ्ये यांचा संक्षिप्त निर्देश केला आहे. त्यांचा अवलंब केल्यास संशोधनाचा प्रवाह निर्मळ राहील आणि सत्याच्या आविष्कारात विघ्ने उत्पन्न होणार नाहीत.

# संशोधनातील माझे अनुभव

## दत्तो वामन पोतदार

---

**प्रास्ताविक :**

इतिहास या शब्दातच त्याचा अर्थ सामावलेला आहे. इति + ह + आस म्हणजे असं असं (निश्चयानं) घडले. राजवाड्यांनी आपल्या एका इतिहासमीमांसेत वर्तमान हा 'क्षणमात्रावस्थायी' असतो असे म्हटले आहे. म्हणजे दुसऱ्या क्षणालाच तो वर्तमानातून भूतकालात जातो. कोणेकाला तो जीवमान असता वर्तमान काळाचा काही अंश 'प्रत्यक्ष' दिसतो आणि बराचसा प्रत्यक्षाच्या जोडीला अनुमान उपमान आणि शब्द इ.प्रमाणे चतुष्टयांनी जाणून घ्यावा लागतो. आपल्या जीवनातील वर्तमान, भूत, भविष्य हे अगदी एकमेकांना चिकटलेलेच असतात, परंतु जिज्ञासा तेवढ्याने आपली तृप्ती करू शकत नाही. तर ती क्षणोक्षणी भूतकालातील ज्ञान समजावून घेण्याला उत्सुक असते. जो जो लांबत गेलेला भूतकाळाचा परिचय करून घेण्याची कोणेकाची हाव वाढत जाते, त्यावेळेला भूतकाळातील सत्य अवगत होणे त्याला फार कठीण पडते. कारण त्या भूतकाळाचे 'प्रत्यक्ष' तर त्याच्या हाती येणे अशक्यच असते. मग इतर प्रमाणांचा आश्रय तो करतो. आपल्याहून वडील, त्यांच्याहून वडील अशांच्या तोंडून जे भूतकाळाचे ज्ञान तो ऐकतो, त्याचाच तो संग्रह करतो. त्याशिवाय भूतकाळातल्या कोणी हौशी किंवा कोणी जाणकारी याने काही माहिती लिहून ठेवलेली त्याच्या हाती आली, तर तीवरून तो ऐकलेल्या माहितीपेक्षा अधिक माहिती जमा करतो. याशिवाय त्याला भूतकाळातील मंदिरे, घरे, प्रासाद, शस्त्रे, वस्त्र, भांडीकुंडी, किल्ले, प्राचीन ग्रंथ, दानपत्रे, ताम्रपत्रे, शिलालेख असे साहित्य मिळविता येते. त्याचे भाषिक ज्ञान स्वभाषेपुरतेच मर्यादित असले, तर ज्ञानाचा संकोचच होतो आणि त्यातही त्या कोणेकाच्या वर्तमानकाळाच्या स्वभाषेचे रूप आणि लेखनाचे रूप हे त्याच्या पूर्वीच्या दोन चारशे वर्षांच्या रूपाहून भिन्न असते, जुने शब्दही लुप्त झालेले असतात आणि लेख जर मोडी लिपीतला असला तर त्यात शब्द तोडण्याची सर्व जबाबदारी अभ्यासकावर पडते. या आणि अशा सर्व गोष्टी आपण लक्षात घेतल्या पाहिजेत.

आणि इतिहासाचे लक्ष्य सत्यशोधन हेच असले पाहिजे. घटनात्मक सत्य—म्हणजे राजवाड्यांच्या तोंडी असलेला शब्द Fact-finding—हे प्रथम घट्ट, शुद्ध असे हाती आले पाहिजे. आणि हे सत्य हाती लागावे म्हणून मोठ्या संस्था, दौलती, वीरपुरुष

यांच्याकरवी, राज्यादिव्यवहार प्रकरणी अथवा लोकव्यवहार प्रकरणी इतर भाषांतील, समकालीन भिन्न भाषांतील साहित्य उपलब्ध असेल तर तेही शोधले पाहिजे. उदा. शिवकालीन अथवा पेशवेकालीन लोकव्यवहार अथवा राज्यव्यवहार जाणून घेण्यासाठी भोवतालची कन्नड, तेलगू, उडिया, गुजराती तसेच फारशी. इ. भाषांतील राज्य-लोकव्यवहारांची साधनेही अभ्यासली पाहिजेत. शिवाय इंग्रज, फ्रेंच, पोर्तुगीज वगैरे जे परकीय लोक हिंदुस्थानात आले होते, त्यांची निरीक्षणपत्रे, वातमीपत्रे इ. साहित्यही तपासले पाहिजे. खाजगी व्यापाऱ्यांच्या हिशोब वह्या अत्यंत महत्त्वाच्या. कारण हिशोबात खोटेपणा खपत नाही. त्यातही खऱ्या खोट्या दोन प्रकारच्या वह्या ठेवण्याच्या कल्पना असतातच. तेव्हा तोही सावधपणा राखावा लागतो. स्तुतिपाठक, याचक, संन्यासी, स्वार्थसाधू, लोभी यांची तत्कालीन लिखाणे जरी मिळाली, तरी त्यांतील निखालस सत्य हाती लागण्याकरिता ती कौशल्याने पाखडावी लागतात. लेखक सुविद्य, अविद्य, पक्षपाती, जाणता, धोरणी जसा असेल त्यावर त्या लिखाणाचे स्वरूप अवलंबून असते. आणि त्यातून सत्य शोधणारा याचेही भाषा ज्ञान, व्यवहार ज्ञान, अवलोकन, अभ्यास, बुद्धिमत्ता, चातुर्य यांच्या हलकेपणाची वा भारीपणाची म्हणजे वजनदारीची उटाठेव करावी लागते. अभ्यासकाला अशी चौफेर परीक्षा सर्व ठिकाणी करता येईल असे नाही. एक मात्र खरे आहे की शिलालेख, ताम्रपट्टादि जाहीर लेखांत काल, स्थल आणि व्यक्तिनामे यांच्यात टिकाऊ खोटरडेपणा घुसडता येत नाही. असा हा प्रचंड खटाटोप पेलणाऱ्या वस्तादालाच सत्यसंशोधन सुगम होते. एवढे स्वल्पाक्षर नव्हर्थ निवेदन प्रास्ताविक म्हणून आवश्यक वाटले, म्हणून केले आहे.

## इतिहास संशोधनाचा इतिहास :

आपली सर्व प्रश्नावली महाराष्ट्रेतिहास साहित्य संशोधनापुरतीच मर्यादित आहे. मनुष्याच्या व्यवहाराची आणि जीवनाची जेवढी अंगे आहेत, तद्विषयक सत्यशोधन विभिन्न भौतिक शास्त्रांतील असले तरी आणि त्या भौतिक शास्त्रात प्रयोगादींकरता घेण्याची सोय असली तरी सत्य शोधनाच्या मार्गाचे रूप स्थूलतः समानच असते. याप्रकारचे संशोधन करून इतिहास ग्रंथांची रचना करण्याची प्रथा युरोपियन देशातून फार जुनी आहे आणि ती चढती वाढती अशी अखंड चालू आहे. इतक्या लढाया आणि उत्पात झाले तरीही त्या देशांतून इतिहासोपयोगी लेख भांडारे अद्यापही विपुल आहेत. आणि कच्च्या साहित्याचे प्रकाशन व पक्क्या इतिहासाचे संशोधन हे दोन्ही प्रकार सातत्याने अखंड चालू आहेत. युरोपियनांपैकी पोर्तुगीज प्रथम भारतात आले. त्यांना इतिहास लेखन परंपरा ज्ञात होती. त्यांनीही अनेक ग्रंथ रचले. त्यांचे साहित्य आज पणजीसही पाहावयास मिळते. ते विविध व भरपूर

अनुक्रमणिका

आहे. त्यानंतर फ्रेंच आले. त्यांचेही विपुल साहित्य लूर ( Loure ) येथे आहे. मागाहून इंग्रज आले. भर पेशवाईत स्प्रेंगेल नावाच्या जर्मनाने मराठ्यांचा इतिहास जर्मन भाषेत छापला आहे. ( सु. १७८५ ते ८९ ). स्कॉट वेअरिंग (१८११), ग्रँन्ट डफ ( १८२९ ), त्यावर नीळकंठ जनार्दन कीर्तने यांची टीका, त्यानंतर विष्णुशास्त्री यांचा ' निबंधमाले 'तील ' इतिहास ' विषयावरील निबंध आणि त्यांनी चालू केलेले ' काव्येतिहास संग्रह ' मासिक (यातील काव्याचा भाग जनार्दन बाळाजी मोडक, ठाणे, हे पाहात आणि इतिहासाचा भाग काशीनाथपंत साने पाहात. हे रा. ब. साने आणि विष्णुशास्त्री एकाच वेळी पुण्याच्या हायस्कूलात शिक्षक होते. साने मोठ्या बारकाईने लेखनसंशोधन करणारे होते. पुढे १९१० साली राजवाडे यांनी सरदार मेहेंदळे यांच्या सहकार्याने भारत इतिहास संशोधक मंडळाची स्थापना जेव्हा केली, त्यावेळी पहिले अध्यक्ष प्रख्यात महापंडित कै. रा. ब. गणेश व्यंकटेश जोशी यांना केले.) ' काव्येतिहाससंग्रहा 'पूर्वी विविध–ज्ञान–विस्तारात एक बखर प्रसिद्ध झाली आहे. असे हे ऐतिहासिक साहित्य, पेशवे कालीन व्यक्तींची मूळ पत्रे – या ग्रंथाचे नावच मुळी ' पत्रे, यादी वगैरे ' असे आहे - यांची प्रसिद्धी होऊ लागली. तेव्हा मराठीचे पाणिनी म्हटले गेलेले दादोबा पांडुरंग उद्गारले, " यापूर्वी आम्हाला यातले काहीच माहीत नव्हते. " ग्रँट डफच्या इतिहासाचे कॅप्टिन–साने यांनी केलेले मराठी भाषांतर शिळाप्रेसवर छापलेले प्रसिद्ध झाले होते. तथापि अस्सल कागदपत्रांचे प्रकाशन ' काव्येतिहाससंग्रहा 'त होऊ लागले. ते अपूर्व होते. एतावता मूळ साधनांची प्रसिद्धीची ही अशी कथा आहे. त्यांचे मुख्य श्रेय विष्णुशास्त्री आणि साने यांना आहे. आणि राजवाड्यांना स्फूर्ती मिळाली ती यातूनच ! विष्णुशास्त्र्यांच्याच प्रेरणेने ' केसरी ' सुरू झाला. ' केसरी 'वरील ' गजालिश्रेष्ठा ' हे मराठी भाषांतर वासुदेवशास्त्री खरे यांनी केलेले आहे. साने, खरे आणि पारसनीस यांना आम्ही मुनित्रय म्हणतो. साने हे सर्वांत जुने. पुढे खऱ्यांच्या हाती मिरजमळा दप्तर आले आणि त्यांच्या ऐतिहासिक लेखसंग्रहाचे खंड प्रसिद्ध होऊ लागले. आणि मग डेक्कन कॉलेजमध्ये मनमुराद विहार केल्यानंतर आणि ' भाषांतर ' मासिक चालविल्यानंतर राजवाड्यांना वाईत ' एरंडे दप्तराची ' प्राप्ती झाली. खऱ्यांना पुष्कळसे सुव्यवस्थित ' मळया 'तील ' पटवर्धनी दप्तर ' निवडून उपयुक्त कागद शोधण्यासाठी चार लक्ष कागद पहावे लागले, असे त्यांनी स्वतःच सांगितले. आणि त्यातील चार पाच हजार कागद निवडून, नकलून क्रमाक्रमाने ऐतिहासिक लेखसंग्रह खंड सुव्यवस्थितपणाने प्रसिद्ध केले. खऱ्यांना मिळालेले कागद सामान्यतः पानिपत कालापासूनचे आहेत. राजवाड्यांना वाईस मिळालेले ' एरंडे दप्तर 'ही पानिपतविषयकच आहे. एरंडे आणि बावधनचे कानिटकर यांना पेशव्यांनी गोविंदपंत बुंदेल्यांचे हिशेब पाहण्याकरिता पाठविले होते. पानिपतची झुंज

होण्यापूर्वी एरंडे कानिटकर परतले होते. आणि सदाशिवरावभाऊंनी गोविंदपंतांना लिहिलेली निकडीची पत्रे राजवाड्यांना अशा स्थितीत मिळाली, की ती पत्रे लिहलेल्या काळ्याभोर शाईवर घातलेली बारीक वाळू पत्रांतील अक्षरांवर दीडशे वर्षे झाली, तरी चमकत होती. असा हा राजवाड्यांचा संशोधनातील श्रीगणेशा होय. या खंडाला राजवाड्यांनी लिहिलेली पल्लेदार आणि प्रदीर्घ प्रस्तावना अभ्यासकाला आजही दिपवून टाकते. राजवाडे, प्रो. विष्णू गोविंद विजापूरकर आणि माझे वडील डेक्कन कॉलेजात एकाच वेळी होते. कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजचे म्हणून विजापूरकर स्वतःस ' राजारामियन ' म्हणवीत. कोल्हापुरास ' समर्थ ' छापखाना व वर्तमानपत्र चालू करण्यांत त्यांचा हात होता. सन १००१-३ च्या सुमारास ते माझ्या वाचनात येत असे. विष्णुशास्त्र्यांचे मित्र जांभेकर आणि मित्रमंडळी आळंदीस जात असताना ' निबंधमाले 'नंतर ' ग्रंथमाला ' काढण्याचा विचार विष्णुशास्त्रींनी बोलून दाखवला होता. विजापूरकर यांनी ' ग्रंथमाला ' हे मासिक काढून तो संकल्प पूर्ण केला. ह्या ' ग्रंथमाले 'त २, ३, ५, ६, ८, इ. राजवाडे यांचे ' मराठ्यांच्या इतिहासाची साधने ' या मालिकेतील खंड प्रसिद्ध झाले. सहाव्या खंडांची प्रस्तावना फार विस्तृत आहे. तीमध्ये इतिहासाचे तत्त्वज्ञान प्रवचिले आहे. प्रसिद्ध फ्रेंच तत्त्वज्ञ कॉंट ( Count ) याच्या पॉझिटिव्हिस्ट तत्त्वज्ञानाचा त्यांनी पुरस्कार केल्याचे दिसते. हा प्रस्तावना प्रबंध म्हणजे एक ग्रंथच आहे. राजवाड्यांचे १५ पासून पुढील खंड हे शिवकालीन आणि शिवपूर्वकालीन साधने प्रकाशात आणून साधन-प्रकाशनात एक नवीन युग चालू करणारे ठरले. यानंतर पुढे राजवाडे यांनी भाषिक आणि वसाहत-कालीन इतिहासाच्या संशोधन-प्रतिपादनाकडे मन वळविले आणि ' राधामाधवविलास चंपू ', ' महिकावतीची बखर ' हे ग्रंथ व ' इतिहास आणि ऐतिहासिक ' या धुळे प्रवर्तित मासिकातील ' विचार विकार प्रदर्शनाची साधने ' आणि ' महाराष्ट्राचा वसाहतकाल ' असे दिव्य लेख आणि ग्रंथ प्रसिद्ध केले. म. इ. सा. खंड ४ (चित्रशाळा) हा शिवाजी चरित्रातील प्रसंगांची आणि बखरींची प्रधानत्वेकरून मीमांसा करणारा आहे. खंड ८ (अमात्य-बावडेकर दप्तर) यातही शिवकालीन इतिहासाची साधने आहेत. खंड १५ (धुळे प्रकाशन) आणि पुढील खंड १६, १७, १८, १९ हे पारसनीस प्रवर्तित ' इतिहास संग्रहा 'मध्ये व २०, २१ पुन्हा स्वतंत्र व शिवकालीन ऐतिहासिक साहित्य यानी संपन्न आहेत. पुढे लवकरच ३१ डिसेंबर १९२६ ला धुळे येथे या महापुरुषाचा अंत झाला. त्यांनी पेटविलेली ज्योत पुढे तेवतच राहिली आहे आणि ती तशीच तेवत राहील.

खरे, राजवाडे, पारसनीस अशा थोर संशोधकांनी फुटकळ कार्य करीत राहण्यापेक्षा सर्वांनी एकत्र येऊन संघटित प्रयत्न करावा, असे योजून राजवाड्यांनी भारत इतिहास संशोधक मंडळाची स्थापना केली. (आषाढ शुद्ध प्रतिपदा शके

१८३२). त्यावेळी तात्यासाहेब मेहेंदळे व समोर राजवाडे आणि राजवाड्यांनी बरोबर नेलेला मी असे तिघेजण हजर होतो. या सभेचे वृत्त राजवाड्यांनी आपल्या हाताने लिहिलेले आहे. दोन माणसे मिळाली म्हणजे संस्था होते. मी अद्याप सभासद होण्याच्या स्थितीत नव्हतो. सभेत रावसाहेब नातू यांना सभासद करून घ्यावे, एवढेच काम झाले. अशा या पुण्यसमयी उपस्थित असलेला एकमेव मीच फक्त जीवमान आहे, याची मला अनन्य धन्यता वाटते. ह्या साहित्य जमा करण्याच्या कार्यामध्ये मोठी मोठी ऐतिहासिक घराणी होऊन गेली. त्यांच्याकडे अर्थातच कागद-पत्रे असल्याने तेथे प्रवेश मिळवावा हा पहिला उद्योग, असे राजवाड्यांच्या ध्यानी आलेले होते. राजवाड्यांच्या वाई वास्तव्यामुळे सहज लक्षात येणारे प्रचंड दप्तर म्हटले म्हणजे वाई जवळील मेणवली येथील नाना फडणीसाचे दप्तर होय. त्याबद्दलची सूचना 'केसरी'त पत्र लिहून राजवाड्यांनीच प्रथम केली. तो सर्व इतिहास येथे नको कारण मेणवली दप्तराचे प्रकाशन पुढे पारसनीसांच्या हाती गेले. नाना फडणीसांच्या वेळचे स्थूल नकाशे मोठे असल्याने त्यांचे तुकडे करून त्यांत मेणवलीकर कारभाऱ्यांनी गुळाच्या ढेपी बांधल्या होत्या, असे राजवाड्यांनी मला सांगितले. अशा दुर्धर परिस्थितीतून संशोधकांना वाटचाल करावी लागली आहे. यादृष्टीने पाहाता एरंडे दप्तराचा अनुभव सुखद आहे. तथापि ते मूळ कागद आता कोठे आहेत? कागद नकलून मालकाला परत करावे लागत. असे मूळ कागद सांप्रत कोठे आहेत?

## मोडीचे दुर्लक्षित क्षेत्र :

मी तसे काही संशोधनाचे शास्त्रीय शिक्षण घेतलेले नाही. तसे ते मिळण्याची सोयही हिंदुस्थानात नव्हती. हिंदुस्थानातील विद्यापीठे युरोपियन देशांच्या विद्या-पीठांच्या तुलनेने विद्यार्थी व शिक्षक बुद्धिमान असताही भिकारी या सदरात घालावी लागत. राजवाडे यांच्या स्वतःच्या शिक्षणाविषयी लिहिलेल्या निबंधात ('ग्रंथमाला') त्यांनी या प्रकारची पुष्कळ विधाने केली आहेत. तेव्हा राजवाड्यांच्या लेखांनी प्रभावित झालेला मी राजवाड्यांच्या संगतीत तयार झालो. पण राजवाड्यांनी विशेषसे प्रत्यक्ष शिक्षण दिले नाही. मला एक 'मोठे आश्चर्य प्रारंभापासूनच वाटत आले आहे, ते हे की युरोपियन आणि देशी संशोधकांनी मोडी लिपीत लिहिलेले आणि आसपास विखुरलेले हजारो कागद उपलब्ध असता मोडी लिपीचा अभ्यास करून सहजसाध्य अशा या क्षेत्रात कसलेही नामांकित कार्य केले नाही. प्राचीन शिलालेख, त्यांची भाषा इत्यादी विषयांत त्यांनी फारच पुढाकार घेतला. टॉडने आख्यायिका, भाटरचना वगैरे साधनांचा उपयोग करून आपले ॲनाल्स सजविले. ते पुढे अस्सल लेख वगैरे पाहून शिलालेखादि भरपूर साहित्याचा उपयोग करून राजस्थानचा नवा

सप्रमाण इतिहास लिहिण्याचा प्रयत्न गौरी शंकर ओझा यांनी केला. टेसीटोरी या जर्मनी गृहस्थाने राजस्थानी हस्तलिखित साहित्याची जंत्री तयार केली. राजस्थानामध्ये 'रासो' आदि अनेक ग्रंथ तारखा देणारे. झंडू कुलातील उपाध्यांनी मुलामुलींच्या जन्माच्या तिथ्या आणि कुंडल्या देणारे पोथे ग्रंथ तयार केले. अशा टिपणांची संगतवार माहिती देणारा सूची ग्रंथ एक जर्मनी संशोधक विद्वान डॉ. टेसीटोरी यांनी तयार केला. ग्रॅहॅमचा रिपोर्ट कोल्हापूर व सभोवतालच्या संस्थानांची पुष्कळ माहिती देणारा बहुमोल आहे. दाजी पंडित प्रकरणीचे कागद माझ्या हाती आले. त्यांत काही युरोपियनांनी मोडीत लिहिलेली चिटोरी मी पाहिली. साताऱ्याचे कलेक्टर श्री. मास्टर हे मोडी चांगले वाचीत. इंडिया ऑफिसच्या लंडनमधील दप्तरखान्यात मराठी बखरींची हस्तलिखिते वगैरे मी पाहात असता तेथे अकस्मात श्री. मास्टर यांची व माझी भेट झाली. असे हे किरकोळ व तुरळक अभ्यासक सोडले तर मोडी साहित्याचा परामर्श घेणारे युरोपियन विरळाच. मला वाटलेल्या आश्चर्याचा उलगडा मी आपल्या मनाशी करीत असतो तो असा. मराठी इतिहास म्हणजे मालोजी, शहाजी, शिवाजी, संभाजी, आणि पेशवे यांचा, आणि राजाराम पंडित, दहातोंडे, प्रल्हाद निराजी, रामचंद्रपंत, ताराबाई, शाहू, ब्रह्मेंद्र, पटवर्धन मंडळ व रामदास, तुकाराम, जिजाबाई, अनुबाई घोरपडी, नेताजी पालकर प्रभृती लहान मोठ्या वीरमुत्सद्यांचा, संतसाधूंचा इतिहास होय. हा समप्रमाण इतिहास मराठ्यांना कळल्यावर त्यांची अस्मिता सहजच उफाळून येईल आणि ती साम्राज्यवादी लोकांवर – ज्या साम्राज्यावर सूर्य कधीही मावळत नाही – प्रेम करणार नाही. राजद्रोही बनेल. साम्राज्यद्रोही बनेल. बनले नाही. बनणे शक्यही नव्हते. त्यातूनच गणपती उत्सव इत्यादि टिळकांनी सुरू केले. शिवाजी उत्सवाबद्दल आणि शिवाजीच्या रायगड समाधीबद्दल इंग्रज अधिकाऱ्यांची मनोवृत्ती व धोरण, या संबंधीच्या कागदपत्रांचा खंड मुंबई सरकारने माझ्या सूचनेवरून प्रसिद्ध केला आहे, त्यात सापडेल आणि गणेशोत्सवाचा इतिहास 'केसरी'ने छापला आहे त्यात सापडेल.

## काही अनुभव :

भारत इतिहास संशोधक मंडळाच्या पहिल्या काही अहवालांत (शके १८३२ पासून) मी कै. पांडोबा पटवर्धन, कै. आबा चांदोरकर अशा आरंभीच्या आमच्या संशोधकांकडून त्यांचे अनुभवाचे वृत्तांत प्रसिद्ध केलेले आहेत. त्यात माझाही एक आहे. आता संशोधकीय फिरतीमध्ये आलेले काही अनुभव सांगतो. पुण्याजवळ पिरंगुट हे गाव आणि देवस्थान सचिवांकडे होते. जवळच उरवडे, पोतनीस हे रामाचे भक्त. उरवड्यांत त्यांची रामाची घरची स्थापना होती. पोतनिसांचा मोठा वाडा पुण्यात

तुळशीबागेसमोर होता. त्यापैकी कै. गोपीनाथपंत पोतनीस हे माझे दगंबंधू. तेव्हा मी उरवडे येथे गेलो. गुरुवर्य राजवाडेही समवेत होते. बैलगाडी पोतनिसांची. गोपीनाथांचे धाकटे बंधू चालवीत. गाव टुमदार होते. पोतनिसांनी डोंगरातून पाण्याचा नळ आणून गावात प्रवेश करतानाच मोठा उच्छ्वास चोवीस तास पाणी, सोडणारा बांधलेला पाहुण्यांच्या नजरेस येई. पडझड झालेला परंतु वाडा मोठा होता त्यातल्या एका कोपऱ्यात रावजी पोतनीस राहात असत. रावजींच्या लगत पुण्यास राहणारे श्री. रघुनाथ बाजीराव पोतनीस ह्यांचा हिस्सा होता. रावजींच्या माडीवर फळीवर बांधलेली पोथ्या-कागदपत्रे होती. त्या मी वरून खाली काढल्या. तर रुमाल सारे उंदरांच्या लेंड्यांनी भरलेले होते. झाडून झटकून बघितले, तेव्हा रामदासस्वामींच्या दोन–तीन बखरी उत्तम स्थितीमध्ये बांधीव, सुंदर अक्षराच्या अशा मिळाल्या. इतर काही कागद सापडले. रामनवमीच्या उत्सवालाही तेथे मी एक दोन वेळा गेलो होतो. येथेच पुण्यातील त्यांच्या वाड्यात महाभागवत लिंगेश कुर्तकोटी आपली तपश्चर्या संपवून नुकतेच आले होते. त्यांचे दर्शन झाले. पोतनीस घराण्यात रोज दासबोधाचे पठण होई. एक ओवी वाचल्यावर ‘ श्रीराम ’ म्हणून पुढली ओवी वाचीत. कागद फारसे महत्त्वाचे मिळाले नाहीत. वाड्यात हिस्सेदार पुष्कळ. रावजींच्या समोर ज्या पोतनिसांचा हिस्सा होता ते माझ्या ओळखीचे होते. पण घर बंद आणि तरुण हिस्सेदार पुण्यात. त्यांच्या भागावरील कौलार थोडे कोसळून जुन्या लाकडी पेटाऱ्यावर टेवले होते. ‘ त्या पेटाऱ्यात ’ रावजी म्हणाले, ‘ कागद आहेत. ’ गंजलेले कुलूप. पेटाऱ्यात पाऊसपाणी गेले असेल अशी स्थिती. पण भाऊबंदी, त्यामुळे तो पेटारा उचलता आला नाही. आमचे गोपीनाथ संस्थानी परिषदेचे पुढारी. त्यांना कैदही झाली. सुटल्यावर ते संस्थानच्या मंत्रिमंडळातील एक मंत्री झाले. येथे मिळालेली सामग्री घेऊन पुण्यात भारत इतिहास संशोधक मंडळात टेवली आहे.

दुसरा एक अनुभव. पुण्यात दौंडापलीकडे पाच मैलांवर असलेल्या रेल्वे थांब्यावरून माझे मित्र पंढरीनाथ रामकृष्ण कुलकर्णी आलेगावकर यांचेबरोबर अलेगावास गेलो. वाटेत भोसल्यांच्या जहागिरीची हिंगणी, बेरढी अशी गावे लागली. प्राचीन पडिक मंदिरे त्या गावातून होती. उजव्या दगडी तुळवरावर तीन ओळींचा एक शिलालेख आढळला. तो ब्लॉक करून भा. इ. सं. मंडळ संमेलन–वृत्तात छापला आहे. असा मी नदी ओलांडून सिद्धटेकला गेलो. नदीकाठचे घाट, यादवकालीन बांधणी खाली गेलेली, वर कोणी दुरुस्ती केलेली. असा प्रकार पुण्यात ओंकारेश्वरावर दिसतो नेवाशालाही आढळला, तसा सिद्धटेकलाही दिसला. हे प्रसिद्ध अष्टविनायकातील स्थान आहे. येथे मोठ्या नगाऱ्याचे भांडे पडले होते. ते सजविण्याला दोन बैलांचे कातडे लागत होते. कै. काकासाहेब गाडगीळ ह्यांचाही या देवस्थानाशी

संबंध होता. म्हणून त्यांनी तेथे काही दुरुस्ती केलेली आहे. देथून पुढे आलेगावकरांच्या मदतीने पांडे पेडगाव येथे गेलो. येथेही यादवकालीन जुनी देवळे आहेत. त्यात सुंदर नक्षीकामही आहे. माझे मित्र आलेगावकर यांचे एक जुने आप्त घराणे पेडगावास होते. त्यांचे बळद कागदांनी भरलेले होते. ती सबंध उपसून काढली. आतील कागदांच्या पुडक्यांनी खोली भरून गेली. बांधीव पुडकी बाजूला केली. सुमारे शंभर दीडशे असावी. पाहतो तो सर्व हिशेबाची आणि तीही एकोणिसाव्या खिस्ती शकाच्या प्रारंभीची. एवढी पुडकी बैलगाडीने दौंडपर्यंत व पुढे आगगाडीने पुण्यास आणाव-याची. पुण्यास मंडळाचे एकच पाखे झाले होते. बळदात कागद सुरक्षित राहतात, म्हणून तेथे ठेवा म्हणून सांगितले. आणि पुन्हा येऊ म्हणालो, ते अजून जातोच आहे. सर्व गळबाटयात वेचून वेचून मराठी जुन्या गद्य पंचतंत्राची अकरा पाने मिळाली. भा. इ. सं. मं. द्वारा ती छापलेली आहेत. 'शिवराजभूषण' या संस्कृत ऐतिहासिक काव्याचा कर्ता बंदेश्री येथलाच. ते काव्य 'काव्येतिहास संग्रहात' छापले आहे. त्यात काही नवीन माहिती मिळत नाही.

कोठे, केव्हा, काय मिळेल त्याचा नेम नाही. याच गावात जुन्याचे नवे केलेले एक विठ्ठल मंदिर होते. तिथे जुने कागद आहेत अशी वार्ता होती. गेलो. पुजारी यांनी जुने कागद ठेवीत तसे तांब्याचे नळकांडे पुढे आणले. आणि पाहतो तो मासाहेब बुऱ्हाण निजामशांपासून देवळाला दिलेल्या अस्सल सही शिक्क्याच्या सनदा क्रमवार मिळाल्या. मग आलेगावकरांना खूण करून दौत, टाक, कागद, शाई हे सर्व साहित्य आणविले. तेवढ्यासाठी उठायला नको आणि मालकावर बोजा पडायला नको. आमचा अनुभव असा. एकदा कागद हातात मिळाला तर दुसऱ्या भेटीपर्यंत तो पुन्हा पाहायला मिळेल ही आशा धरू नये. त्याच क्षणी त्याचा मिळेल तितका लाभ घ्यावा आणि मालकाची मर्जी मोडू नये. म्हणून लेखन साहित्य आणविले व तेथेच बसून नकला करण्याला सुरुवात केली. जुनी लिपी, शिवके यथावत आपणच वाचून आपणच नक्कल करणे, आणि त्यातून शिवपूर्वकालीन मोडी लिपीचे, जीर्ण घड्या झालेले. पण नेटून बसलो. आलेगावकरांना खूण करून काड्यांची पेटी आणि मेणबत्ती आणली. मालक डोळ्यात तेल घालून शेजारी बसले होते. मी मेणबत्ती मागविल्याचे पाहिल्यावर कंटाळलेले मालक म्हणाले, "किती वेळ लागेल?" मी म्हणालो, "कागदाच्या नकला तर संपविल्या पाहिजेत." एक दोन कागद उरले होते. तेव्हा मी मालकास म्हटले, "येथेच पांडोबांच्या घरी राहिलो आहे. परवानगी असेल तर तेथे नकला करून तुमचे कागद तुम्हाला परत देईन." गावकरी, वतनदार, मध्यस्थ माझी चिकाटी आणि नेटून बसण्याला कंटाळलेले मालक. त्यांना माझी विनंती मान्य करण्याची बुद्धी झाली आणि हे दुर्मिळ कागद भा. इ. सं. मं. त प्रसिद्ध करता आले. शिवकालीन कागदाच्या विषयात मी जरा

नवखाच होतो. राजवाड्यांचा हात शिवकालीन कागदांपर्यंत नुकताच पोचला होता. त्यांनी पुढील एका लेखात ( धुळे येथे ) त्या माझ्या वाचनातील चुकांबद्दल मला जरा फटकारले आहे.

तिसरा एक अनुभव पैठणचा आहे. हे तर एक महाक्षेत्र. रेल्वे रस्ता नाही. नगराहून शेवगावकडून गोदा ओलांडून जावे, तेव्हा पैठण. तसा गेलो. गोदेला गुडघाभर पाणी होते. ही अशीच यादवकालीन भूमी. या भागातील नेऊरगावास केवढा मोठा शिलालेख आहे ! केसरीनाथ समाधी आळंदी. शिवदिन केसरी मठ. समाधी पैठण, वंशाचारीची पद्धत अफलाद. अफलाद म्हणजे मुलीच्या वंशाकडील गादी चालावयाची. अवलाद नव्हे अफलाद वंशाची सत्ता जगन्नाथ महाराज पंडित यांच्याकडे. परंतु अज्ञानपणाच्या काळात वहिवाटदार झाले औंधचे बाळासाहेब पंत-प्रतिनिधी, त्यांच्याकडील कुलकर्णी हे प्रतिनिधींतर्फे मठाची व्यवस्था पाहात. या कुलकर्ण्यांचे धाकटे बंधू हणमंतराव हे माझे विद्यार्थी. वडील बंधू विष्णुपंत यांचा त्यामुळे परिचय. मठात गेलो आणि पोथ्यांनी भरलेली खोली कुलकर्ण्यांच्या मार्फत उघडली आणि शोधू लागलो. तेथेच मला बहिरा जातवेद यांची पोथी मिळाली. आणखी कित्येक पोथ्या मिळाल्या, कागद विशेष मिळाले नाहीत. नागघाटाजवळ हा शिवदिन मठ होता. हे सर्व घाट जुने. नवी देवळेही पुष्कळ. घाटावर आणि देवळात शिलालेखही होते. एकनाथांचे घर एका टोकाला तर त्यांची उपास्य देवता रेणुका हिचे स्थान गावाच्या दुसऱ्या टोकाला. गावात मोठमोठाल्या वाड्यांच्या पडक्या भिंती. देवळांच्या मशिदी झालेल्या. पुष्कळ तोरणद्वारे चुना फासून फासून मुसल-मानी अमदानीत केविलवाणी दिसणारी, सफेद चुन्यामुळे आतील काम बुजून गेलेले पण शुभ्र दिसत असे. ही ठिकाणेही फिरून पाहिली. रस्त्याने हिंडताना मध्येच कोठे हत्तीचे तोंड वर दिसे. कोठे गाडलेगढलेले जुन्या देवता मूर्तींचे तुकडे दिसत. एका गृहस्थाने पोथ्यांचा मोठा संग्रह केला होता. पोथ्या चांगल्या नीटनेटक्या बांधून ठेवल्या होत्या. असे अपूर्व भांडार संपूर्ण तपासावयाचे. वर्षसहा महिन्यांचा उद्योग. तेव्हा मी प्रथम शिवदिन मठातील पोथ्याच तपासल्या. मठाच्या मागच्या बाजूस सुंदर नक्षीचे बांधकाम असलेल्या भागात मी हाती आलेल्या पोथ्यांची निवडक पाने नीट बंदोबस्ताने ठेवली होती. पुन्हा जावे, तो पुन्हा तोच अनुभव. फारसे जाणे राहाणे झाले नाही. गेलो तेव्हा औरंगाबादेकडून गेलो. मठात घौस नावाचा मुसलमान सेवक होता. त्याने देवळे मशिदींच्या जागा दाखवून पैठणचा एक उत्कृष्ट नकाशा केला होता. त्याच्याकडून त्याची एक हुबेहुब नक्कल मी करवून घेतली. नाथांच्या रेणुकादेवीच्या जागेवर मशिद होती. पैठण निजामाकडे होते. कै. श्रीमंत आबासाहेब मुजुमदार यांची फेरी तिकडे एकदा झाली होती. त्यांच्याकडून या देवळाच्या मशिदीत एक संस्कृत शिलालेख असल्याचे कळले होते. त्याचा एक दगड पाय

लागून झिजून जाईल असा बसविला होता आणि त्याचा पुढील भाग खालच्या तळघरात होता असे त्यांनी सांगितले. सूर्यास्ताच्या सुमारास तेथे मी गेलो. तो झिजलेला दगड सापडला. त्याच्या पहिल्या पाच दहा संस्कृत ओळी स्वच्छ होत्या. त्या मी उतरून घेतल्या, पुढे उजेड कमी झाल्यामुळे परत आलो. पुन्हा गेलो. तो 'यहां कुछ नही है। तहसीलदारसाब मयजनाना ठहरे है।' हे ऐकून परत आलो. कै. डॉ. पाठक यांना अर्पण केलेल्या ग्रंथात एक लहानसा इंग्रजी निबंध मी लिहून सादर केला. छापलेला आहे. यानंतर पुन्हा जाणे झाले नाही आणि पुढेही कोणी तिकडील संशोधकांनी काही केल्याचे आढळले नाही. काही पोथ्या या मठातून मी पुण्यास आणल्या. पुढे जे स्वामी स्वरूपानंद म्हणून प्रसिद्धीस आले ते रामभाऊ गडबोले मला नकलनवीस म्हणून मिळाले. त्यांच्याकडून मी या पोथ्यांतील एक दोन नकलून घेतल्या. ठरलेला मोबदला दिला. पुन्हा चौकशी केली तो गडबोले कोकणात गेले. कालवशात मी रत्नागिरीच्या गोगटे कॉलेजच्या समारंभाला गेलो. तेव्हा पत्र लिहून, जुनी आठवणी देऊन, खाली स्वरूपानंद लिहून, मला पावसेस भेटावे, म्हणून त्यांनी पत्र लिहिले. त्याप्रमाणे मी भेटलो. तो सारा प्रसंग अलाहिदा आहे. इकडे मठात मिळालेल्या नाथ पंथीय पोथ्या छापण्याचा विचार केला. आणि कै. श्रीमंत बाळासाहेब प्रतिनिधी यांचेकडे सहाय्यार्थ विनंती केली. त्यांनी दोनशे रुपये पाठविले. मी 'ज्ञानदीप' नावाचा ग्रंथ छापला. तोवर खटलेखोकले होऊन मठसत्ता श्रीमंत जगन्नाथ महाराजांकडे आली. 'जगन्नाथ महाराजांनी पुढील कार्याकडे लक्ष द्यावे.' असे मी प्रस्तावनेत लिहिले. पुण्यात न. चिं. केळकरांचा सत्कार झाला, तेव्हा मला घेऊन येण्याची कामगिरी जगन्नाथ महाराजांकडे सोपविण्यात आली होती. त्याप्रमाणे मी त्यांच्याबरोबर गेलो. छापील ग्रंथाची प्रत महाराजांना मी पूर्वीच दिली होती. त्यातील 'महाराजांनी पुढे लक्ष द्यावे' :या विधानाबद्दल महाराजांनी नाराजी व्यक्त केली. मला तर त्यांच्या त्या नाराजीचे कारण काहीच ध्यानात आले नाही. 'आपण ते करून, पण लिहिले कशाला' असा काहीसा भाव त्यांच्या बोलण्याचा आठवतो. पुढील एक ग्रंथ स्वरूपानंद स्मारक मंडळ यांनी छापला असून दुसरा अद्याप छापला नाही. डॉ. रा. चिं. ढेरे यांचेकडे ते काम स्वरूपानंद मंडळाने दिल्याचे मंडळाने मला सांगितले. सांप्रत बाईस माझाच गळाठा होऊन पडला आहे. मी ८७ मध्ये प्रवेश केला आहे. ईश्वरेच्छा प्रमाण !

## संशोधकांना काही सूचना :

संशोधक हा शब्द हल्ली फार विपुलतेने वापरला जातो. पण खरे पाहता ती एक तपश्चर्या आहे आणि ती साधना बहुतांशी संशोधक होणाऱ्या व्यक्तीनेच करावयाची असते. राजवाडे, भावे, देव प्रभृतींनी अशी तपस्या केली होती आणि राजवाड्यां-

पासून स्फूर्ती घेतलेल्या आणि बारकाईने अभ्यासाचे तप आचरलेल्या लोकांनी ती पुढे चालविली आहे. ‘ मराठ्यांच्या इतिहासाची साधने ’ या आपल्या ऐतिहासिक साधन मालेच्या खंड १, ६ आणि ८ यांजवरील विस्तृत प्रस्तावनांतून राजवाड्यांनी जे मार्गदर्शन केले आहे, तेच दीपस्तंभाप्रमाणे नवीन संशोधकाना प्रकाश पुरवील. आपल्या ज्ञानेश्वरीच्या जुन्या पोथीच्या विस्तृत प्रस्तावनेत आणि ‘महिकावतीची बखर’ व ‘ राधामाधव विलासचंपू ’ आणि ‘ इतिहास ऐतिहासिका ’तील लेख यांमध्येही वाचकांना सिद्धान्त रचनेचे दिग्दर्शन होईल. प्रास्ताविकात मी काही सांगितले आहे. पूर्वाभ्यास जितका खोल होईल, तितका संशोधक वजनदार होईल. एक भाषेपेक्षा संयुक्त अशा आणखी केवढ्या भाषांचा परिचय किंवा खोल अभ्यास पदरी बांधता येईल, तितका संशोधकाचा दर्जा वाढेल. मराठी अरबी यांत काही निकट साम्य आढळले तर विस्मयाची गोष्ट आहे. पण त्यात अर्थही पुष्कळ आहे. नुसत्या इंग्रजी साधनांवर कधीच तृप्त असू नये. पोर्तुगीज साधनांचे महत्त्व कै. प्रो. पिसुर्लेकर यांच्या व्याख्यानांचा पुणे विद्यापीठातर्फे प्रसिद्ध झालेला ग्रंथ आपणाला दाखवून देईल. फारशी साधनाचे महत्त्व कै. जदुनाथ सरकार यांनी विशेषत्वाने नजरेस आणले आणि आज श्री. सेतुमाधवराव पगडी यांनी तर हा पल्ला पुष्कळ दूरवर नेला आहे. आणि अभ्यासकांना ऋणी करून ठेवले आहे. ग्रियर्सनचा ‘ लिंग्विस्टिक सर्वे ’, ॲथोव्हेन यांचे ‘ ट्राइब्ज ॲंड कास्ट ’, तसेच एलिएट ॲंड डाऊसनचे ‘ हिस्टरी ऑफ इंडिया ॲज टोल्ड बाय इटस हिस्टोरियन्स’चे आठ खंड आणि इतर महाकवी शामलदास प्रभृतींचे अनेक ग्रंथ, भाषा, भूरचना, हवामान, शस्त्रे, अस्त्रे, वस्त्रे, तत्त्वज्ञान, विश्वपरिचय, शास्त्रज्ञान असे जेवढे मिळेल तेवढे ज्ञान हस्तगत करीत असावे. त्यानेही संशोधकाचा दर्जा आणि वजन तितके तितके विशाल आणि पक्के होते.

प्रत्यक्ष लेखन करीत असताना नवोदित संशोधकांनी पुढील गोष्टी अवश्य ध्यानी बाळगाव्यात. १. इतिहास म्हणजे होऊन गेलेल्या गोष्टींचे सुसंगत, सकारण उद्बोधक तरी निर्लेप, निरंजन सत्य शोधून निर्मळ, निर्भय होऊन रचलेले एखाद्या काळाचे वा प्रसंगाचे वा घटिताचे सर्वांगीण कथन होय. शुद्ध, सत्य घटित धुतल्या तांदळासारखे धुवट, निर्मळ असावे. २. ऐतिहासिक सत्यशोधन करताना सत्य असेल तर आहे असेच म्हणावे, तसे नसेल तर असे, असावे, संभवते, वाटते इत्यादि सावध शब्द-योजना करावी. ३. घटित सर्व बाजूंनी पाहावे व वर्णावे. त्यासाठी प्रत्यय, अनुमान, उपमान, शब्द अशी प्रतवार प्रमाणे लावावीत. ‘ जगाचा इतिहास ’ लिहिणाऱ्या सर वॉल्टर रॅले यांच्या जीवनातील एक प्रसंग त्या दृष्टीने लक्षणीय आहे. सर वॉल्टर रॅले आणि त्याचा मित्र असे दोघे राजकीय तुरुंगात आपल्या शेगडीजवळ शेकत बसले होते. सर रॅले याने आपल्या ‘ जगाच्या इतिहासा ’चे लिखित तयार केले होते. त्यांच्या

समोरच्या खोलीत दोन दुसरे कैदी आपसात भांडत होते. दोघांपैकी कोणी कोणाला प्रथम मारले, याबद्दल रॅले व त्याचा मित्र यांच्यात मतभेद झाला. तेव्हा रॅले म्हणाला की, 'गड्या, समक्ष पाहिलेल्या गोष्टीत जर आपला मतभेद आहे तर माझा इतिहास काय उपयोगाचा' असे म्हणून आपले हस्तलिखित त्याने शेगडीत टाकले. परंतु त्याच्या मित्रांनी ते वाचविले. प्रत्यक्ष प्रमाणाच्याही मर्यादा ओळखल्या पाहिजेत. उदाहरणार्थ, पानिपतचा रणसंग्राम. यात १. अफगाण ( अब्दाली ) + मराठे, २. जाट, रजपूत वगैरे, ३. परकीय समकालीन इंग्रज, डच वगैरेंची लिखाणे, या सर्व बाजूंचा विचार करावा लागेल. एका डोळ्याने पाहण्याऐवजी दोन्ही डोळ्यांनी संपूर्ण वस्तूचे यथार्थ ज्ञान होण्याची शक्यता असते. ( दोही डोळां एकचि पहाणे ) ४. संशोधकाने आपली बौद्धिक, शारीरिक कुवत, समाधान, इत्यादींची जाणीव ठेवावी व आपल्या उणिवांचें दिग्दर्शन करावे. ५. वृत्ती विनम्र असावी. संशोधकास विल्यम आयर्विन ( आय.सी.एस. ) ह्या 'लेटर मोगल्स : खंड १' या ग्रंथाच्या कर्त्याची विनम्रता आदर्श वाटावी. त्याने आपल्या चार ओळींच्या प्रस्तावनेत 'आपला उल्लेख कोणी तळटीपेत केला तरी साफल्य वाटेल' अशी भावना व्यक्त केली होती. ६. संशोधकाने वापरलेली, शोधलेली, चाळलेली साधने व्यक्तिगत न ठेवता सार्वजनिक, न हालणारी, अंतर्बाह्य, सुरक्षित, पंचमहाभूतभयरहित अशी ठेवावी. ती योग्य अधिकारी अभ्यासकास पाहाता, अभ्यासता यावीत. अभ्यासकांना योग्य निर्बंध पाळून त्यांच्या नकलप्रतिमा घेता याव्यात. ७. नवे प्रमाण उपलब्ध झाल्यास पूर्वीचे कथन अवश्य बदलावे. पूर्वमतांविषयी उगाच दुराग्रह, हट्ट ठेवू नये. ८. संदर्भ पूर्ण द्यावेत, जेणेकरून पुढील संशोधकांचे काम हलके होईल. ९. खऱ्याखोट्याची परीक्षा फारच काळजीपूर्वक आणि परिश्रमपूर्वक करणे अत्यंत आवश्यक आहे. थोडक्यात दोनतीन उदाहरणे देतो. ( १ ) नामदेवांचे अभंग : कविटकर नावाच्या तरुणाने आपणच नामदेवाच्या नावावर रचलेले १६–१७ अभंग खोटेच दाखल केले. 'नामदेव पत्रिके'त चर्चा आढळेल. कविटकर खोटा ठरला. ( २ ) दासोपंत यांचे एक ओवीबद्ध चरित्र छापलेले आहे. 'महाराष्ट्र कवी'त वि. ल. भाव्यांनी उघडकीस आणले की हे चरित्र अलीकडे लिहिलेले आहे. ते जुने नाही. हे भरपूर माप त्या बनावट लेखकाच्या पदरी त्यांनी घातले. ( ३ ) विजापुरास बनावट अदिलशाही फर्माने शिक्क्यासह करून देण्याचा एका गृहस्थाचा उद्योग असे. फार हुबेहुब करीत असे. पूर्वी अदिलशाहीत ज्या प्रकारचे कागद वापरीत तसे कोरे कागद त्यांच्या संग्रही होते. शिक्के पाहून तो शिक्के कोरीत असे. हा मोठाच धोका होता. नरसोबाची वाडी-औरवाड गौरवाड या भांडणात वाडीच्या पुजाऱ्यांनी असे फर्मान मला दाखविले. 'ते बनावट आहे, कोर्टात दाखल करू नका' असा सल्ला मी दिला व तो त्यांनी मानला. युरोपियन इतिहासात 'पेपल डिक्रीटल्स' या बनावट

कागदांचे प्रकरण प्रसिद्ध आहे. पाध्ये-जोशी प्रकरणात दाखल केलेला ताम्रपट बनावट असल्याचे पुढे पेशवाईत सिद्ध झाले. तेव्हा सहजासहजी कोठे तरी मिळालेले कागद पुढे करून संशोधक होत नाही, याचे सर्वबहुश्रुत वाचकांनी आणि अभ्यास-कांनी भान टेवावे. 'योगवासिष्ठ' या मराठी ग्रंथाबाबत रंगनाथ मोगरेकर आणि रंगनाथ निडोकर यातील बनावटगिरी मी कै. श्री. चिंतोपंत जोशी यांनी जो संशोधनपर ग्रंथ (श्रीधर, चरित्र आणि काव्यविवेचन) प्रसिद्ध केला आहे, त्याच्या प्रदीर्घ प्रस्तावनेत अगदी स्पष्टपणे उघड करून दाखविली आहे. शके १८११ मध्ये हा मराठी 'योगवासिष्ठ' ग्रंथ मुंबईत दोन प्रकाशकांनी प्रसिद्ध केला. त्यामुळे संशय येऊन मला या प्रकरणातील बनावटगिरी उघड करता आली. १०. सांकेतिक लिप्या, लेखकांची वंशपरंपरागत ओळखता येण्याजोगी अक्षरांची वळणे इ. दीर्घ व्यासंगाने कळू शकतात, तसा व्यासंग टेवावा. । हे एकच चिन्ह जुन्या मराठीत दिसते. तिला चरणरेष म्हणतात. विरामचिन्हे (स्वल्पविराम, अर्धविरामादि) आपण युरोपियनांकडून अलीकडे शिकलो, हे पुष्कळांना माहिती नसते. काही विद्वान संपादक मूळ लेखाच्या वाचनाच्या सौलभ्यासाठी मुळात नसलेली ही चिन्हे घालून साधनेत छापतात. तसेच मोडीत सलग ओळीवर मजकूर असतो. त्यातील शब्द तोडलेले नसतात. यामुळे झालेले अनर्थ माझ्या काही टिपणांत मी स्पष्ट करून दाखविले आहेत. तेव्हा याबद्दल काळजी आणि अभ्यास यांची अत्यंत आवश्यकता आहे. तसेच मोडीमध्ये तो तो अशा संक्षेपांचे योग्य अर्थ ठाऊक असले पाहिजेत. तात्पर्य, हे सर्व सूक्ष्म व दीर्घ अभ्यासाचे काम आहे. पत्र अस्सल असले, ते शिवाजी महाराजांचे आज्ञापत्रही असेल, म्हणून ते शिवाजीचे हस्ताक्षर टरत नाही. त्याला 'कानूजाबिता' सारख्या जुन्या नियमांचे ज्ञान पाहिजे. म्हणजे मग पत्र सर्व तऱ्हेने अस्सल असून शेवटी 'आज्ञा प्रमाण' अशी अक्षरे असतील, तर ती आज्ञा करणाऱ्या मालकाच्या (उदा. शिवाजी) हातची समजावीत. अस्सल कागदातून 'श्री' काढून पुढे मोकळी जागा टाकून मजकूर लिहिलेला असतो. या मजकुरात 'श्री' च्या पुढे अपेक्षित असलेले 'महादेव' अशा प्रकारचे देवनाम कागदावरच्या 'श्री' च्या खाली मूळ पत्र लिहिणाऱ्या मालकाचे, कारकुनाचे नव्हे, स्वतःच्या हस्ते असते. अशा अस्सल कागदाच्या अनेक नकला दप्तरांतून सापडतात. फसगत होण्याचा संभव असतो इथेही दीर्घ अभ्यास आणि दीर्घ अवलोकन ह्यामुळे आपत्ती-तून सुटका होते. काही दिवसांपूर्वी 'एकता' मासिकात 'शिवाजी महाराज का हस्ताक्षर' म्हणून एक अस्सल पत्र छापले आहे. ते पत्र निःसंशय अस्सल आहे. पण त्यात शिवाजी महाराजांचे एकही अक्षर नाही 'लेखनालंकार' असे शब्द पुष्कळ अस्सल पत्रांच्या शेवटी येतात. वळण निराळे असते. पण संभाजीच्या अस्सल दानपत्रात मंत्र्यांच्या सह्या आहेत आणि अमात्याच्या सहीच्या पूर्वी

'नारायणाध्वरींद्रस्य रघुनाथाभिधः आमात्यो दानपत्रेस्मिन लेखनालंकृती व्यधात् ।' असा अमात्यांच्याच हातचा स्वच्छ श्लोक आहे. अगदी स्पष्ट झाले. की 'लेखनालंकार' ही अक्षरे अमात्यांची असतात. म्हणून सूक्ष्म अभ्यासाची आवश्यकता सिद्ध होते.



अनुक्रमणिका

# संशोधनातील माझे अनुभव

## ग. ह. खरे

प्राच्य विद्या संशोधक किंवा इतिहास संशोधक यांचे दोन प्रकार होतात. एका प्रकारातील संशोधक दुसऱ्याने संशोधन करून उजेडात आणलेली सामग्री कालानुक्रमे व व्यवस्थित अभ्यासून तिच्या योगाने कशा प्रकारचा इतिहास समजतो हे दाखविण्याचा प्रयत्न करतो. अशा संशोधकाला संचलक म्हणणे अधिक उचित ठरेल. अशा संशोधकाचा किंवा अधिक अचूक म्हणजे संचलकाचा साधन सामग्रीच्या मालकाशी सहसा संबंध येत नाही. तो एका दृष्टीने परभृत असतो, असे म्हणण्यास हरकत नाही त्याचे सर्व कार्य इतरांनी जमविलेल्या किंवा प्रकाशिलेल्या सामग्रीवर अवलंबून असते. सामग्री जमविणाऱ्यांना कोणत्या दिव्यातून जावे लागते हे त्याला नीट समजतेच असे नाही. तथापि उत्तम संकलकाला इतिहासात फार महत्त्वाचे स्थान आहे. विशिष्ट संशोधनात आपली मजल कोठवर गेली आहे व कोणत्या दिशेने अधिक संशोधन केले पाहिजे हे उत्तम अद्ययावत संचलन हाताशी असल्याशिवाय संशोधकास समजणार नाही.

दुसरा प्रकार संशोधकाचा – हे संशोध्य विषयाची सामग्री जमविण्याचा प्रयत्न करतात आणि ती सामग्री जमविली म्हणजे तिचा खोल अभ्यास करून संशोध्य विषयावर कोणता, किती व कसा प्रकाश पडतो याची माहिती अभ्यासकांपुढे मांडतात. अशा संशोधकांनाही उत्तम संकलनाची मदत घ्यावी लागते. ती मदत घेतली नाही तर कोणती माहिती ज्ञात आहे, कोणती नवीन आहे हे समजणार नाही. म्हणून या दुसऱ्या प्रकारच्या संशोधकाला उत्तम संकलकाची नित्य मदत घ्यावी लागते. हा मुद्दा शिकागो विद्यापीठातील पुरातत्त्व खात्याचे भूतपूर्व प्राध्यापक हेईफेल्ड यांनी आपल्या "इरान इन दि एन्शण्ट ईस्ट" या ग्रंथाच्या प्रस्तावनेत उत्तम तऱ्हेने विशद केला आहे. तेथे त्यांनी उत्खनक व अभ्यासक ही जोडी घेऊन हा मुद्दा स्पष्ट केला आहे. ते म्हणतात :–

The material collected by these expeditions has become boundless, and urgently needs systematic research and elaboration. That task to-day is more urgent than the continuation of excavations The great public interest in archaeological exploration brings financial support to excavations more readily than to studies and publications, and contributes to the fact that students

अनुक्रमणिका

with insufficient archaeological training develop, for the romance of it, into excavation. Excavating is but one method of archaeological research; it is what experiment is to natural science. It produces evidence for problems that change with and depend upon the momentary stage of our knowledge. Excavating is an art but no autonomous branch of archaeology. Without intimate knowledge of the exact position of the problems, the excavator cannot solve them, nor even observe correctly in spite of all good-will. And no observation at all can satisfy the demands of future problems. If research does not keep pace with excavating, the excavator is like an experimenter run away from the scientist. He collects at - random and misses the things that matter. For not everythidg is of equal importance and the scale for importance is the ever changing state of our knowledge.

असे असले तरी दुसऱ्या प्रकारच्या अभ्यासकाला जे शारीरिक व मानसिक कष्ट पडतात ते संकलकाला पडत नाहीत. उलट अतिशय कष्ट करून सामग्री जमविणारा व तिचे उत्तम संपादन करणारा अभ्यासक सामान्य लोकांना अज्ञात राहतो आणि अत्यंत सुमार संकलकाचाही उदो उदो होतो. हा संशोधकावर एक प्रकारे सामान्य लोकांकडून अन्यायच होतो असे म्हटले पाहिजे.

मी स्वतः दोन्ही तऱ्हेचे कार्य यथाशक्ती, यथाबुद्धी व यथारुची करीत असल्याने मला दोहोंचाही अनुभव आहे व दोहोंचीही महत्ता काय आहे हे मला चांगले समजते, पण येथे त्यांपैकी फक्त संशोधकाचेच अनुभव पुढे देत आहे. तथापि ते अनुभव सांगण्यापूर्वी संशोधकाच्या बौद्धिक तयारीचा फायदा कसा होतो या विषयी चार शब्द सांगतो तत्पूर्वी त्यास पूर्वतयारी कोणती करावी लागते हेही निवेदन करतो.

आपल्या भारताचा भूतकाळ फार मोठा असल्याने त्या काळात संशोधन करणारास अनेक प्रकारची तयारी करावी लागते. इतिहासपूर्व काल, प्राचीन इतिहास काल, मध्ययुगीन इतिहास काल व अर्वाचीन इतिहास काल यांची साधने कोणती, ती कोठे सापडण्याची शक्यता, त्यांचा अभ्यास कोणत्या प्रकारच्या ग्रंथांमध्ये केलेला असतो यांविषयी त्याला अद्ययावत माहिती असावी लागते. त्याला निरनिराळ्या लिपी व अनेक भाषांचे ज्ञान असावे लागते. त्या त्या काळातील प्रमाणभूत ग्रंथांचा त्याला उत्तम परिचय असावा लागतो. तरच त्याच्या हातून उच्चस्तरीय संशोधन होऊ शकते.

मी गिड्डा असून शिवाय लठ्ठही नाही. याचा अर्थ मजपाशी आकृतिविशेष नाही

की ज्या योगाने लोकांमध्ये मला पाहिल्याबरोबर आदर उत्पन्न होईल. तथापि मी संशोधनाविषयी इतकी पूर्व तयारी केली आहे की, माझी कोणतीही संशोधनयात्रा सहसा फुकट गेली नाही. मी स्वतःची प्रौढी सांगत नाही. पण मी इतिहासपूर्व कालीन अश्मायुधे, खापरे इत्यादींपासून ते इंग्रजी अमलापर्यंतच्या सर्व इतिहास कालांतील साधनांचा तत्काल शंका निरसनाइतका अभ्यास केला आहे. मला अश्मायुधे व खापरें काय हे समजते. मौर्यकालीन आहत नाण्यांपासून ते आधुनिक कालापर्यंतच्या भारतीय नाण्यांचा अभ्यास मी केला आहे. इतिहास कालातील बहुतेक सर्व भारतीय लिपी मला अवगत असून मराठी, संस्कृत, फार्सी, इंग्रजी अशा अनेकविध साधनांचे मला चांगले ज्ञान आहे. मूर्तिशिल्प, वास्तुशिल्प यांशी माझा उत्तम परिचय आहे. भारतीय चित्रकला मी जाणतो. विविध कालगणनांची माहिती मला चांगली आहे. प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन इतिहास लक्षात येण्याइतका मला ज्ञात आहे. अशी प्रत्ययाची पूर्व तयारी मी केली असल्याने मला सर्वत्र उण्या अधिक प्रमाणात यश मिळत गेले.

पुरातत्त्व संशोधनाला मर्यादा नाही. तथापि संशोधक ज्या प्रदेशात रहात असेल त्या प्रदेशाविषयी त्याला जवळीक असल्यामुळे त्या प्रदेशाच्या इतिहासाचा तो अधिक अभ्यास करतो व त्यातच संशोधन करण्याची आशा बाळगून असतो. तथापि त्या प्रदेशातील संशोधनाला आवश्यक अशी पूर्वतयारी करणे त्याच्या शक्तीबाहेरचे असते. त्यामुळे पुष्कळ वेळा त्याचा संशोधनाविषयीचा उत्साह मावळून जातो. उदाहरणार्थ, अनेक सुशिक्षितांना संशोधन करण्याची इच्छा असते, पण कागदपत्र शोधावे तर अगदी जवळच्या काळातील मोडीही वाचता येत नाही. फार्सीचे तर नावच नको. कुठे शिलालेख दिसला तर त्याचे ठसे कसे घ्यावयाचे हेही समजत नाही आणि जुन्या लिपीशीही परिचय नसतो. यामुळे शिलालेख वाचनात त्याला प्रगती करता येत नाही. तीच स्थिति ताम्रशासनांची असते. नाण्यांचा अभ्यास करावा तर नाण्यावर लिहिलेला अर्धवट मजकूर पूर्ण कसा करावा हे त्याला समजत नाही. आणि मजकूर पूर्ण केल्याशिवाय अर्थबोध होत नाही. शिवाय रोज पाहाण्यात येणाऱ्या जुन्या भारतीय नाण्यांपैकी ३/४ तरी नाणी फार्सी लिपीत असल्यामुळे ती लिपी चांगली अवगत असल्या-खेरीज त्या लिपीतील नाणी त्याला समजत नाहीत.

संशोधकाने अनेकविध साधनांचा अभ्यास केला असला म्हणजे त्याची संशोधन-यात्रा नेहमी कशी सफल होते याचे एक उदाहरण देतो. मी घोडनदी येथे व्याख्यानां-साठी दोनतीन वेळा गेलो होतो. एकदा घोडनदीजवळील देवळे पाहिली. त्यांच्या रचनेत ( बांधणीत ) मला कोणतेच खास वैशिष्ट्य आढळले नाही. पण दुसऱ्या एका व्याख्यान प्रसंगी घोडनदीच्या वाळवंटात कॉलेजमधील दोनतीन विद्यार्थ्यांना घेऊन हिंडत असताना मला पाचपन्नास लघु अश्मायुधे आढळली. शिवाय दोन

लाख ते दोन कोटी या वयाचा अश्मीभूत लाकडाचा तुकडा मला मिळाला. त्या नदीच्या पात्रात तो कोठून आला हे समजण्यास मार्ग नाही. यामुळे त्याचा काळ ठरविणे कठीण आहे. पण असे अवशेष सापडता सापडता घोडनदीच्या काठी असलेल्या इनामगाव येथील इतिहासपूर्वकालीन वसाहतीचा शोध इतर संशोधकांना लागला हे लक्षात ठेवण्यासारखे आहे.

मी एकदा सोलापूर जिल्ह्यापैकी माढे तालुक्यातील वाफळे या गावी एका शिलालेखाचे ठसे घेण्याकरिता गेलो होतो. सोलापूर गॅझेटियरमध्ये सांगितल्याप्रमाणे त्या गावच्या देवीच्या देवळात शिलालेख होता. मी तो शिलालेख वाफळे गावच्या काही गावकऱ्यांच्या साह्याने धुऊन ठसा घेण्याच्या कामास लागलो. पण पाटलासह तेथील बहुसंख्य गावकऱ्यांची अशी समजूत झाली की, त्या शिलालेखामध्ये गावात कोणत्यातरी ठिकाणी धन ठेवल्याचे सांगितले आहे. ते समजून घेऊन मी ते धन घेऊन जाणार. मी त्या गावकऱ्यांना पुष्कळ समजावून सांगण्याचा प्रयत्न केला की, या शिलालेखाची लिपी जुनी असल्यामुळे तुम्हाला वाचता येत नाही एवढेच. एखाद्या गुप्त ठिकाणी धन ठेवल्याचे सांगणारा व त्याप्रमाणे धन मिळालेला असा एकही शिलालेख किंवा ताम्रपट किंवा कागद मिळालेला नाही. जे मिळाले ते सर्व खोटे ठरलेले आहेत. तेव्हा तुमची भीती व्यर्थ आहे. तरी तुम्ही शिलालेखाचा ठसा घेण्यास साह्य करा. पण काही केल्या त्यांची समजूत पटेना आणि गावकऱ्यांनी तो मोठा शिलालेख उपडा करून टाकला. यामुळे मला काही काम न करता परत यावे लागले.

पूर्वीच्या निजामी राज्यात एक निराळाच अनुभव मला आला. त्या राज्यातील बहुतेक उच्चपदस्थ अधिकारी निर्बुद्ध मुसलमान असत. त्या राज्यातील काटी या गावी एका शिलालेखाचा ठसा घेण्यास मी गेलो होतो. पूर्व तयारी सर्व केली. इतक्यात तेथील फौजदार मजकडे आला आणि म्हणाला "खबरदार! कतबको हाथ नही लगाना. अभी एक जवान भेज देता हूँ, आप कैसा हाथ लगाते देख लूँगा। मला ही तंबी दिल्याने निजामी राज्यातील भेकड लोक तात्काळ आपापल्या घरी निघून गेले, आणि मला ठसा घेण्याचे काम थांबवावे लागले. मी काटी गावी ज्या गृहस्थाकडे उतरलो होतो ते फौजदाराच्या कचेरीत हेडक्लार्क होते. त्यांनी फौजदाराला सांगितले "यह तो तारीखी काम है। छाप लेनेसे कतबा खराब तो नही हो सकता।" एवढ्यानेच त्या फौजदाराची समजूत पटली आणि त्याने मला छाप घेण्याची परवानगी दिली. पण यात माझा एक दिवस फुकट गेला.

आता येथे एक गोड अनुभव नमूद करतो. मी एकदा विजापूरला संशोधनासाठी गेलो असता डॉ वझे यांजकडे उतरलो होतो. त्याच्या घरासमोरच रावबहादूर आलमेले देसाई रहात होते. त्यांजकडे फार्सी-मराठी कागद आहेत असे समजल्या-करून मी गेलो होतो. त्यांनी आपल्याकडील कागद दाखविले. फार्सी व मराठी

दोन्ही कागदांचे त्यांना अर्थ समजावून सांगितले. मी फार्सी कागद मोडी इतक्याच सहजतेने वाचू शकतो हे पाहून त्यांना आश्चर्याचा धक्का बसला. ते मला म्हणाले " आपल्या ज्ञानाविषयी माझे पूर्ण समाधान झाले आहे. माझे हे सर्व कागद प्रसिद्धी करिता तुमच्याजवळ देतोच; पण तुम्ही येथे येऊन माझे कागदपत्र पाहिले याबद्दल मी तुम्हाला दुसऱ्या वर्गाचा भाडेखर्चही देतो. " असे म्हणून त्यांनी त्या वेळच्या दुसऱ्या वर्गाच्या दुहेरी भाड्यापेक्षा चार रुपये अधिकच माझ्या हातावर टेवले. मी त्यांना धन्यवाद देऊन परतलो.

दुसरा असाच एक गोड अनुभव आहे. मी संशोधनासाठी इ. १९३७ ते ३९ या काळात कर्नाटकात हिंडत असता मला समजले की, सावनूरच्या नबाबाचे त्या वेळचे दिवाण श्री. पाडगावकर यांना नुकतेच काही ताम्रपट मिळाले आहेत. म्हणून मी त्यांजकडे गेलो व त्यांना भारत इतिहास संशोधक मंडळासाठी ते ताम्रपट द्या म्हणून विनंती केली. त्यांनी विनंती तावडतोब मान्य केली. पण अट घातली की, त्या ताम्रपटांचा सारांश तावडतोब मला सांगितला पाहिजे. आता त्यातील एक ताम्रपट बदामी चालुक्यापैकी पहिला विक्रमादित्य याचा शक ५९१ चा होता. एरवी एखादा संशोधक गोंधळून गेला असता, पण मी तत्कालीन ताम्रपट मुळावरून वाचून प्रकाशित केले असल्यामुळे माझी तत्कालीन लिपी चांगली तयार होती. मी तावडतोब त्या ताम्रपटांचा सारांश त्यांना सांगितला. त्यावर ते इतके खुश झाले की, त्यांनी आपल्या जवळचे ताम्रपट तावडतोब मंडळाला देऊन टाकले. ते आज मंडळात सुरक्षित आहेत. एका तासात ते ताम्रपट घेऊन मी हुबळीस परतलो.

विद्वत्तेचा व नम्रतेचा परिणाम काय होतो याचे एक उदाहरण येथे देतो. धारवाड जिल्ह्यात गदग हे एक तालुक्याचे ठिकाण आहे. तेथे देसाई घराणे असल्याचे मला समजले होते. त्या घराण्याकडे माझ्या अगोदर सर जदुनाथ सरकार व रा. ब. सरदेसाई गेले होते. पण त्यांची जाण्याची तऱ्हा काही वेगळीच! दोघे एका टॅक्सी-मध्ये बसून त्यांच्या घरासमोर आले. सरकार टॅक्सीमध्येच बसून होते. सरदेसाई देसायांच्या घरात गेले व उभ्या उभ्याच तुमच्याकडे काही जुने कागद आहेत का? म्हणून विचारते झाले. त्यांची ही पद्धत गदगच्या देसायांना अतिशय चमत्कारिक वाटली. त्या देसायानी तावडतोब उत्तर दिले " मजकडे कागद वगैरे काही एक नाही " हे उत्तर ऐकून दोघेही तेथून निघून गेले. मी एके दिवशी सकाळीच उपर्युक्त गदग देसायांच्याकडे गेलो. माझे नाव, गाव, धंदा इत्यादी सागून आपल्याकडे मराठी, फार्सी, कानडी इ. कागद आहेत का म्हणून विचारले. मला फार्सी चांगले येत असल्यामुळे आपणाकडील फार्सी कागदांचा अर्थही मी आपणांस सागू शकेन असे त्यांस सांगितले. त्यावर ते एवढेच उत्तरले की, " आपणास फार्सी येत आहे: मी कागद दाखवतो " आणि त्यांनी जुन्या कागदांचे एक दप्तर काढले. त्यांतील

फार्सी कागदांचा सारांश सांगण्यात माझे सुमारे चार तास गेले. मग ते मला म्हणाले, "आता जेवणाची वेळ झाली. तुम्ही कुठे उतरला आहा? मजकडे जेवा ना!" मी सांगितले, "डॉ. हइलगोळ यांजकडे उतरलो आहे. त्यांचे घर आणि आपले घर मला सारखेच! आपल्याकडे जेवीन." मग त्यांचेकडे भोजन उरकले. नंतर त्यांनी मला सांगितले "माझे मूळ गाव सोरटूर येथे आणखी काही कागद आहेत. तुम्ही तेथे येत असल्यास ते मी तुम्हाला दाखवीन. महाशिवरात्रीच्या दिवशी सोरटूरला जावयाचे असे ठरवून व हे फार्सी कागद घेऊन मी त्यांचे घर सोडले. ठरल्याप्रमाणे आम्ही दोघेही महाशिवरात्रीच्या दिवशी त्यांच्या सोरटूर या गावी गेलो व कागद तपासले. ते पक्के वैष्णव असल्यामुळे त्यांचे घरी त्या दिवशी कडबू केले होते. त्यांचा यथाशक्ति समाचार व कागद घेऊन हुबळी येथे मुक्कामास परतलो.

दुसरी हकीकत भोर संस्थानातील अंबाडे गावच्या खोपड्यांविषयी आहे. तेथील देसाई नाईकजी खोपडे यांजकडे कागद असल्याचे समजल्यावरून एका सकाळीच त्यांचे गाव अंबाडे येथे चालत गेलो. त्यावेळी नाईकजी खोपडे शेतावर गेले होते. त्यांचा मुलगा घरी होता. त्यांना माझे येण्याचे कारण खुलासेवार सांगताच त्यांनी आपले वडिलांचेकडे उर्दू कागद आहेत म्हणून सांगितले. ते पहावयास मिळतील या आशेने संध्याकाळपर्यंत मी तेथेच राहिलो. संध्याकाळी नाईकजी खोपडे घरी आल्यावर त्यांना कागदांबद्दल विचारले. त्यांनी साफ उत्तर दिले की माझ्या मुलाला काही ठाऊक नाही. मजकडे मोडी किंवा फारसी कागद मुळीच नाहीत. त्यामुळे मला हात हलवीत परत यावे लागले. पुढे काही दिवसांनी भोर संस्थानाने एक हुकूम काढून, सर्व लोकांना व प्रजाजनांना कळविले की, ज्या कोणाचे डोंगर, कुरणे वगैरेंवर हक्क असतील त्यांनी ते कागदपत्रांचा आधार दाखवून सिद्ध करावे. नाहीतर भोर संस्थानातील यच्चयावत डोंगर, कुरणे, माळरान इत्यादी सर्व भोर संस्थानचे आहे असे समजून त्याप्रमाणे कागदपत्री नोंद करू. आता त्यांची कुरणे, माळरान इत्यादी जाण्याची वेळ आली म्हणून नाईकजी खोपडे यांना घरातील फार्सी व मोडी कागद वाचून घेण्याची उत्कंठा लागली. तेव्हा ते आपल्या जवळचे सर्व कागद घेऊन पुण्यामध्ये मजकडे आले.

तिसरे उदाहरण सोलापुरास घडलेले आहे. तेथे १९४२ मध्ये चित्राव आडनावाच्या एका बाईकडे कागद असल्याचे समजले म्हणून त्याजकडे गेलो. त्यांनी मला फार्सी वाचता व अर्थ सांगता येतो की नाही याची थोडी चाचणी घेतली. मला फार्सी समजते याची त्याजकडे खात्री झाल्यावर असलेले फार्सी मोडी कागद त्यांनी मला एका खोलीत नेऊन गुपचूप दाखविले. मी त्यांना त्यांचे अर्थ समजावून सांगितले. त्यावेळी दुर्दैवाने त्यांच्या मुलाच्या दत्तक प्रकरणी कोर्टामध्ये एक फिर्याद चालू होती आणि त्यांच्या वकिलाने त्यांना सूचना देऊन ठेवली होती की हे कागद तुम्ही

कोणासही देऊ तर नकाच, पण दाखवूही नका. त्याप्रमाणे मी सुमारे बारा वर्षे त्या कागदांसाठी खटपट करीत होतो. तरीही ते कागद त्या बाईनी माझ्या हाती लागू दिले नाहीत. शेवटी सोलापुरातील एका सज्जन डॉक्टरांना ही हकीगत मी सांगितली. ते मंडळाचे अभिमानी होते. त्यांनी आपला कारकून माझ्या बरोबर दिला. कारकुनाने त्या बाईना यांना कागद द्या असे सांगताच ते सर्व कागद त्यांनी माझे हवाली केले, आणि आश्चर्याची गोष्ट अशी की, नंतर त्यांनी एकदाही त्या कागदांची पुन्हा चौकशी केली नाही. जवळजवळ अशीच हकीगत सोलापूरच्या देशमुखांकडील कागदांची आहे. त्याजकडील कागद या डॉक्टरांच्या साह्याने त्याच दिवशी मला मिळाले. नंतर ते देसाई कागद मागण्यासाठी मजकडे आले तेव्हा त्या कागदासंबंधी मी तीन लेख वर्तमानपत्रात प्रसिद्ध केले. त्याचा एवढा परिणाम झाला की त्या देशमुखांना ते कागद कायमचे मंडळातच राहू द्या असे आवर्जून सांगितले.

आता एक काहीसा चमत्कारिक अनुभव सांगतो. १९४२ मध्ये महायुद्धाच्या ऐन धुमश्चक्रीत त्रिवेंद्रम येथे भरणाऱ्या इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्डस् कमिशनच्या बैठकीस उपस्थित राहण्यासाठी मंडळाचा प्रतिनिधी या नात्याने मी गेलो होतो. तेथून परत येताना मी महाबलिपुरम् येथील अवशेष पाहाण्यासाठी तिरूक्कुळकुण्रम् येथून एक एक्का भाड्याने करून गेलो. तेथे असलेल्या एका टेकडीवरील देऊळ पाहाण्यासाठी मी गेलो होतो. तेथे प्रॉहिबिटेड एरिया म्हणून फलक होता. तथापि देऊळ पाहाण्यास कोण मनाई करणार या कल्पनेने मी देऊळ पाहिले. एवढ्यात एक शिपाई तेथे आला, आणि मला म्हणाला, "आपने बोर्ड नही देखा?" त्यावर मी उत्तरलो, "हां देखा, किन्तु मंदिर देखने के लिये आया हूँ." इतक्यात त्या शिपायाचे आणखी दोन साथीदार आले. त्यांनी पक्की कल्पना करून घेतली की, मी जपानी हेर आहे. तेव्हा ते शिपाई मला त्यांच्या प्रमुखाकडे घेऊन गेले. ते प्रमुख महाराष्ट्रीय होते. त्यांना मी माझी सर्व हकीगत सांगितली. तेव्हा त्यांनी मला मी एक सच्चा भारतीय आहे या दृष्टीने मार्गस्थ केले. त्यावर ते शिपाई आपल्या प्रमुखांस म्हणाले, "साब आप इनको छोड देते है यह बडी अफसोझकी बात है। देखिये इनका कद छोटा है। उनका रंग गोरासा है,। इनको यहाँ की जबाब आती नही। हमे तो यह बिल्कुल जापानी जासूस मालूम होते है।" या शिपायांचा त्या प्रमुखावर इतका प्रभाव पडला की, ते प्रमुख मी परत जात आहे की नाही हे पहाण्यासाठी तेथील वस्तीच्या बाहेर येऊन बसले होते.

नेहमीच्या रुळलेल्या मार्गाने जाणाऱ्या विद्यार्थ्यास संशोधक बनणे सोपे असते. पण माझ्यासारख्या अर्धवट शिक्षण सोडलेल्यास संशोधक बनणे फार अवघड गेले. मी पहिल्याच वर्षी असहकारितेत कॉलेज सोडून साडेतीन चार वर्षे कारागृहादि लढाऊ राजकारणात भाग घेतल्यानंतर संशोधनाच्या क्षेत्रात पडण्याचे ठरविले.

तेव्हा मला मराठी, संस्कृत व इंग्रजी या तीनच भाषा समजत होत्या. संशोधनासाठी कोणत्या तऱ्हेची पूर्व तयारी लागते हे सांगणाराही कोणी नव्हता. मग त्यात मार्ग-दर्शन कोण व कसे करणार ? यामुळे प्रत्येक बाबतीत ग्रंथ हेच माझे गुरू टरले. लेखांचे ठसे कसे घ्यावयाचे हे चुकत चुकत अनुभवानेच मी शिकलो. ज्ञानकोशावरून ब्राह्मी सर्व भारतीय लिपींची माता आहे. एवढे माझ्या ध्यानात आले. पण त्या विविध लिपी अवगत कशा करून घ्याव्या हे सांगणारे कोणीही नव्हते. मग मी अशोकाच्या प्रतिज्ञापत्रासह असलेल्या लेखांचे पुस्तक माझ्या एका मित्राकडून आणून ब्राह्मी लिपी आत्मसात केली. पुढे ज्या ज्या वेळी बदामी चालुक्य किंवा राष्ट्रकूट यांचे ताम्रपट मला वाचण्यासाठी मिळाले तेव्हा केवळ पुस्तकांच्या साह्याने मी ते वाचू शकलो. आणि त्यामुळे मला तेराव्या शतकापर्यंतची ताम्रशिला शासने वाचणे सहज शक्य झाले.

महाराष्ट्र केन्द्र कल्पून उत्तम आणि पुष्कळ संशोधन करावयाचे असेल तर महाराष्ट्रीयाला फारसी व कानडी या दोन भाषा तरी चांगल्या येणे अतिशय आवश्यक आहे. मी संशोधनाच्या क्षेत्रात पडलो तेव्हा मला पहिल्या चार इयत्तांइतके उर्दू येत होते. पण मराठी व संस्कृत यांत जेवढे अंतर तेवढेच उर्दू व फारसी यांमध्ये आहे. आणि फारसी तर आपणास आलेच पाहिजे अशी माझी खात्री झाली होती. पण शिकविणारा कोणीच नव्हता. तेव्हा फारसीचे एक लघुव्याकरण व त्या भाषेची प्राथमिक पुस्तके यांचा माझा मीच अभ्यास करू लागलो. त्या बाबतीत फार्सी लिपी सदोष असल्यामुळे व उच्चार सांगणारा गुरू कोणी नसल्यामुळे पुष्कळ दिवस माझे उच्चार चुकत. तथापि फार्सी भाषा आपणास यावी म्हणून मी प्राथमिक पुस्तकांच्या व लघुव्याकरणाच्या १००, १०० आवृत्तीही केल्या. आणि शेवटी खूप प्रयत्न करून फार्सी भाषा आत्मसात केली. फार्सी लिपीचे वाचन करणे भाषेच्या अभ्यासाच्या मानाने फारच अवघड आहे. त्यासाठी अरबी भाषेतील शब्दसिद्धी तरी अवगत असावयास पाहिजेच. तेव्हा मी त्या अरबी शब्दसिद्धीचाही अभ्यास केला. एवढेच नव्हे तर फार्सी साधनांचे सहा खंड प्रकाशित केले. फार्सी भाषेच्या मानाने कानडी शिकणे पुष्कळ सोपे गेले. प्राथमिक अभ्यासासाठी एका कानडी मातृभाषा असणाऱ्या विद्यार्थ्याची शिकवणीच टेवली होती. यामुळे तिचा अभ्यास करणे अवघड गेले नाही. मला दुःख एवढेच होते की, मी या दोन भाषांच्या ज्ञानाचे जे भांडवल मी जमविले त्याचा आवश्यक तितका उपयोग करून त्या त्या भाषेतील साधनांचे प्रकाशन किंवा संकलनात्मक लेखन मी करू शकलो नाही.

नाण्यांच्या अभ्यासाचीही हीच स्थिती आहे. नाण्यांचा अभ्यास कसा करावा हे सांगणारा मला कोणीच भेटला नाही. नाण्यांचा अभ्यासही माझा मीच केला आणि तो इतक्या उच्च दर्जाचा की मजपाशी विद्यापीठाची कोणतीही पदवी नसतानाही मी

अखिल भारतीय मुद्रा परिषदेचा अध्यक्ष निवडला गेलो. एवढेच नव्हे तर मुद्रा शास्त्रातील माझे लेख महत्त्वपूर्ण आहेत हे त्या विषयाचे ज्ञाते मान्य करतात. त्यांना ते तसे मान्य नसते तर माझी मुद्रा शास्त्रज्ञांनी अध्यक्षपदी नेमणूकही केली नसती.

मूर्तिशिल्प व वास्तुशिल्प या बाबतीतही मला त्या विषयांवरील ग्रंथाखेरीज कोणीच गुरू भेटला नाही. तीच स्थिती प्राचीन चित्रकलेचीही आहे. या सर्व विषयांचा अभ्यास माझा मीच केला असून त्या विषयांवरील माझे लेख प्रमाणभूत असेच आहेत.

---

## साभार स्वीकार / इतिहास, धर्म, इ.

**श्री गीता–सेवक :** पांडुरंग म. बापट; सेनापती बापट जन्मशताब्दी महोत्सव समिती; मुंबई. (२ री आ.) १९८१; रु. ८.

**परमेश्वरावर मात :** ए. हरनाथ–ए. सूर्यनारायण, डॉ. शरद अभ्यंकर; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८१; रु. १५.

**महाराष्ट्रातील किल्ले :** शं. रा. देवळे; कृ. ग. ठोकळ; पुणे २, १९८१; रु. १५.

**प्रकाशित लेख, साधने, इ. सूची :** (इतिहास संशोधक मंडळ, पुणे) परचुरे चिं. ना. कानडे मु. श्री. (संपादित) भारत इति. संशो. मंडळ, पुणे ३०; १९८१.

**जॉर्ज वॉशिंग्टनच्या देशात (प्रवास वर्णन) :** म. वि. गोखले; साहित्य प्रसार केंद्र; नागपूर; १९८०; रु. २१.

## साभार स्वीकार / नाटक, एकांकिका

**प्रत्येकाला जोडा चावतो :** मधुकर आष्टीकर; मेधा आष्टीकर, नागपूर; १९७९; (३ री आ.) रु. ६.

**तीन एकांकिका :** मधुकर आष्टीकर; मेधा आष्टीकर, नागपूर; १९८१; रु. ५.

**पंखांना ओढ पावलांची :** वसंत कानेटकर; कॉंटिनेंटल प्रकाशन; पुणे; १९८१; रु. ६.

**आप्पाजींची सेक्रेटरी :** वसंत सबनीस; कॉंटिनेंटल प्रकाशन. पुणे; १९८१; रु. ६.

# संशोधनातील माझे अनुभव

शं. गो. तुळपुळे

---

मी काही असा मोटा 'संशोधक' नाही की ज्याने आपले संशोधनातील अनुभव सांगावे. मी एक साधा अभ्यासक आहे आणि अभ्यास करताना आलेल्या काही अडचणी येथे सांगत आहे. पैकी 'प्रथम ग्रासे मक्षिकापात' स्वरूपाची पहिली मोठी अडचण म्हणजे अभ्यासाविषयी जी एक पोटतिडीक किंवा कळवळा असावा लागतो त्याचा अभाव. भक्तीप्रमाणे अभ्यासाची आवडही उपजत असावी लागते. ती माझ्यात नाही. त्यामुळे अभ्यास केला तरी त्याला तेज चढत नाही. पण या गोष्टीला आता उपाय नाही. आहे त्यातच भागवले पाहिजे.

एम. ए. च्या परीक्षेसाठी केलेला अभ्यास हा काही खऱ्या अर्थाने अभ्यास म्हणता येणार नाही. पण त्यातही गुरुजनांपैकी कोणी प्रतिभावान असेल तर भावी अभ्यासाची निदान दिशा तरी कळू शकते. असे एक गुरू मला सुदैवाने लाभले. ते म्हणजे ( महामहोपाध्याय ) दत्तो वामन पोतदार. मी माझ्या 'ऋद्धिपुरवर्णना'च्या संपादकीय निवेदनात त्यांच्याविषयी जे लिहिले आहे ते खरेच आहे. "ते शिकवीत थोडे, पण सुचवीत पुष्कळ. त्यामुळे त्यांचे शिकवणे परीक्षेच्या दृष्टीने विशेष उपयोगी पडले नाही तरी जुन्या मराठी वाङ्मयाकडे पाहण्याची दृष्टी त्यांच्याकडून मिळाली. हा लाभ मी विशेष महत्त्वाचा मानतो." मुख्य म्हणजे गुरुवर्य दत्तोपंतांनी आम्हा विद्यार्थ्यांची जिज्ञासा जागृत केली आणि मराठी भाषेच्या वाङ्मयाच्या अभ्यासाच्या निरनिराळ्या दिशा सूचित केल्या. त्यामुळेच एम. ए. झाल्यावर विषयाचा घोळ न घालता मी 'यादव कालीन मराठी भाषा' हा पीएच.डी. च्या प्रबंधाचा विषय म्हणून लगेच निश्चित करू शकलो. त्यात अननुभवामुळे एक चूक मात्र झाली. विषय फार व्यापक झाला. त्यापेक्षा यादवकालातील एखादा विशिष्ट ग्रंथ निवडला असता तर अभ्यासाला अधिक काटेकोरपणा आला असता. आहे त्या स्थितीत हा अभ्यास फार स्थूल वाटतो. पण त्यावरून एक धडा शिकलो, की अभ्यासाच्या विषयाचे स्वरूप मर्यादित असावे. असो. त्या काळात मार्गदर्शन असे घेतानाच असे. माझे मार्गदर्शक होते श्री. तात्यासाहेब केळकर, आणि त्यांनी मला प्रारंभीच मोकळेपणाने सांगून टाकले की या विषयात आपल्याला विशेष गम्य नाही आणि रसही नाही. त्यामुळे हा पहिला अभ्यास मी जवळजवळ स्वतंत्रपणेच केला. नाही म्हणावयास डॉ. प. ल. वैद्य आणि डॉ. सु. मं. कत्रे यांनी प्रारंभीचे मार्गदर्शन केले, आणि

अनुक्रमणिका

माझ्या प्रबंधात काही बरा भाग असेल तर त्याचे श्रेय वरील विद्वद्द्वयाकडे आहे. कार्ड-इंडेक्स करण्यापासून त्यांनी मला शिकवले. त्याप्रमाणे प्रबंध पूर्ण झाला, मला डॉक्टरेट देऊन गेला आणि पुढे लौकरच प्रसिद्धही झाला (१९४२). त्याचे कौतुकही अपेक्षेहून थोडे अधिकच झाले. पण हे सर्व होऊनही मी तद्विषयक अभ्यास पुढे चालू ठेवू शकलो नाही. त्याला कारणेही होती. एक म्हणजे त्या काळात मी सोलापूर, बेळगाव यांसारख्या थोडया आडगावी असल्यामुळे हाताशी अभ्यासाची साधने बेतावाताची असत आणि दुसरे म्हणजे, भाषाविषयातून मन काढून मी ते 'पाच संतकवी' सारख्या निराळया विषयात घातले होते. पहिल्या 'यादवकालीन' या ग्रंथात संशोधनाचा थाट तरी होता; पण दुसऱ्यात तोही नव्हता. कारण 'पाच संतकवी'विषयी मी नवीन असे काहीच सांगू शकत नव्हतो. गुरुदेव रानडे यांच्या पद्धतीने केलेले संतकाव्याचे ते एक समालोचन होते आणि तितक्यापुरते ते यशस्वीही ठरले. त्यात 'अभ्यास' असला तरी त्याचे स्वरूप सौम्य होते. त्यामुळे तो ग्रंथ सर्वमान्य झाला तरी त्यामुळे मी स्वतः फारसा पुढे गेलो नाही.

अशी आणखी काही वर्षे गेली, आणि १९५० च्या एप्रिलमध्ये मी पुणे विद्यापीठात मराठीचा प्राध्यापक आणि विभाग प्रमुख म्हणून कामावर रुजू झालो. या नवीन जागेची जबाबदारी मोठी व निराळ्या स्वरूपाची होती. त्यात संशोधनाला वाव होता. इतकेच नव्हे तर ते स्वतः करणे व विद्यार्थ्यांकडून करविणे आवश्यक होते. किंबहुना ही जागा त्यासाठीच होती. त्यामुळे मला या दोन्ही वाटा पाहाव्या लागल्या. विभाग-प्रमुखाने विभागातर्फे एखादी योजना आखून त्याप्रमाणे कामाला लागणे जरूर होते व त्यामुळे त्यापूर्वीपासून मनात असलेली मराठीतील कोरीव लेखांच्या अभ्यासाची योजना मी हातात घेतली व त्या वेळी डेक्कन कॉलेजात असलेले डॉ. मो. गं. दीक्षित यांच्या सल्ल्याने कोरीव लेखांचे ठसे गोळा करण्याच्या उद्योगास लागलो. त्या कामात आलेले अनुभव मी 'प्राचीन मराठी कोरीव लेख' या माझ्या ग्रंथाच्या प्रारंभीच्या निवेदनात दिलेले असल्यामुळे येथे त्यांचा पुनरुच्चार करण्याचे कारण नाही. इतके खरे की त्या अभ्यासाची बारा वर्षे, म्हणजे एक संपूर्ण तप, ज्ञानार्जनात गेली व अभ्यासाची नवनवी क्षेत्रे ज्ञात होऊ लागली; निदान त्याची जाणीव होऊ लागली. कोरीव लेखांच्या या अभ्यासाबरोबर पीएच. डी. च्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शनही करावे लागे व त्यामुळे वरील जाणीव अधिकच वाढली. किंबहुना स्वतःचे अपुरेपण, कच्चेपण हेच अधिकाधिक जाणवू लागले. याच सुमारास पुण्याच्या डेक्कन कॉलेजात डॉ. कत्रे यांच्या नेतृत्वाने भाषाशास्त्राचे वासंतिक वर्ग भरू लागले व त्यातून डॉ. सुनीतिकुमार चतर्जी यांच्यासारख्या जगद्विख्यात भाषापंडितांच्या विद्वत्तेचा व अध्यापनाचा लाभ मिळू लागला. पण ही नामी संधी मी गमावली याची मला खंत वाटते. नाही म्हणावयास डॉ. चतर्जी यांच्या प्रेरणेने मी प्राचीन मराठीचे एक

लिंग्विस्टिक रीडर तयार करण्याचे काम अंगावर घेतले व त्याप्रमाणे दोन-तीन वर्षे मेहनत करून "An Old Marathi Reader" हे पुस्तक प्रसिद्धही केले. शिवाय डॉ. कत्रे यांच्याच सल्ल्याने मराठीच्या बोलींचा एक तौलनिक शब्दकोशही मी मराठी-विभागाच्या वतीने हाती घेतला आणि त्यासाठी सरकारी पंचवार्षिक योजनेतून अनुदानही मिळत गेले. पण या कामात अडचणी पुष्कळ आल्या. मुख्य म्हणजे स्वतःची अनभिज्ञता आणि जाणत्या व तळमळीच्या अभ्यासकांची उणीव. या योजनेसाठी मला डॉ. सु. बा. कुलकर्णी हे एकच निष्ठावंत व भाषाभ्यासप्रेमी असे सहायक मिळाले. पण तेही लौकरच विद्यापीठातील नोकरी सोडून प्रथम डेक्कन कॉलेजात व नंतर नागपूर विद्यापीठात गेले. त्यामुळे व इतरही अनेक कारणांनी मराठी बोलींच्या शब्दकोशाचे हे काम माझ्या हातून पूर्ण होऊ शकले नाही याचे दुःख मला अजूनही आहे. तीच गोष्ट मी एकाकीपणाने अंगावर घेतलेल्या यादव-कालीन मराठीच्या शब्दकोशाचीही झाली. त्या कामी मला डॉ. मु. श्री. कानडे यांची पुष्कळ मदत झाली, पण शेवटी तेही काम अपुरेच राहिले. प्राचीन मराठी ग्रंथांची संपादने मी बरीच केली. पण त्यात 'ऋद्धिपूरवर्णना'चे संपादन हेच काय ते स्वतंत्र या सदरात जमा होण्यासारखे आहे.

हे सर्व मी मोकळेपणाने लिहीत आहे. त्यात कोणाविषयी तक्रार नाही. असलीच तर ती स्वतःविषयी आहे. कारण प्रारंभीच सांगितले त्याप्रमाणे मुळातच कमी तेथे प्रत्यक्षात किती उतरणार ? मार्गदर्शक व अभ्यासाची साधने यांची उणीव पडली नाही. तसे पाहिल्यास पुणे विद्यापीठात काही कमी नव्हते. शिवाय डॉ. रा. ना. दांडेकरांसारख्या अखंड अभ्यासकाचा स्फूर्तिदायक शेजार होता. पण त्याचा लाभ मी जितका करून घ्यावयास पाहिजे होता तितका घेतला नाही याचे आज वाईट वाटते. समाधान इतकेच की हे सर्व सोडून जाताना "काहीच वेचिले नाही। शेवटी हात झाडिले" असे निदान लौकिक दृष्टीने तरी वाटणार नाही. थोडेफार वेचले, पण ते इतके अत्यल्प की त्याची नोंद करण्यातही काही अर्थ नाही. यातून एक निष्कर्ष मात्र निघतो, आणि तो सर्वांनाच विचारार्ह वाटेल. तो असा, की अभ्यास किंवा संशोधन हे सतीचे वाण आहे. ते पूर्ण विचार करून व तयारीनेच उचलावे. कारण, कोणताही अभ्यास सोपा नाही. तो करणाराचे सर्वस्व मागतो. रामदासांनी आपल्या 'एकवीस-समासी'त एक ओवी लिहिली आहे —

"व्हावया वस्तुची प्राप्ती।
साधक साधने करिती।
तव ते वस्तु आहुती।
साधकाची मागे॥"

वरील विचार जसा परमार्थात तसाच एहिकातही खरा आहे. तेथेही अभ्यासकांना

आहुती पडावी लागते. ती देण्याची माझी तरी कुवत व तयारीही नव्हती. ज्यांची होती त्यांनी ती दिली व तिच्या मोबदल्यात ते एका अपूर्व अशा श्रेयाचे वाटेकरी झाले. एकच उदाहरण द्यावयाचे तर इतिहासाचार्य राजवाडे यांचे देता येईल. त्यांनी संशोधनासाठी जशी फकिरी पतकरली तशी पतकरण्याची अभ्यासकाची तयारी पाहिजे.

■

---

## साभार स्वीकार / कादंबरी

झाड : सौ. शैला बेल्ले, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे ३० १९८१; रु. १६
सर्जन : बी. एन्. लोणकर; सौ. विमल लोणकर, पुणे ९, १९८१; रु. १६.
सुखदा.: अच्युत बर्वे; मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई; १९८१; रु. ४०.
अस्वस्थ किनारा : भगवान अंजनीकर; रिमझिम प्रका., औरंगाबाद; १९८१; रु. ९,
राव : अनंत मनोहर; कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे ३०; १९८१; रु. ४०.
अघोरी : बाबूराव बागूल; अनिल मेहता, पुणे ३०. १९८१; रु. २५.
पावनखिंड : रणजित देसाई. अनिल मेहता; कोल्हापूर; १९८१; रु. ३०.

## साभार स्वीकार / कथा

राजा हत्ती व प्राणीकथा : बी. एम्. लोणकर. सौ. विमलाबाई लोणकर, पुणे ९; १९८१; रु. १.
पांडुरंग कांती : र. वा. दिघे; ठोकळ प्रकाशन, पुणे २; १९८१; रु. १८.
कमळ कळा : डॉ. सुभाष सावरकर; समीर प्रकाशन, अमरावती; १९८१, रु. १४.
जजमेन्ट : डॉ. सुभाष सावरकर; समीर प्रकाशन, अमरावती, १९८१; रु. १४.
ओंजळधारा : जी. ए. कुलकर्णी; कॉंटिनेंटल प्रकाशन; पुणे ३०; १९८१; रु. ४०.
हिंदु धर्मातील रूपक-कथा : कृ. भा. बाबर; डॉ. सरोजिनी बाबर; पुणे ३० १९८१; रु. २.
तिसऱ्या पिढीची ग्रामीण कथा : आनंद यादव व बाबा पाटील संपादित, मेहता पब्लि. हाऊस; पुणे ३०; १९७१; रु. १५.
रानकोंबडी : रंगराव बापू पाटील; मेहता पब्लि. हाऊस. पुणे ३०; १९८१; रु. १५
सांगण्याजोग्या गोष्टी : मनोहर दातार; डॉ. सरोजिनी बाबर. पुणे; १९८१;रु. २.
वटवाघळांच्या पारंब्या : विजय गं. वाकडे; मराठवाडा साहित्यिक मित्रमंडळ, चौफाळा-नांदेड; १९८१, रु. १२.

# समर्थांची काव्यशैली : काही विशेष

## भा. श्री. परांजपे

समर्थ रामदासांचा वाङ्मयसंभार इतका विविध आणि वैचित्र्यपूर्ण आहे की त्यातून त्यांच्या काव्यशैलीचे स्वरूप निश्चित करणे बरेचसे अवघड जाते.

स्वतः समर्थांनी कवित्वविचार केला आहे आणि काव्य कसे असावे व कसे नसावे याचे विधिनिषेध त्यात प्रगट केले आहेत. ' मृदु, मंजुळ, कोमल ' ' भव्य अद्‌भुत विशाल ' ' गौल्य माधुर्य रसाळ ' अशी भक्तिरसयुक्त काव्ये कवीनी करावी असे उद्‌गार त्यातून आढळतात. याशिवाय ' कवित्व नसावे पाल्हाळ ' ' बोलिलेचि न बोलावे ' ' छंदोभंग न करावे ' यासारखे निषेधही त्यांनी बोलून ठेवले आहेत. नेमक्या याच विचारावर बोट ठेवून टीकाकारांनी समर्थांचे काव्य या कसोटीला उतरत नाही हे दाखविण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. पण असा प्रयत्न करताना ' उत्कट भव्य तेचि घ्यावे मिळमिळीत अवघे टाकावे ' या अशा कितीतरी वचनांकडे कानाडोळा केला जात असल्यामुळे या आक्षेपांचे वैय्यर्थत्व आपोआपच स्पष्ट होते, कारण हे आक्षेप बहुतांशी कवितेच्या बाह्यांगाला अनुलक्षून आहेत. समर्थांची कविता वरील निकषांहून वेगळी पडत असली तर त्याची काही वेगळी कारणे असू शकतात आणि त्यांचा विचार करणे अगत्याचे ठरते. समर्थांची कविता स्वतःसंबंधीची जी भूमिका कधीकधी सांगत असते तिचाही ठावठिकाणा घ्यावा लागतो. समर्थ स्वतःचा बऱ्याच वेळा ' कवी ' म्हणून उल्लेख करतात. ' गणपती मज दे मति लाघवी ' अशी प्रार्थना करताना दिसतात. ' नाना काव्य रसाळ भव्य करणे ' या साहित्य संपादनाच्या प्रयोजनात रसाळते बरोबरच भव्यताही लक्षात घेतात. ' स्वानुभव उद्‌गार आवरेना ' अशी त्यांची स्थिती कधीकधी होत असल्याचे ते स्वतःच सांगतात समर्थांच्या काव्य-शैलीचा शोध घेताना ते सारे लक्षात घ्यावे लागते.

संतपरंपरेतील पूर्वगामी कवींच्या रचनेच्या दृष्टीने समर्थांच्या काव्यशैलीची पृथ-गात्मता जाणवते ती त्यांच्या श्लोकरचनेत! समर्थांनी ओवी, अभंग व पदे अशा विविध माध्यमांतून लेखन केले असले तरी वृत्तबद्ध रचना हाच त्यांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाचा आणि पराक्रमाचा प्रांत ठरतो. त्यांच्या काव्यातील फार मोठा अंश याच रचनेने व्यापलेला आहे. मनाचे श्लोक, रामायणाची दोन कांडे, ' लघुरामायण ', भवानी देवीवरील आणि मारुतीवरील स्तोत्रे, ' अध्यात्मसार आणि आनंदवनभुवन ' यांसारखी कितीतरी प्रसिद्ध आणि लोकप्रिय कविता श्लोकातूनच केलेली आहे.

अनुक्रमणिका

समर्थांची आद्यकविता कोणती हे निश्चित सांगता येत नसले तरी वृत्तबद्ध रचनेतूनच त्यांनी आपल्या कवित्वाची मुहूर्तमेढ रचली हे त्यांच्या 'करुणाष्टकां'वरून सहज लक्षात यावे.

किंबहुना समर्थांच्या भावविश्वात प्रवेश मिळविण्याचा सुलभ मार्ग म्हणजे ही करुणाष्टकेच होत. या करुणाष्टकांचे स्वरूप बहुतांशी कोवळे आणि हळुवार आहे. ' उदासीन हा काळ कोठे न कंठे ' सर्वोत्तमा कैं मज भेट देसी ' ' तुजवीण रामा मज कंठवेना ' यासारखी स्तोत्रांची पालुपदे मधुर आणि अर्थ व्यंजक आहेत. ' अनुदिन अनुतापे ' या करुणाष्टकाची तर जडणघडण काव्यशैलीला जवळची वाटावी. ' अनुदिन अनुतापे तापलो ' ' घडिघडी बिघडे हा निश्चयो ' ' चपळपण मनाचे मोडिता मोडवेना ' यांसारख्या चरणांतील अनुप्रास व अनुरणन, ' सकल जन भवाचे आथिले वैभवाचे ' यातील मध्ययमकाचा डौल, ' जिवलग जिव घेती ' यातील विरोधाभास, ' उपरति मज रामी जाहली पूर्णकामी ' यातील शांतरसाकडे वाहणारा ओघ आणि ' पय न लगत मूखी हाणिता वत्स नेणे ' यांसारखे आशयाची उत्कटता वाढविणारे मधुर दृष्टांत या गोष्टी पाहिल्या म्हणजे हे करूणाष्टक नुसतेच ' स्तोत्र ' नाही तर ' काव्य ' आहे हे पटते.

समर्थांची करुणाष्टके त्यांच्या साधकावस्थेची खूण आहे आणि ती सारी नाशिक-पंचवटीस रचली असे सांगण्यात येते. या साधकावस्थेत समर्थांच्या अवतीभोवती दुष्टदुर्जन वावरत होतेच आणि त्या पिशुनांनी सुरुवातीच्या काळात त्यांचा बराच छळ केला असे खुद्द समर्थांनी काही अष्टकांतून म्हटले आहे. ' पिशुनै वाटती सर्वे ' ' पढिला समंधु या दुर्जनासी ' यांसारखे उद्‌गार त्यांच्या करुणाष्टकात आहेत.

' समर्था तुझे काय उत्तीर्ण व्हावे ' हे करुणाष्टक तर आशयाच्या दृष्टीने अतिशय करुणगंभीर आहे. त्यात तळमळ नसून तृप्तीची आणि कृतार्थतेची झलक दिसते. आपले सर्व तऱ्हेचे कोड रामरायाने पुरविले अशी ग्वाही समर्थांनी येथे रामाला दिली आहे. ' कृपाळूपणे राज्य रंकास द्यावे ' अशी अघटित घटना घडून आली. या घटनेचा उल्लेख शिवाजी महाराजांची स्वराज्य संकल्पना बहरास आली व ती समर्थांना पाहवयास मिळाली असा दाखविणारा आहे. ' अस्मानी सुलतानी 'चे आनंदवन भुवन झालेले डोळ्यांना पहायला मिळाल्याचा हर्ष हा या करुणाष्टकाचा जणु गाभा वाटतो. आपली प्रार्थना सफल झाल्याच्या भावनेने कृतार्थ झालेले समर्थ ' सुखे सांडणे या देहाचे करावे ' अशा शब्दांत सामोरे जाण्याची भाषा करीत आहेत.

या भावविश्वातील लक्षणीय भाग असा की हे सारे हृद्‌गत ते रामाजवळ बोलून दाखवीत आहेत. रामाचा वियोग त्याना क्षणभरही सहन होत नाही हे त्यांनी पंच-वटीत लिहायला घेतलेल्या ' जुन्या दासबोधा 'मध्ये ' रामचंद्रा तुझा वियोग । नको

नको रे तो प्रसंग ' अशा पिळवटलेल्या शब्दांत व्यक्त केला आहे तर चाफळास राममूर्ती स्थापन होण्याच्या अगोदरच प्रभु रामचंद्राने साक्षात्कार देऊन ' आपण तुझ्याजवळ येणार ' म्हणून आश्वासन दिल्यावरोवर झालेला आनंद ' लवे नेत्रपाते स्फुरे आणि बाहे। दिनानाथ तो राम येणार आहे ' या स्तोत्रातून व्यक्त झाला आहे. ' रघुनाथजी वेगळे मज जिवलग नाही ' ही एका पत्रात त्यांनी बोलून दाखविलेली भाषा श्रीरामाविषयीचा जिव्हाळा दाखवितो. या जिव्हाळ्यानेच ही करुणाष्टके भारलेली आहेत.

आत्मोद्धाराच्या तळमळीइतकीच समर्थांच्या लोककल्याणाची तळमळ तीव्र आहे. ' निशिदिनी जनचिंता लागलीसे उदारा ' किंवा ' उदंड दु:ख लोकांचे ऐकता उर फाटतो ' असे कळवळ्याचे उद्‌गार त्यांनी काढले आहेत. ते त्यांच्या लोकस्थितीच्या आणि देशस्थितीच्या सूक्ष्म निरीक्षणाचे परिणामस्वरूप वाटतात.

लोकस्थितीचे अवलोकन करताना समर्थांना प्रथम कोणती गोष्ट जाणवली असेल तर ती म्हणजे दुष्काळामुळे आलेले आर्थिक संकट. सन १६३० च्या सुमारास महाराष्ट्रात जो भयंकर दुष्काळ पडला आणि त्यानंतरची जी एक दोन वर्षे हलाखीची गेली ती समर्थांनी डोळे भरून पाहिली. ' अस्मानी सुलतानी ' या नावाने जे तीन समर्थरचित प्रबंध आज पहायला मिळतात त्यात या दुर्धर अवस्थेचे तपशिलवार चित्रण आणि तेही पद, ओवी व श्लोक अशा निरनिराळ्या माध्यमांतून केलेले दिसते. समोर घडत असलेला प्रसंग नजरेने टिपत असतानाच भावना उचंबळून ती शब्दांचा आश्रय घेते आणि अशा वेळी सुचेल त्या माध्यमाचा ती अवलंब करते. पण ही केवळ समर्थ प्रतिभेची लहर वाटत नाही तर त्या त्या चित्रणाला अनुरूप असे माध्यम शोधून काढले आहे असे वाटते.

अस्मानी–सुलतानीच्या या तीन प्रबंधांबरोबरच ' परचक्रनिरूपण ' या नावाने प्रसिद्ध झालेले प्रकरण ताडून पाहिले म्हणजे समर्थांनी देशस्थितीच्या कारणाची आपल्या मनाशी कोणती मीमांसा केली होती तेही कळते आणि तत्कालीन दुरवस्थेचे संपूर्ण चित्र आम्हाला अवगत होऊ लागते.

' तपशील ' हा समर्थांच्या लेखन पद्धतीचा एक विशेष. दासबोधासारख्या ओवीबद्ध ग्रंथांतून आधिभौतिक तापाची, बद्धमूर्खांच्या स्वभावाची किंवा मतामतांच्या गलबल्याची जी वर्णने आपणास दिसतात त्यात आपणाजवळची सारी माहिती, सारे ज्ञान दुसऱ्याला समजावून देण्याची कळकळ दिसते. पण देशस्थितीचा तपशील देण्याचा हेतू त्याहून भिन्न आहे आणि त्याचे स्वरूप शास्त्रीय नसून काव्यमय आहे. उदाहरणार्थ ' माणसा खावया अन्न नाही। अंथरूण पांघरूण तेही नाही। घर कराया सामग्री नाही। काय करिती ' अशा एका ओवीतला विस्तार एका कुटुंबाची सर्व तऱ्हेने होणारी नागवण दाखवते तर ' किती गुज्रिणी, ब्राह्मणी भ्रष्टविल्या। किती

शांमुखी जहाजी फाकविल्या । किती एक देशांतरी त्या विकील्या । किती सुंदरां हाल होऊन मेल्या ' हे श्लोकबद्ध वर्णन स्त्रियांच्या हालअपेष्टेंचे साग्रसंगीत चित्र आमच्या डोळ्यांपुढे उभे करते.

' जन बुडाले बुडाले ' हे या प्रबंधातील वीस कडव्यांचे एक प्रदीर्घ पद आहे पण ते वाचताना आपणास ' प्रदीर्घते 'पेक्षा जाणवते ती त्यातली दृश्ये जी हृदय पिळवटून टाकतात. उदाहरणार्थ, हे पहिलेच कडवे पाहा :

जन बुडाले बुडाले पोटेवीण गेले
बहुत कष्टले कष्टले कितीयेक मेले
विषा लोकात लोकात येकची राहिले
तेणे उदंड उदंड दुःखचि साहिले

देशस्थितीची भयानकता साऱ्या अंगाने मानवी जीवनाला कशी ग्रासू पाहात आहे याबद्दलचा हा तपशील जिवाचा थरकाप करून सोडतो—नव्हे, जिवाला बेचैन करून सोडतो. वाचणाऱ्याच्या हृदयाचा ठाव घेणारे आणि तीन शतकापूर्वीच्या दुरवस्थेची जाणीव देताना तुम्हाला अस्वस्थ करणारे असे वर्णन प्राचीन काव्यात इतरत्र कुठेही पाहावयास मिळत असेल असे वाटत नाही.

ह्या दुःखदायक प्रदीर्घ चित्रणाचा आणखी एक विशेष लक्षात येतो व तो म्हणजे काही विशिष्ट शब्दांची प्रत्येक चरणात होऊ पाहणारी पुनरुक्ती ' शास्त्रीय ' ग्रंथात जी कंटाळवाणी वाटावी तीच या ' काव्यमय ' स्वरूपात आमच्या मनाला त्या स्थितीचा पुनःपुन्हा प्रत्यय देण्यासाठीच येते.

समर्थांच्या ग्रंथरचनेत एरवी खुपणारे पुनरुक्ती, पाल्हाळ आणि तपशील यासारखे दोष त्यांच्या काव्यशैलीला ठसकेदारपणा आणण्यास कसे उपयुक्त ठरतात यांचा नमुनाही अशाच करुणचित्रातून आढळतो.

रामदासांच्या लेखनकलेचा विचार करताना त्यांनी स्वतःच सुचविलेल्या ' मृदु मंजुळ कोमळ । भव्य अद्‌भुत विशाळ '... या ओवीतील लक्षणांचे स्मरण न होणे अपरिहार्य आहे. समर्थ रामदास हे एक जोरकस विचारांचे व ओजस्वी भाषेचे कवी आहेत असे म्हणणाऱ्या अभ्यासकांना त्यांच्या भाषेत ' मृदु मंजुळा 'ला कुठे वाव आहे की काय याबद्दल शंका येणे साहजिकच आहे. पण ज्यांनी रामदासांची पदरचना जवळून पारखली आहे त्यांना तरी ही शंका वाटू नये. तसेच पाहिले तर आपल्या कवित्वरचनेच्या सुरुवातीपासून या कवीने मृदु मंजुळ वर्णरचनेकडे लक्ष दिलेले दिसते. मंजुळ शब्दांचा त्यांचा हव्यास त्यांनी वाल्मीकीरामयणाची कांडे स्वतःच्या हाताने लिहिली त्याकाळापासूनच जडलेला आहे. यादृष्टीने त्या त्या कांडाच्या अखेरीस जोडलेल्या पुष्पिका नुसत्या चाळल्या तरी त्यातून हा अणुरणनाचा छंद आपणास कळेल. या पुष्पिका नव्हत तर पुष्पिता आहेत हेही तेथेच आपल्या लक्षात येईल.

अनुप्रास, अनुनासिक व अनुरणनात्मक शब्द यांच्या मिलाफाने वर्णरचनेला कशी मंजुळता येते हे रसिकांना सांगावयास नको. अरण्यकांडाच्या अखेरची ही पुष्पिका पाहा :—

श्रीमद् रमारमण जानकीजीवन पतितपावन सुरवरवंदन
मानसमोहन रावणमर्दन वालिनिकंदन, सज्जनरंजन
पापनिवारणकारण रघुवर देव नमामि नमामि

या पुष्पिकेतील अनुनासिके, अणुरणने व अनुप्रास यांनी युक्त अशा विशेषणांची ही पखरण पाहिली म्हणजे वयाच्या चौदाव्या वर्षापासून समर्थांच्या मनाचा रसिक व्यापार कोणत्या दिशेने चालू होता ते समजून येते.

मंजुळ शब्दांचा हा कलरव समर्थांच्या लेखनकलेचे एक अंग होऊन बसले आहे. वाद्यकल्लोळ, नृत्यकल्लोळ, गीतकल्लोळ, स्वरकल्लोळ आणि ध्वनिकल्लोळ यासारखे शब्दच नव्हत तर तशा तऱ्हेची वर्णने त्यांच्या कवित्वातून बऱ्याच ठिकाणी दिसतात. आणि मग लक्षात येते की मंजुळ शब्द टिपण्यात त्याना विशेष स्वारस्य आहे. केवळ अनुप्रासाच्या आवडीने पुरश्चरणकाळात संस्कृत काव्यनाटकांच्या साह्याने अशा तऱ्हेच्या शब्दांचा संग्रह त्यांनी आपल्याजवळ करून ठेवलेला आहे. या काळात केव्हातरी त्यांची दृष्टि 'रंजन' 'वंदन' 'निकंदन' यासारख्या अनुनासिकांच्या योजनेने शब्दाला येऊ पाहणारा गोडपणा लक्षात घेऊ लागली. आणि पुढेपुढे समर्थांच्या पदपदांतरातून या अणुरणनात्मक शब्दांची चाहूल आपणास ऐकावयास मिळते 'खणखण वाजती मंजुळ टाळ' 'नटे नटांग नाटकु' 'झळझळ दंत लखलखत दीप्ती' 'लंबोदर नाचे सुंदर' यांसारख्या पदामध्ये आणि व्याघ्रांबर फणिवरधर सुंदरनटनारी। पंचानन मनमोहन मुनिजनसुखकारी' 'लंबोदर पीतांबर फणिवरबंधना' किंवा 'साफल्या कौसल्या निजवल्यामाता' यासारख्या देवांच्या आरत्यांमध्ये अशा अनुप्रासयुक्त आणि मंजुळ शब्दांचा जणु खच पडलेला आहे. ह्या मृदुमंजुळ शब्दातून कोमल भावलेला कसे आवाहन मिळते ते समर्थांनी कसे जाणले आहे ते त्यांच्या वेणुगीतांतून पाहावे. 'वेणु वाजे सुरस वेणु वाजे। मंजुळ रुणझुण रुणझुण रंग गाजे' किंवा 'वेणु मंजुळ गे माय वृन्दावनी' ही पदे यादृष्टींनी न्याहाळून पाहावी.

विरक्त म्हणून नावाजलेले समर्थ संसारात कुठे जर काहीसे घोटाळत असतील तर ते मातेच्या स्मरणाने. रामाच्या खालोखाल ते मातेला महत्त्व देतात किंबहुना कधी कधी रामाला सुद्धा 'राममाय' म्हणून आळवतात.

जगात जेवढी म्हणून 'दया' 'कृपा' वा 'ममता' इत्यादि कोमल भाव आहेत ते महन्मंगल मातृसंस्थेमुळेच टिकून राहिले आहेत असे समर्थांचे मत दिसते. मातेचे माहात्म्य सांगताना त्यांचे अंतःकरण स्वतःच मृदु होते आणि मग 'वीट नाही

कंटाळा नाही। आलस्य नाही त्रास नाही। इतुकी माया कोठेचि नाही माते वेगळी' असे उद्गार काढू लागतात.

समर्थांच्या कवितेत एक भाग असा आहे की जो त्यांच्या विरक्त आणि लौकिक प्रवृत्तीला जोडणारा सांधान्न वाटावा. लोकजागृतीच्या तळमळीने समुदाय करावा म्हणून शिकविणारे व जनसमुदायात उत्सवाच्या निमित्ताने मिळणारे समर्थ कधीकधी एकाएकी डोंगरात निघून जातात असे त्यांच्या चरित्रात कितीतरी वेळा पाहावयास मिळते. पण या एकांतवासाविषयी त्यांचे उद्गार जेव्हा आपण ऐकतो तेव्हा आपणास प्रथमदर्शनी विस्मय वाटतो आणि मग हळूहळू लक्षात येते की विरक्त भासणारा हा पुरुष अंतर्यामी मोठा रसिक आहे आणि तो दऱ्याखोऱ्यांत किंवा श्वापदांनी गजबजलेल्या अरण्यात राहतो तो केवळ लोकांना टाळण्यासाठी नव्हे तर आपली सौंदर्याविषयीची भूक शांत होते म्हणून. समर्थांनी जी मठमंदिरे स्थापन केली त्यांसाठी शोधून काढलेल्या जागा सुद्धा तेथील सृष्टिसौंदर्यामुळेच त्यांच्या मनात ठसल्या नव्हत्या काय? 'भोवती डोंगराचे फेर' 'वाहते सुंदर जीवन' अशा स्थळी 'सुख विशेष घडे पळ राहता' असा त्यांचा स्वतःचा अनुभव आहे. निबिड वनराजी, दुर्गम वाटा आणि गुप्त भुयारे हे वनश्रीचे वैभव त्यांना फार प्रिय होते आणि 'मना चाल ऊठी वना दुर्गमाते' असे जेव्हा ते सांगतात तेव्हा हे प्रेम त्यांच्या अंतःकरणात उचंबळून येत असते. शहापूरनजीक चंद्रगिरीच्या डोंगरात त्यांनी बरेच दिवस वास्तव्य केले होते त्या घळीचे त्यांनी स्वतः केलेले वर्णन पाहण्यासारखे आहे :

जागा सुंदर गहन। तेथे सुखावले मन।
वर पाहता गहन। साठवले ॥
कृष्णा कोन्या दोन्हीकडे। मध्ये पर्वताचे कडे।
मंडळ पाहता चहूंकडे। समाधान ॥
भोवती डोंगराची थाटे। दिसती कडे आणि कपाटे।
सवेंचि येताती धुकटे। झाकोळती ॥
तळी पाहता आकाश। दिसे दुसरे कैलास।
तेथे जावया संतोष। वाटतसे ॥

समर्थांनी केलेली ही सृष्टीची वर्णने त्यांनी स्वतः पाहिलेली असल्यामुळे ती वाचणाऱ्या मनालाही दृक्‌प्रत्यय आणून देतात. या वर्णनातून मधून मधून परोपरीची सुंदर वने, वृक्ष वेलींचा विस्तार, निबिड तरूंची दाटी, आकाशातील अजस्र मेघखंड आणि खडकावरून कोसळणारे जलप्रपात अशा सृष्टीचे दर्शन तर होतेच पण त्या सृष्टीच्या सौंदर्याने वेडावलेल्या रसिक मनाचेही चित्र डोळ्यांपुढे उभे राहते. ही सृष्टिवर्णनपर कविता त्यांच्या इतर कवितेच्या मानाने अल्प असली तरी ती कविमनाचा

भाव विशद करणारी आहे.

समर्थांच्या सृष्टिसौंदर्यविषयक आवडीचे एक कारण आपल्या लक्षात घ्यायला हवे आणि ते म्हणजे अरण्यातील विविध सृष्टींच्या दर्शनाने मन विशाल होते किंबहुना अरण्यसृष्टीच्या केवळ चिंतनमात्रे करून मनाला व्यापकतेचे भान राहते असे त्यांचे मत आहे. निरनिराळ्या देवतांचे ध्यानफल वर्णिताना ते सांगतात, 'नाना वने वनारण्ये या ध्याने वृत्ति वावरे'. समर्थांचा हा उद्‌गार अरण्यवासाकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोण तर सांगतोच पण त्याबरोबरच एक महत्त्वपूर्ण तत्व तो सूचित करीत आहे. 'वनदर्शनाने व चिंतनाने मन विशाल व व्यापक होते' असे सांगता सांगता समर्थ एका विशेष पातळीवर चढून जातात. अशावेळी सृष्टिसौंदर्याने उल्हसित होणारा रसिक किंवा सृष्टिवर्णन करणारा कवी एवढीच त्यांची भूमिका राहत नाही तर सृष्टीचे सौंदर्यतत्त्व समजावून देणारा एक प्रज्ञावंत अशी नवी बैठक ते घेतात. सृष्टीला अपर दैवत मानणाऱ्या आधुनिक विचाराशी समर्थांचे नाते थोडेबहुत जुळल्यासारखे वाटते ते इथे!

ही सृष्टिवर्णने समर्थांनी आयुष्याच्या कोणत्या प्रहरात लिहिली हे कळायला वाव नाही, पण बहुधा कृष्णातीरी आल्यापासून जी डोंगराची थाटे आणि कडेकपाटे त्यानी पाहिली तेव्हा त्यातील भव्यता आकलून घेण्याचे त्यांचे वेड वाढले. मंजुळ शब्दांच्या नादनिनादाने वेधले जाणारे त्याचे मन आता भव्य व रौद्र स्वरूपाला कवेत घेण्यास योग्य अशा नव्या शक्तिशाली शब्दांच्या शोधात निघाले. मृदु मंजुळ वाटणाऱ्या ध्वनीचे रौद्रात होणारे परिवर्तन समर्थांच्या दासबोधातील दशक १३ आणि दशक २० मधील काही समासांतून दिसते. पण त्याहीपेक्षा 'गिरीचे मस्तकी गंगा' या स्फुट प्रकरणात ते विशेष प्रत्ययाला येते.

भव्य अद्‌भुत आणि विशाल वर्णनांची ही वाढती आवड समर्थांनी हनुमत्प्रतापाच्या वर्णनात पूर्णपणे साध्य करून घेतली आहे. 'सत्राणे उड्डाणे हुंकार वदनी करि डळमळ भूमंडळ सिंधूजळ गगनी। कडाडिले ब्रह्मांड... ही हनुमंताची साधी आरती ती काय, पण तेथेही शब्दांच्या फौजा धरित्रीला कंप देत उभ्या ठाकल्यासारख्या वाटतात. हाच हनुमंताचा प्रताप 'भीमरूपी स्तोत्रा'त अनुष्टुभ वृत्तामध्ये वर्णिला जातो तेव्हा संथगतीने चालणाऱ्या त्या वृत्तालाही विलक्षण गती मिळते आणि धीरगभीर लयीतले ते वृत्त काळरुद्राग्नीशी वार्तालाप करायला निघाले आहे की काय अशी शंका येते.

प्रतापवर्णन करण्यातला समर्थांचा उत्साह युद्धप्रसंगाची चित्रणे करताना शिगेला चढला आहे. दुष्टदुर्जनांच्या अंगाचा थरकाप करून सोडणाऱ्या रामाचा पराक्रम सांगताना ते प्रत्यक्ष युद्धकथन केव्हा करू लागतात हेच कळत नाही. त्यांनी रामरावणयुद्धाची वर्णने लघुरामायण, रामायणाचे युद्धकांड यांत तर आढळतातच पण

त्या व्यतिरिक्त स्फुट प्रकरणे, स्फुट श्लोक, घाट्या-सवाया, अभंग-ओवीशते आणि पदे अशा निरनिराळ्या स्वरूपांत विपुल आणि विविध थाटांत मिरवतात. विशेषतः याबाबतीत समर्थांच्या पदरचनेत वाणीचा जो जिवंत उल्हास पाहायला मिळतो तो काही आगळाच. उदाहरणार्थ शत्रू लंकेजवळ येऊन उभा ठाकल्याचा निरोप रावणास त्याच्याच दूताकडून कोणत्या शब्दात मिळत आहे तो पाहावा :

आरे आरे रावणा तो राम आला रे
लागवेगे करूनि सिंधू पालाणिला रे
भूमंडळ व्यापिले परचक्र आले रे
धूसर दाटले दळ खवळले रे

'प्रभू रामराजा कपीभार भव्य फौजा' या पदामध्ये तर दोन्ही दळे प्रत्यक्ष एकवटल्याचे वर्णन पाहावयास मिळते.

लागली रणतुरे भार भारी भरे
मारती निकरे ' एकमेका
उठावले भार मांडिला भडिमार
होतसे संहार समरांगणा

•'रामरावण संग्रामु दारूणु' या पदात निरनिराळ्या ध्वनीप्रतिध्वनींची वलये निर्माण होताना दिसतात.

दळभार धुमधुमी रणघोष घुमघुमी
ब्रह्मांड दुमदुमी अद्भुत मांडला
शस्त्र कडकडी महामेघ गडगडी
काळ थडथडी कंप सुटला''

युद्धाची गतिशीलता या पदामधून कशी भव्य व उत्कटतेने प्रत्ययास येते. समरांगणातील दोन्ही दळांचे भार, युद्धार्थ सज्ज झालेले रथकुंजरावरील स्वार, वानरांच्या प्रचंड हाका, धनुष्यांचे टणत्कार असल्या विशाळ वातावरणात नादांचे समुद्र तुमच्या आमच्या डोळ्यापुढे उभे राहतात आणि अशी वर्णने करणारा हा 'समर्थ' कवि जुन्या राजपूत युद्धातील भाटचारणांप्रमाणे स्वतः युद्ध पाहायला समरांगणात उभा ठाकला होता की काय असे वाटते.

भूतकाळाकडून वर्तमानकाळाकडे झेप घेण्याची समर्थांची पद्धत ज्यांना परिचित आहे त्यांना याच प्रसंगाबरोबर शिवकालीन युद्धप्रसंगांची समर्थांनी केलेली वर्णने आठवल्याखेरीज राहात नाहीत. 'गनिमांच्या देखता फौजा । रणशूरांच्या फुरफुरती भुजा' हे आपल्या काळातील दृश्य त्यांनी पाहिले आहे; इतकेच नव्हे तर वेळप्रसंग पाहून 'युद्ध करावे खणखणाटे सीमा सांडूनिया' अशी शिकवणही दिली आहे.

पण त्याबरोबरच ' धुरेने युद्धास जाणे। ऐसी नव्हत की राजकारणे ' असाही सल्ला ते देतात.

समर्थांचा एक कवित्वविशेष अशाच संदर्भात आपल्या नजरेपुढे ठळकपणे उभा राहतो. समर्थांनी मराठीला काय दिले असा जर कुणी प्रश्न विचारला तर त्याला एकच प्रत्युत्तर प्रामुख्याने द्यावे लागेल आणि ते म्हणजे उभ्या महाराष्ट्राला त्यांनी राजकीय चळवळीची भाषा शिकविली हे होय. न्या. रानडे यांच्यासारख्या राजकारण धुरंदर व्यक्तीला समर्थांच्या ' महाराष्ट्रधर्म ' शब्दात ' देशभक्ती 'ची छटा दिसते. ' कार्यकर्ता ', ' चळवळ ', ' नेमस्त ', ' मवाळ ', ' बहुजिनसी ' आणि ' एकजिनसी' हे विसाव्या शतकाच्या राजकारणातले शब्द मुळात समर्थांचेच होत हे विसरता येत नाही. विशेषतः राजकारण हा शब्द तर समर्थांनीच मराठीला दिलेली एक महत्त्वाची देणगी ठरेल.

मराठी वाङ्मयात ' स्वातंत्र्या 'ची आकांक्षा प्रथम उमटून आली ती समर्थांच्या काव्यात. ' परतंत्र होऊ नये काही केल्या ', ' इहलोक परलोक सर्व वैरी मारावे ', ' राजकारणे दुर्जन दाटे ऐसे न करावे ' अशा खणखणीत सवालाबरोबरच ' मूर्खाचे राज्य राहेना ', ' शक्तीने मिळती राज्ये ', ' चोरटे नासकी धुंदे ... मारावी राजकारणे ', 'लोकास राखणे राजी ते राज्य प्रबळ बळे', ' तुझा तू वाढवी राजा शीघ्र आम्हाचि देखता ' असेही उत्कट उद्‌गार आम्हास समर्थ वचनांतूनच पाहावयास मिळतात. क्षात्रधर्म, राजधर्म, सावधता प्रकरण, शिवाजी-संभाजीस पत्रे, रामायणाची दोन कांडे, अंजनीगीत, आनंदवनभुवन आणि दासबोधातील ' उत्तम पुरुष ' व ' राजकारण 'पर समास हे सारे वाङ्मय पाहिले म्हणजे समर्थांच्या वाणीत ' प्रत्ययाचे बोलणे ', ' न्यायनिष्ठूर बोलणे ', ' आतुर बोलणे ', ' नेमके बोलणे ' हे सारे विशेष लक्षात येतात. मृदु मंजुळ शब्दांच्या हव्यासापासून तो शक्तिमंत शब्दांपर्यंतचा त्यांनी घेतलेला शोध, कौसल्येच्या कोमल भावनांबरोबरच अंजनीगीतातील आवेग, देशस्थितीतील दुःस्थितीच्या वर्णनापासून तो आनंदवनभुवनापर्यंत घेतलेले उड्डाण आणि करुणाष्टकांपासून तो भवानी स्तोत्रापर्यंत मारलेली मजल समर्थांच्या लेखन शैलीच्या ज्या विकासाच्या खुणा आम्हाला सांगतात त्यातून एक जीवनव्यापी भव्य रूपच आमच्या डोळ्यांपुढे उभे राहते. त्या लेखनशैलीला नामरूप द्यायचेच झाले तर भेदिक शैली असे फार तर म्हणावे.

# कै. माधव बल्लाळ नामजोशी यांच्या 'किरण' साप्ताहिकाची दोन वर्षे

गो. रा. कामतकर

---

" नामजोश्यांना तुम्ही हाताशी का धरता ?" असे रावसाहेब रानड्यांस त्यांचे कित्येक स्नेही खाजगी पत्रांतून विचारीत. रावसाहेबांचे त्या सर्वांस एकच उत्तर असे की नामजोश्यांच्या अंगात जे एक प्रकारचे पाणी आहे व काम करण्याची धमक आहे त्या गोष्टीचा फायदा सार्वजनिक कामी करून घेण्यास काय हरकत आहे ? ... महादेव बल्लाळ ऊर्फ माधवराव नामजोशी यांच्या मनात राष्ट्रकार्याचे विचार अंकुरण्यास रावसाहेब रानडे यांचा हा निकट सहवासच कारण झाला. रानड्यांच्या शुक्रवार पेठेतील वाड्यात नामजोशी त्यावेळी राहात असत. उभयतांचा परिचय वाढता वाढता त्याची परिणती स्नेहात झाली. रानडे हे त्यावेळी पुण्यातील राजकीय सामाजिक, धार्मिक इत्यादी चळवळींचे सूत्रचालक होते. त्यांच्या घरी चालणाऱ्या घडामोडी व विचारांचे आदानप्रदान यांमुळे नामजोश्यांच्या मनातही काही संकल्प रूजू लागले. काही प्रेरणा फुलू लागल्या. देशहिताची बुद्धी फळ धरू लागली. सार्वजनिक कामाचा इतका ध्यास त्यांना लागला की त्या काळातील एक 'कर्ता पुरुष' या शब्दांत पोतदारांना त्यांचा परिचय करून द्यावा लागला. महादेव बल्लाळांचे हे वर्णन इतके सार्थ आहे की एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात महाराष्ट्रात जी कर्तबगार व दूरदृष्टीची अनेक ठळक माणसे होऊन गेली त्यांच्यात नामजोश्यांचा अंतर्भाव करावा लागतो.

माधवराव नामजोश्यांचा पिंड पत्रकाराचा होता. वयाच्या बाराव्या वर्षापासूनच त्यांच्या ठिकाणी लेखनाची हौस दिसू लागली. त्या अपरिपक्व वयात काही लेखनाचा फुलोरा अकालीच बहरलाही. पुढे ऐन तारुण्यात माधवराव रानड्यांच्यासारखा लोहचुंबकाचा डोंगर समोर येऊन उभा ठाकला. त्यामुळे त्याच्या चुंबकीय शक्तीच्या प्रभावाने आपल्यालाही समाजास काही सांगावयाचे आहे अशी भावना मनात पेटून उठली. अवतीभवती 'ज्ञानचक्षू', 'ज्ञानप्रकाश' यांसारखी वर्तमानपत्रे आपल्या परीने कार्यरत होती. सार्वजनिक सभेचे चलनवलन चालू होतेच. पण नामजोश्यांना समाधान नव्हते. त्यांची खंत काही वेगळीच होती. त्यांच्या मते 'चक्षू' दृष्टिहीन आहे तर 'प्रकाश' क्षीणतेज आहे. सार्वजनिक सभा निद्रावश झाली आहे. तेव्हा आपणच वर्तमानपत्र काढावे. मनात विचार येण्याचा अवकाश की लगेच तो कृतीत

अनुक्रमणिका

आणावा असा हा माणूस होता. खरोखर माधवराव म्हणजे मोठा उपयोगी किंबहुना उलाढाल्या गृहस्थ. तात्पर्य हे की नामजोश्यांच्या सार्वजनिक जीवनास त्यांच्या ' किरण ' या साप्ताहिकापासून सुरुवात झाली.

खाजगी शिकवण्या करून प्रपंच संभाळणाऱ्या, बेताचे शिक्षण झालेल्या एका सामान्य माणसाने स्वतंत्र वृत्तपत्राचा संसार थाटणे ही गोष्ट त्या काळात सोपी नव्हती. पण नामजोश्यांचे बेत जसे अचाट तसे कष्ट करण्याचे बळही अफाट. तशात त्यांच्या पाठीशी केशव वल्लाळ साठे यांच्यासारखा व्यापारी उभा राहिला. त्यांनी एका मुटीने पंधरा हजार रुपये कर्ज देऊन माधवरावांना नवा छापखाना उभा करून दिला. हा ' किरण ' छापखाना कोतवाल चावडीच्या ठिकाणी होता. इथून माधवरावांच्या ' किरण ' साप्ताहिकाचा पहिला अंक २६ ऑगस्ट १८७७ रोजी बाहेर पडला. या अंकाच्या मुखपृष्ठावर उगवत्या सूर्याचे चित्र असून त्याखाली मजकूर छापलेला होता : ' A weekly journal of social & general news, literature, politics, commerce, science & art. ' ' किरण ' द्वैभाषिक पत्र होते. त्यातील लेख इंग्रजी व मराठी अशा दोन्ही भाषांत असत. त्याचा आकार हल्लीच्या दैनिक वृत्तपत्राच्या निम्म्याएवढा जेमतेम होईल. आणि वार्षिक वर्गणी मात्र दहा रुपये होती. वर्तमानपत्राचा वर्गणीदार होणे हे त्या काळात मोठ्या श्रीमंतीचे लक्षण मानले जाई.

' किरण ' काढण्याचा हेतू काय याबद्दलची आपली कैफियत पहिल्याच अंकात माधवरावांनी ' Introduction ' या नावाचा एक इंग्रजी लेख लिहून दिलेली आहे. चांगल्या वर्तमानपत्राची लक्षणे कोणती याची चर्चा प्रस्तुत स्थळी आपण करणार नाही असे प्रथमच ते सांगून टाकतात. अहंमन्यतेचे प्रदर्शन करावयाचे म्हणून नव्हे किंवा आढ्यतेने प्रौढी मिरवावी म्हणूनही नव्हे पण इतके सुचवावेसे वाटते की वर्तमानपत्राचे खरे कार्य म्हणजे राजकारण, समाजकारण, नीतिबोध इत्यादि क्षेत्रांत ज्या असंख्य गोष्टी हरघडी घडत असतात त्यांची, निदान त्यांपैकी महत्त्वाच्या घडामोडींची माहिती समाजास पुरविणे हे तर आहेच, पण त्याशिवाय निर्भयपणे, विचार-स्वातंत्र्य अबाधित राखून आणि न्याय्य विचारांचा समतोल न ढळू देता वर्तमानपत्रकर्त्याने ठोसपणे आपणांस काय वाटते ते समाजास सांगितले पाहिजे. [... A true journal must not only be a correct informant of what may be passing about in connection with the political, social, moral and all the thousand and one aspects which the varied & innumerable transactions of society assume, but must hold that responsible capacity in firm & perpetual allaince with characteristic, and in some respects, unique indepen-

dence & evenness of judgment coupled with fearless declaration.] वृत्तपत्र म्हणजे समाजपुरुषाची 'बृहत् जिव्हा' हे लोकहितवादींचे मत किंवा वर्तमानपत्रकर्त्याचे काम समाज रक्षण करणाऱ्या कोतवालाचे असते हा केसरीच्या उद्घाटन प्रसंगी चिपळूणकरांनी व्यक्त केलेला अभिप्राय ध्यानात घेतल्यास महादेव बल्लाळांचे कुल-गोत्र-व्रत कोणते याची अटकळ सहज बांधता येते. 'नृपतिजन पदानां दुर्लभः कार्यकर्ता' म्हणजे राजा व प्रजा ह्या दोन्ही पक्षांस संतुष्ट ठेवील असा पुरुषच विरळा ही गोष्ट ध्यानी घेऊन मगच वृत्तपत्रासाठी हाती लेखणी धरणाऱ्या संपादकाने कागदावर अक्षरे उमटविली पाहिजेत. सत्तावन सालच्या स्फोटानंतर इंग्रजी सत्ता हिंदुस्थानात स्थिरस्थावर होत होती. इंग्रज राज्यकर्त्यांना हिंदी संस्थानिकाबद्दल तितकासा विश्वास वाटत नव्हता. तशात युरोपात रशिया व तुर्कस्थान या दोन राष्ट्रांमध्ये युद्धास तोंड लागले होते. 'टाइम्स' सारख्या साम्राज्य-वादी पत्रांनी शिंदे-होळकरांचे रशियाशी कारस्थान सुरू असल्याच्या बातम्याही पेरण्यास सुरुवात केली होती. अशा वेळी संस्थानिकांचा कैवार घेऊन 'किरण'ने या इंग्रजी पत्रावर हत्यार धरले. नामजोशी लिहितात की इंग्लिश राज्यकर्त्यांच्या कारकीर्दीत ह्या राष्ट्राचे एकंदर कल्याण झाले असे ज्यांचे म्हणणे असेल त्यांनी ह्या परभ्रष्ट आणि हीनदीन झालेल्या राजकुलातील माणसांकडे दृष्टिक्षेप करावा. शेषन्नास टोलेजंग राजप्रासाद जमिनदोस्त करून शेपाचशे झोपड्या उभारल्या म्हणजे आमच्या देशास उत्तमावस्था प्राप्त झाली असे म्हणावयाचे काय? एखादा उत्तमपैकी फळबाग असावा. त्या बगिच्यातील नारळाची, आंब्या फणसाची फळे खाऊन आपला चरितार्थ चालविण्याऐवजी ही मंडळी झाडेच तोडून पैशासाठी विकून टाकीत आहेत. आणि त्या जागी एरंडाची वने वसवीत आहेत. अशाने ह्या बागेला चांगली स्थिती आली असे म्हणता येईल काय? नामजोश्यांच्या लेखणीचा दंश किती दाहक होता याची कल्पना या उग्र हल्ल्यावरून येईल.

'आम्हांस इंग्रज सरकारचे राज्य किंवा राज्यपद्धती नको काय?' [किरण: ३ मार्च १८७८] हा माधवरावांचा असाच आणखी एक संपादकीय अग्रलेख. इंग्रजांच्या राजनीतीची निर्दयपणे चिरफाड करताना 'किरण' म्हणतो, "हल्लीचे प्रजेचे सोईकडे, त्यांचे सुखाकडे किंवा त्यांचे म्हणण्याकडे सरकार आताशे काहीच लक्ष पुरवीत नाही. याचे फळ रयतेची अस्वस्थता हे आहे... इंग्रज सरकाराबद्दल रयतेचे मन शुद्ध नाही ही गोष्ट खरी, परंतु इंग्रज सरकारचे राज्याचा आम्हांस कंटाळा आला नाही; त्यांचे राजनीतीच्या हल्लीच्या क्रमाचा कंटाळा आला आहे"... माधवराव पुनःपुनः सांगतात की इंग्रज सरकारचे राज्य आम्हांस अतिशय प्रिय आहे, त्यांनी आम्हांमध्ये सुधारणुकेचा पाया घातला, आगगाड्या, तारायंत्रे आदि-करून सुखोपभोगाच्या सोयी करून दिल्या, न्याय, कायदेकानू वगैरे गोष्टींची अभिरुची

यांनी आम्हांस लावली. असा एका हाताने राज्यकर्त्यांवर स्तुतिसुमनांचा वर्षाव करीत ' किरण 'कर्ते अलगदपणे वाचनखांचा दुसरा हात चालवितात, " जो जो फायदा यांनी आम्हांस दाखविला किंवा आम्हांकरिता म्हणून जे जे कृत्य यांनी केले, त्या सर्वांत यांनी आपले खटपटीबद्दल व मेहेनतीबद्दल वट्टा काढून घेतला नाही असे मात्र झाले नाही. आज अजमासे शंभर वर्षे यांचा व आमचा सहवास असल्यामुळे, विद्येचा फैलाव आम्हांमध्ये होत चालल्याकारणाने व यांच्या स्नेह-संघटणाचे योगाने आम्हांस टोपी घालून आपले स्वहित साधण्याची यांची शैली आता आम्हांस पुरी कळू लागली..."

इंग्रज सरकारने आमच्या स्वातंत्र्याचे अपहरण करुन आमच्या राष्ट्राचा तेजोवध केला ह्याची खंत त्यावेळच्या सर्वच नवशिक्षित पुढाऱ्यांना लागून राहिली होती. गुलाम राष्ट्रांना कसले राजकारण [ Subject races have no politics ] असाच जर राज्यकर्त्यांचा दृष्टिकोण असेल तर ' जिताच्या डोक्यात धोंडा ' एवढी एकच राजनीती आपल्या वाट्याला यावी हे क्रमप्राप्तच आहे. लॉर्ड सॅलिसबरीने १८७५ साली भारत सरकारचे सेक्रेटरी ह्या नात्याने काढलेले उन्मत्त उद्गार ह्या वेळी कदाचित नामजोश्यांच्या मनात घणघणत असतील. " ' As India must be bled, the lancet should be directed to the parts where the blood is congested '... असे क्रूर घाव एका पाठोपाठ एक साम्राज्यसत्तेने घातले. पण आजवर एक प्रकारच्या ' क्लोरोफॉर्म 'च्या गुंगीत ते आम्ही कसेबसे सहन केले. पण आता हा इंग्रजी सत्तेचा चरक आम्हांला असाच पिळत राहाणार असेल तर आमच्या तोंडून किंकाळी बाहेर पडल्याशिवाय कशी राहील ? आणि इकडे तर वेदनेचा एक अस्फुट हुंदका जरी आमच्या तोंडून बाहेर पडला तरी तो राजकर्त्यांच्या दृष्टीने राजद्रोह ठरणार." देशापुढील हा पेचप्रसंग स्पष्ट करताना नामजोशी लिहितात, " एकाद्या मनुष्यावर विकट शस्त्रक्रिया करणे असल्यास त्यास एक प्रकारची भूल देतात व पाहिजे ती क्रिया होईपर्यंत त्या भुलीचा अंमल तसाच टेवितात. तो अंमल असेल तावत् कालपर्यंत त्याचे अंगावर केलेल्या घावांची इजा त्यास समजत नाही. तद्वतच आम्हांस आमच्या राज्यकर्त्यांनी दिलेली भूल आजपावेतो असल्यामुळे त्यांनी आम्हांवर केलेले घाव आम्हांस समजले नाहीत. परंतु दारिद्र्यरुपी अंजनांनी ती भूल लयास जाऊन अनेक घाव झाल्यामुळे त्रस्त झालेले शरीरावर आता शस्त्राचा यत्किंचितही प्रहार सोसत नाही. त्यामुळे वेदना होतात त्या बाहेर येतात; परंतु हे सरकारचे लक्षात न येऊन राजद्रोहाचा डाग लावून आम्हांस सरकार दूषण देते"... परवशतेचा पाश गळ्याभोवती काचत असता गुलाम बनलेले राष्ट्र मनाशी पुनःपुन्हा शोध घेत असते तो म्हणजे खरोखरच ' आम्ही जिंकलेले आहो काय ! ' ' किरण ' मधील एका अग्रलेखात ह्या प्रश्नाचे उत्तर शोधीत असताना नामजोश्यांच्या मनश्चक्षु-

समोर गतेतिहासाच्या पानांची चळथ उलगडली जाते. हा इतिहास त्यांना गर्जून सांगतो की, "आम्हांस जिंकून आपले ताब्यात घेण्यासारखा पराक्रम आमचे राज्यकर्त्यांचे अंगी नव्हता; आणि नाही व पुढे येण्याचा संभव नाही असे समजण्यास फारशी हरकत नाही. आमचे राज्यकर्त्यांनी रणशूरत्व कधीच दाखविल्याचे स्मरत नाही." तर मग इंग्रजांनी हा देश हस्तगत करून घेतला तो कसा, ह्या प्रश्नाचे उत्तर देताना माधवरावांनी इंग्रजांच्या कुटिल राजनीतीचे दर्शन जणू 'क्ष किरण' टाकून 'किरण'च्या स्तंभातून अचूक घडविले आहे. ते म्हणतात, "आजपर्यंतचा या लोकांचा क्रम म्हणजे फंदफितूर करून अथवा करवून हरतऱ्हांनी लढाईशिवाय अन्यरूपाने लोकांस आपले ताब्यात घ्यावे व तसे होताच त्यांजजवळील शस्त्र वगैरे सामोग्री घेऊन आम्ही जयाचा झेंडा मिरविला अशी पोकळ प्रौढी मिरवावी व अशा प्रकारे वाघाचे बच्च्यांस पोटभर खावयास न घालता साखळदंडाने बांधून टेवितात. तद्वत प्रजेची स्थिती करून त्यास अन्नास मोताद करून राजनिष्ठतेच्या साखळदंडाने बांधून ठेवितात. त्याच क्रमाप्रमाणे आमची दशा करून आम्हांस आपले ताब्यात ठेविले आहे"... रोमच्या इतिहासातील प्याट्रिशियन व प्लेबियन यांचा दृष्टांत घेऊन आपला निष्कर्ष संपादक महाशय लेखाच्या अखेरीस मांडतात तो असा, "प्लेबियन लोकांनी ज्या रीतीने वर्तन केले व आपले हक्क स्थापित करून ते मिळवून पाट्रिशियन लोकांचे बरोबरीने राज्य करू लागले, याप्रमाणे आम्ही आपले वर्तन ठेवू तर मिनिनियस आग्रिपा येण्यास उशीर बिलकूल लागणार नाही..."

आमच्या साऱ्या राजकीय दुरवस्थेचे मूळ कारण इंग्रजांनी चालवलेल्या आमच्या अर्थशोषणात आहे हा सिद्धांत प्रथम महर्षी दादाभाई नवरोजी यांनी मांडला. त्यामुळे हिंदी राजकारणाचे अन्वयार्थच बदलून गेले. सुवेजचा कालवा झाल्याने हिंदुस्थान व पूर्वेकडील सर्व देश युरोपला, दहाबारा दिवसांचा प्रवास वाचल्याने जवळ झाले. त्यामुळे इकडील कच्ची द्रव्ये – कापूस, गहू, चहा ही युरोपातील बाजारात जलद व खराब न होता मिळू लागली. त्यामुळे तिकडे ती स्वस्त झाली तर आपल्याकडे महाग झाली. हिंदुस्थान देशात गरीब लोकांची संख्या आधीच जास्त होती. त्यांची स्थिती यामुळे जास्तच खराब झाली. उद्योगधंदे वाढले असते तर त्यातूनही डोके वर काढता आले असते. पण सुधारलेल्या राष्ट्रातील सुधारलेल्या उत्पादनाच्या पद्धतीशी टक्कर न मारता आल्यामुळे होते ते उद्योगधंदे डबघाईला आले किंवा साफ बुडाले. डाक्याची मलमल इतकी बारीक, इतकी तलम निघत असे की रात्री ती मैदानात पसरली आणि तिच्यावर दंव पडले तर ती डोळ्यांना दिसूदेखील नये. इतके हुन्नर हिंदू कारागिरांच्या बोटात असूनसुद्धा आमचे उद्योग-धंदे रसातळाला गेले. कारखाने वाढवावेत किंवा शेती सुधारावी असे कधी फारसे प्रयत्नच झाले नाहीत. लवकरच आमच्या देशातील सर्व पैसा इंग्रज सरकारने लुटून

आपला देश कनकमय करून टाकला. घरी, दारी, बाजारी सर्वत्र जणू विलायतच फोसळून राहिली. ' येणे करून लोकांची दुर्दशा उडून दिवसान दिवस देशाचे संपत्तीचा अधिकाधिक ऱ्हास होत चालला. ' असा निष्कर्ष या साऱ्या प्रकरणाचा आपल्या स्फुटात काढून पुढे किरणकर्ते लिहितात, " भारती कथेतील ' वत्सला-हरण ' समयी द्वारकापुरीत मायावी घटोत्कच राक्षसाने स्वकार्य सिध्यर्थ पदार्थमात्र रूपाने आपली माया फैलावून द्वारकावासी सर्वत्र जनांचे वस्त्रालंकार धनादि सर्व वित्त हरण करून अखेर त्या त्या पदार्थांच्या ऐवजी लोकांच्या हाती खापरे, नरोट्या, हाडे, शिंगे, रकटी, बुरणुसेच मात्र राहिली. तद्वत् ही विलायतची माया हिंदुस्थान देशाचे हाती केवळ नरोटी म्हणजे भिक्षापात्र देण्यास सर्वत्र पसरली आहे ..." लेखाच्या शेवटी माधवराव नामजोशी एक [ बहुधा स्वरचित ] दिंडीही उद्धृत करतात :-

' घरी दारी पाहता अर्थ सारा
दिसे परदेशिय वस्तूंचा पसारा।
परी माया ही सर्वपरी खोटी
शिघ्र हाती देईल हो नरोटी॥ '

त्यावेळचा ' जगडवाळ ' लागणारा सरकारी अंमलदाराचा यंत्रजाल पहिला म्हणजे पत्रकर्त्यांचे हे भविष्य खरे ठरण्यास फारशी वाट पहावी लागणार नाही अशी खात्री पटते. राज्यकर्त्यांच्या ह्या शासन यंत्रणेवरील होणारा खर्च सोसण्याची आम्हांस शक्ती नाही असे सरकारचे कानावर वारंवार घालूनही त्याचा काही उपयोग नाही. अरण्यातील आक्रोशाप्रमाणे आपले लिहिणे असे निष्फळ ठरलेले पाहून त्यावर अधिक भाष्य न करता पत्राच्या शेवटच्या पानावर अगदी तळाशी माधवराव थॉमस पेनचे एक वाक्य मागील पुढील काही संदर्भ न देता अवतरणात छापतात. : 'The nation has been alreaey bled in vein and is faint with loss of blood. ' राष्ट्रपुरुषाच्या प्रकृतिदोषाचे इतके अचूक निदान एखाद्या धन्वंतऱ्याला तरी करता आले असते काय ?

ह्याच सुमारास दुष्काळाने आपला भयानक जबडा उघडला आणि भूकबळींच्या आक्रंदनाने सारा देश भयकंपित झाला. नेमकी हीच वेळ खिरस्ती धर्मप्रसारकांना आपला गळ टाकून बघायला अनुकूल असते. दुष्काळाच्या वणव्यात होरपळणारे असंख्य जीव पावाच्या एका तुकड्यासाठी आपला प्यारा धर्म सोडायला तयार होतात. भूक माणसाला आपला आत्मा सैतानाला विकायला भाग पाडते हे ह्या धूर्त बिशपांना आणि रेव्हरंडांना पक्के ठाऊक होते. ' दुष्काळ का पडला ! ' या प्रश्नाचे उत्तर खिस्ती धर्मप्रसारकांनी असे दिले की, ' तुम्ही खिरस्ती धर्माचा अव्हेर केला, येशूचा शुभसंदेश स्वीकारण्याच्या कामी खळखळ केली त्याचे प्रायश्चित्त म्हणजे हा दुष्काळ आहे. '... [ The present famine was an instance of

retributive justice which is sure to overtake heathen India, because of her persistent obstincey in refusing to embrace the Gospel ] मिशनऱ्यांच्या ह्या युक्तिवादाचा फुगा आपला व्याजोक्तीच्या टाचणीने लीलया फोडताना नामजोशी लिहितात, " The converse is that India christianized shall ever be exempt from similar visitations.' ]

ख्रिस्ती धर्मप्रसारकांच्या शिक्षणसंस्था, अनाथाश्रम, अर्भकालये किंवा औषधालये ह्या साऱ्या अवडंबरावर symbols of disinterested kindness of Christians अशी चरचरीत तप्तमुद्रा नामजोश्यांनी मारलेली आहे. ह्या साऱ्या संस्था म्हणजे दयेच्या आवरणाखाली चालवलेले धर्मप्रसाराचे अड्डे होते. तशात राज्यकर्त्यांचा त्यांना छुपा पाठिंबा. त्यामुळे ' विषकुम्भं पयोमुखम् ' अशीच ह्या मिशनरी लोकांच्या सामाजिक संस्थांची अवस्था झाली होती. त्यावेळी त्यांच्या अनेक अनाथाश्रमांतून छोट्या छोट्या बालकांना आश्रमातून अगदी पहिल्या दिवसापासून बायबलातील प्रार्थना शिकविल्या जात असत. अशा प्रकारे कानात कुणी नुसते ' कुर्र ऽ ऽ ' केल्याबरोबर बाटणारे लोक आफ्रिकेतील रानटी टोळयात त्यांना हवे तितके मिळाले असते. तरी सांस्कृतिकदृष्ट्या प्रगत असलेल्या हिंदी लोकांच्या धर्मनिष्ठा इतक्या खोलवर मुरलेल्या होत्या की इथे असे धर्मांतर जवळ जवळ अशक्यप्रायच होते. उलट अशा प्रयत्नांनी ख्रिश्चन मिशनऱ्यांनी आपल्या हातानेच आपला मरणलेख लिहिला असे नामजोशी लिहितात. [ किरण : २ सप्टें. १८७७]

रावबहादूर शंकर पांडुरंग पंडित आपले ' वेदार्थ यत्न ' हे मासिक पुस्तक १८७६ सालापासून काढू लागले. यात आपल्या लोकांचे अत्यंत प्राचीन जे वेदग्रंथ त्यांचे मराठी भाषांतर ते छापीत असत. ज्याप्रमाणे युरोपात पंधराव्या शतकात प्राचीन ग्रीक व लाटिन या भाषांचे अभ्यासाने जुन्या विद्येचे पुनरुज्जीवन होऊन धर्म, नीती, राज्यव्यवस्था, लोकाचार वगैरे सर्व बाबतींत तिकडील लोकांची सुधारणा झाली तशी वेदग्रंथांचे भाषांतर झाल्याने या देशाचीही उन्नती होईल अशी आपल्याकडील लोकांची तेव्हा समजूत होती. अशा सांस्कृतिक पुनरुज्जीवनाचा ' वेदार्थ यत्न ' हा एक प्रयत्न होता. ' वेदार्थ यत्ना 'वर लेखक म्हणून रावबहादुर पंडितांनी आपला नामनिर्देश केलेला नव्हता. त्यामुळे ' किरणच्या ' स्तंभातून [ ७ ऑक्टो. १८७७ ] 'वेदार्थ यत्ना 'चे परीक्षण करताना प्रारंभीच नामजोशी लिहितात, " We have heartily to thank the well known author of the Vedarthayatna, whose name we are sorry to say we are not permitted to pronounce. " ' वेदार्थ यत्ना 'च्या परीक्षणाच्या निमित्ताने आपण वाङ्मयीन समीक्षेच्या क्षेत्रात पदार्पण करीत आहोत याची जाणीव नामजोश्यांना आहे. वीतभर पोटाची खळगी कशी भरावी या काळजीत पडलेल्या चिंतातुर जतूंना ' तान् प्रति

नैव यत्नः ' असे कदाचित वाटेल. तसेच वेदांताच्या जड तत्त्वज्ञानात किंवा पुराणांतरीच्या दंतकथांत व कल्पित कथांत रस नसणाऱ्यांना सारा मूर्खपणाचा बाजार आहे असेही वाटेल. अशा आक्षेपकांना 'वेदार्थयत्ना'चे वाङ्मयीन व सांस्कृतिक मूल्य काय आहे हे समजावून सांगण्यात संपादकांनी सुरुवातीला बरीच जागा आणि वेळ खर्ची घातलेला आहे. पुढील विवेचनातही सायणाचार्य, मध्वाचार्य आणि जर्मन पंडित मॅक्समुल्लर यांच्यावर स्तुतिसुमने उधळण्यातच कालापव्यय केला आहे. रावबहादूर पंडितांच्या मूळ कलाकृतीचे अंतरंग उलगडून दाखविण्याचा प्रयत्न यापूर्वी 'दंभहारक', ' निबंधमाला ' किंवा ' नेटिव ओपिनियन ' या पत्रांतून जसा झाला होता तसा लिहिण्याचा रोख नामजोश्यांचा नाही. सांस्कृतिक संचितावरचा भाबडा विश्वास आणि पुनरुज्जीवनाचा उद्घोष ह्यामुळेही टीका शब्दबंबाळ झाली आहे. पण एक खंत बोलून दाखविताना माधवरावांनी आपला देशभक्तीचा बाणा उघड केला आहे. ते लिहितात, " A Max Muller or a Monier Williams would receive thousands for editing an old Sanskrit work but a Native Pandit would have to beg from door to door before he is in a position to get the correct copy of a certain manuscript. " गुलाम राष्ट्राच्या मनात ठणकणारी वेदनाच पत्रकाराने बोलून दाखविली आहे. पण शेवटी मात्र एक विश्वास त्यांनी व्यक्त केला आहे की अशा प्रयत्नातून समाजपरिवर्तन करणारा उद्याचा एखादा मार्टिन लूथर ह्या शापित देशात निर्माण होईल. म्हणून ' वेदार्थ–यत्न ' म्हणजे प्रबोधन कालाचे प्रसाद–चिन्ह आहे असे त्यांना वाटते.

किरणची आर्थिक बाजू ' कुछ रोटी – कुछ लंगोटी ' अशी बेतास बात होती. तशात १४ मार्च १८७८ रोजी लॉर्ड लिटन यांनी देशी भाषांतील वृत्तपत्रांच्या मुसक्या बांधणारा कायदा पास केला. देशी भाषांतील वर्तमानपत्रांची यामुळे कोंडी झाली. तशात महादेव बल्लाळांनी संस्थानिकांची कड घेऊन राज्यकर्त्यांवर हत्यार धरले. कायद्याच्या कैचीत 'किरणचा' गळा सापडतो की काय अशी परिस्थिती निर्माण झाली. ह्याच सुमारास मुंबईच्या कोणा व्यापाऱ्यांस ३२०० रुपयांची खोटी हुंडी दिल्याचे प्रकरण उद्‌भवून माधवरावांच्या अब्रूचे धिंडवडे निघाले. या कठीण प्रसंगी न्या. रानड्यांच्यासारखा कैवारी पाठीशी उभा राहिला. त्यामुळे माधवराव भुईसपाट झाले नाहीत इतकेच. पण ' किरणशी ' त्यांचे सावकार केशव बल्लाळ साठे यांनी त्यांना काडीमोड घेणे भाग पाडले. नामजोश्यांना दूर करून किरणचे चार सहा अंक कसेबसे साठ्यांनी काढले. पण ते तितकेच. अखेर किरणची इतिश्री झाली ती कायमचीच.

# वाल्मीकि रामायणात नाथांनी केलेल्या बदलाची प्रेरणा

सौ. अश्विनी अरविंद नावडीकर

---

कथेची अभिरुची निर्माण झालेल्या बालकापासून ते पंडितापर्यंत रामकथा सर्वांनाच प्रिय झालेली आहे. वाचनाने वा श्रवणाने रामकथेतील घटना व त्यातील पात्रे यांच्या-बद्दलच्या माहितीत अधिकाधिक भर पडत जाऊन अखेर वाचकाला मूळ कथानकाचा विसर पडू लागतो. आज उपलब्ध असलेले ' वाल्मीकी रामायण ' जे आदि महाकाव्य म्हणून गणले जाते त्यात आणि नाथांनी ज्याला विश्वकोषाचे स्वरूप प्राप्त करून दिले आहे असे मराठी भाषेतील 'भावार्थ रामायण' यात फरक पडलेला दिसून येतो.

नाथपूर्व मराठी वाङ्मयात श्रीकृष्णाचे प्राधान्य असल्याने रामकथेबाबत काही त्रोटक निर्देश आढळत असले तरी समग्र रामचरित्राचे आकलन होईल असा व्यापक स्वरूपाचा ' भावार्थ रामायण ' हा पहिलाच ग्रंथ होय. ' वाल्मीकी रामायणाचा ' प्रामुख्याने आधार घेऊन नाथांनी लेखन केले असले तरी ' भावार्थ रामायण ' म्हणजे ' वाल्मीकी रामायणाचे ' भाषांतर नव्हे. आपल्या काळी उपलब्ध असलेल्या रामायणांचा आधार घेऊन नाथांनी आपली रामकथा समृद्ध करण्याचा प्रयत्न केला. डॉ. कामिल बुल्के आपल्या ' रामकथा उत्पत्ति और विकास ' या ग्रंथात म्हणतात, " मुख्य कथानक एकनाथने वाल्मीकी रामायण ( पश्चिमोत्तरीय पाठ ) के ढाँचे के अनुसार प्रस्तुत किया है। समस्त रचनामें जो भक्तिका वातावरण है उसका आधार ' अध्यात्म रामायण ' है और वाल्मिकीसे भिन्न नवीन सामग्री मुख्यतया ' आनंद रामायण ' पर आधारित है। "

इतर ग्रंथांचा आधार घेतल्यामुळे स्वाभाविकच नाथांची रामकथा आपले वेगळेपण सिद्ध करू लागली. वाल्मीकीसारख्या महान् कवीची रामकथा समोर असताना नाथांनी ती जशीच्या तशी मराठीत आणण्याचा प्रयत्न का केला नाही ? रामकथेला निराळे वळण देण्याचा विचार त्यांना का करावा लागला, असा प्रश्न पडतो. याचे उत्तर शोधताना असे लक्षात येते की वाल्मीकी आणि एकनाथ या दोन्ही लेखकांचा काळ भिन्न होता. सामाजिक, राजकीय परिस्थिती भिन्न होती आणि त्यामुळेच दोघांचाही रामकथेकडे पाहण्याचा दृष्टिकोणच भिन्न झाला.

एकनाथांनी ज्या काळात भावार्थ रामायणाची रचना केली तो काळ म्हणजे इस्लामी आक्रमणाचा काळ होय. इ. स. १३१२ मध्ये यादवांची सत्ता संपुष्टात आली. विजयनगरच्या हिंदु साम्राज्याने थोडी फार उभारी धरली असली तरी महाराष्ट्रात त्याचे पडसाद उमटले नाहीत. हिंदवी साम्राज्य इस्लामी आक्रमणाखाली

अनुक्रमणिका

दडपले गेले. यावनी आक्रमणाच्या या तडाख्यात हिंदूंची देवालये, कलाकुसरीचे असंख्य नमुने उध्वस्त झाले. धर्मग्रंथ नष्ट झाले. यवनांच्या पाशवी अत्याचाराखाली महाराष्ट्र आतून बाहेरून होरपळून निघाला. तीर्थयात्रेच्या निमित्ताने हिंडत असताना हिन्दुधर्मियांची ही अगतिकता नाथांनी पाहिलेली होती. स्वत्वाभिमान गमावल्याने कर्तव्यभ्रष्ट झालेल्या व धर्मसंकटात सापडलेल्या समाजाचा ऐहिक उत्कर्ष होईल व त्याला पारमार्थिक कल्याणाचा दिलासा मिळेल असे एखादे आदर्श चरित्र लोकांसमोर ठेवणे आवश्यक होते. रामाला आदर्श मानून लेखन करणे हे मराठी भाषेपुरतेच मर्यादित राहिले नव्हते. ती काळाची गरज बनली होती. रामासारख्या आदर्श पुरुषोत्तमाचे चरित्र सांगण्याचे अन्य भाषांतून बरेच प्रयत्न झालेले आपल्याला आढळतात. एकंदरीत तो काळ व परिस्थितीच अशी चमत्कारिक झालेली होती की अन्य भाषिकालासुद्धा समाज-जागृतीसाठी रामचरित्राचे लेखन करावेसे वाटू लागले.

त्याग, पराक्रम, प्रभुत्व, स्वाभिमान, लोकसंग्रह हे गुण रामचरित्रात प्रकर्षाने दिसून येतात. त्यामुळे या गुणांचे समाजाच्या सर्वांगीण प्रगतीच्या दृष्टीने असलेले मोल लक्षात घेऊन नाथांनी मोठ्या विस्ताराने रामचरित्राचे लेखन केले.

रामचरित्राची रचना करीत असताना वाल्मीकींच्या मनात कोणताही प्रचार करण्याची वा समाज जागृतीची तळमळ नव्हती. स्वतःच्या मनःशांतीसाठी ब्रह्मदेवाच्या सूचनेने रामासारख्या एका मर्यादा पुरुषोत्तमाचे चरित्र काव्यबद्ध करण्यास ते सज्ज झाले होते. त्यामुळे त्यांचे काव्य ही एक श्रेष्ठ दर्जाची कलाकृती झाली. नाट्यमयता, वास्तवता, सूचकता, उत्तम दर्जाचे निसर्गचित्रण, नाजूक प्रसंगाचे अचूक टिपण करणे ही त्यांच्या काव्याची वैशिष्ट्ये होत. मानवी स्वभावाचे अचूक ज्ञान हे वाल्मीकींचे वैशिष्ट्य त्यांच्या प्रत्येक व्यक्तिरेखेतून प्रगट झालेले दिसते.

कुश–लव यांनी आपल्या पित्याला म्हणजे रामाला त्याचेच चरित्र गाऊन दाखवणे अशा मोठ्या नाट्यमय प्रसंगाने या काव्याचा प्रारंभ झाला आहे. रामासह सर्व व्यक्तिरेखा वाल्मीकींनी व्यक्तिनिष्ठ पद्धतीनेच रंगविलेल्या आहेत. रामाच्या कर्तृत्वाचा विचार करता ही एक असामान्य व्यक्ती आहे यात शंकाच उरत नाही. आदर्श पुत्र, आदर्श बंधू, आदर्श शास्ता, एक महान योद्धा वगैरे कोणत्याही प्रकारे त्याचे श्रेष्ठत्व सिद्ध केले तरी अखेर तो एक मानव म्हणूनच कथानकात वावरताना दिसतो. त्यामुळे स्वाभाविकच मानवसुलभ विचार–विकार हे त्याच्या ठिकाणी आढळतात. आनंद, दुःख, मोह, शोक, विरह, व्याकुळता ह्या सर्व गोष्टी त्या त्या प्रसंगानुसार त्याच्या चरित्रात दिसून येतात. अर्थात तो विकारांच्या आधीन मात्र झालेला दिसत नाही हे त्याचे वैशिष्ट्य होय. विलक्षण संयम त्याच्या ठिकाणी

दिसून येतो; स्वतःच्या सामर्थ्यावर त्याचा पूर्ण विश्वास आहे. यामुळेच मानव असूनही देव म्हणून त्याच्यापुढे नतमस्तक व्हावे एवढे त्याचे व्यक्तिमत्त्व विशाल आहे. आहे. विनम्रता हा तर रामाचा स्थायीभाव आहे. त्याचे सामर्थ्य पाहून देवता जेव्हा त्याचा गौरव करतात तेव्हा राम म्हणतो–' आत्मानं मानुषं मन्ये रामं दशरथात्मजम्।' एक मानव या भूमिकेतून रामाचे चित्रण करणे हे वाल्मीकींच्या भूमिकेला आवश्यक होते. याचे कारण देव, यक्ष, गंधर्व, किन्नर, राक्षस इ. कोणाकडूनही तुझा वध होणे शक्य नाही असा रावणाला वर मिळालेला होता. मानवाला तो कसपटासमान मानीत असे. त्यामुळेच रावणाचा वध करण्यासाठी एखादी असामान्य व्यक्तीच निर्माण करणे आवश्यक होते.

रामचरित्राची रचना करताना नाथांची भूमिका कोणती होती यावर विचार करता असे लक्षात येईल की नाथकालीन समाज हा इस्लामी आक्रमणाच्या तडाख्यात सापडलेला होता. त्यामुळे लोकांना धर्म, आचार, संस्कृती या कशाचेच भान उरलेले नव्हते. आपला पराक्रम, स्वत्वाभिमान गमावून बसलेल्या समाजाला वर काढणे ही गोष्ट फार कठीण होती. अशा वेळी रामासारख्या आदर्श नेत्याचे चरित्र समाजापुढे ठेवून जागृती करण्याची कल्पना नाथांना सुचली असावी. यासाठी रामाकडे केवळ मनुष्य ह्या दृष्टिकोणातून पाहून चालणार नाही हे जाणून त्यांनी रामाबद्दल परमेश्वरी अवताराची भूमिका पत्करली. आपल्या रामकथेला भक्तिमार्गाची पार्श्वभूमी देण्यासाठी 'योगवासिष्ठ' व 'अध्यात्म रामायण' यांचा आधार घेतला. अशा प्रकारे समाजोद्धाराच्या तळमळीतूनच नाथांच्या भावार्थ रामायणाचा जन्म झाला आणि भक्तिमार्गाच्या प्रचारासाठी नाथांनी आपली रामकथा अक्षरशः राबविली असेच म्हणावे लागेल.

प्रभु रामचंद्र हे आराध्य दैवत असल्याने नाथांची संपूर्ण वृत्तीच राममय होऊन गेली. जागृती, स्वप्न, सुषुप्ती अशा तिन्ही अवस्थांत रामायण त्यांच्या डोळ्यासमोर उभे राहू लागले. समाजप्रबोधनासाठी रामचरित्राची निर्मिती करण्याची नाथांना जबरदस्त ओढ होती. आपल्या लेखनाचे सारे श्रेय ते प्रभू रामचंद्रांना देतात. ज्याचे चरित्र लेखन करायचे तो प्रत्यक्ष प्रभु रामचंद्रच त्यांचा प्रेरक होता व त्यानेच आपल्याकडून रामायण लिहवून घेतले अशी त्यांची दृढ श्रद्धा होती. या श्रद्धेने रामचरित्र लिहीत असताना मूळ कथेचा ओघ कायम ठेवून ऐतिहासिक कथाभागाला नाथांनी अध्यात्माचे रूप देण्याचा प्रयत्न केला.

" करावया राक्षसांचा घात। मी अवतरेन रघुनाथ।
रमा मुख्य कलहा हेत। इचेनि अंत निशाचरा॥ "

हे आपल्या रामकथेचे मुख्य प्रयोजन सांगून त्यांनी रामचरित्र सांगण्यास प्रारंभ केला.

परमार्थ प्रचारासाठी नाथांनी आपली रामकथा राबविली त्यामुळे त्यांच्या काव्यात वस्तुनिष्ठा नाही. तसेच अध्यात्म विचार हा त्यांच्या काव्यात स्वाभाविकपणे आलेला नाही, त्यामुळे कित्येकदा त्याचे स्वरूप हास्यास्पद ठरते. अध्यात्माच्या भूमिकेतून लेखन केल्याने चमत्काराला, अद्‌भुततेला त्यांच्या लेखनात स्थान मिळालेले दिसते. ईश्वरी अवताराची कल्पना स्वीकारल्याने त्यांच्या राम, सीता, रावण वगैरे पात्रांना पुढील घटनांचे ज्ञान आहे. त्यामुळे कथानकातील उत्सुकता कमी होते. पण रामकथा काव्यबद्ध करणे हा त्यांचा हेतूच नाही. एका शिक्षकाची भूमिका पत्करून समाजाचे दोषदिग्दर्शन करून जागृतीचे कार्य करीत असताना काव्यात्मक मूल्यांचा विचार करण्याची नाथांना गरज नव्हती. जनकल्याणाची आंतरिक तळमळ त्यांच्या काव्यातून प्रभावीपणे व्यक्त झालेली आहे. हे सर्व मनात वागवूनच वाल्मीकींच्या रामचरित्रातील मूळ घटना आणि त्यात पुढे होत गेलेले बदल यांचा 'वाल्मीकी रामायण' व 'भावार्थ रामायण' यांच्या आधारे या ठिकाणी विचार करायचा आहे.

वाल्मीकी रामायणाच्या अयोध्याकांडात व भावार्थ रामायणाच्या बालकांडात आलेली श्रावणाची कथा पाहिली तर असे लक्षात येईल की कथेचा मथितार्थ सारखाच असला तरी तपशिलात थोडा फरक आढळतो. वाल्मीकी रामायणातील कथेत 'श्रावण' असा नामनिर्देश नसून केवळ तापस एवढाच उल्लेख येतो राजा दशरथ शिकारीसाठी जेथे आला होता तेथून त्या तापसाचा आश्रम जवळच होता व तेथून तो पाणी आणण्यासाठी सरयूवर आला असे पुढील श्लोकावरून लक्षात येईल—

" इयमेकपदी राजन्यतो मे पितुराश्रमः।
तं प्रसादय गत्वा त्वं न त्वा संकुपितः शपेत्॥" (वा. रा. २·६३·४५)

म्हणजे तापसाला जेव्हा बाण लागला तेव्हा त्याची मातापिता जवळ नसून दूर होती हे उघड आहे. नाथांची विचारसरणी याबाबत भिन्न आहे—

" अंधारी अंध माता पिता। झाडी ठेवी हे मिथ्यावार्ता।
खांदी घेवोनी ताता। जीवनार्थ तो आला॥" (भा. रा. १·१·५७)

श्रावण व त्याचे अंध मातापिता ब्राह्मण असल्याचे नाथांनी सांगितले आहे—

" ब्राह्मण शाप नव्हे वृथा। मी पुत्र पावेन सर्वथा।"
" फेडावया ब्रह्महत्या डाग। केला अश्वमेध याग।"

यांतून ते स्पष्ट होते. परंतु दशरथाच्या हातून बाण लागल्यावर तो काढून टाकण्याची विनवणी करताना तापस राजाला म्हणतो—

अनुक्रमणिका

" ब्रह्महत्याकृतं पापं हृदयादपनीयताम्।
न द्विजातिरहं राजन्मा भूत्ते मनसो व्यथा॥ " (वा. रा. २·६३·५०)

तो तापस ब्राह्मण नाही असा वाल्मीकी रामायणात स्पष्ट उल्लेख असताना भावार्थ रामायणात मात्र तो ' ब्राह्मण ' असल्याचा उल्लेख का येतो, असा स्वभाविकच प्रश्न पडतो ! या ठिकाणी नाथांनी वाल्मीकी रामायणाचा आधार घेतलेला नाही. कारण ब्राह्मणाच्या आशीर्वादाला तसेच शापवाणीला महत्त्व असते, वाचासिद्धीसारखाच भाग असतो. श्रावणाच्या मातापित्यांनी राजाला दिलेला शाप कथानकाच्या दृष्टीने फारच महत्त्वाचा आहे ती शापवाणी कथानकातील अनेक पात्रांच्या दुःखाला कारण ठरली आहे; ज्यांच्या शापवाणीने एका राजाचा मृत्यू घडून आला ती व्यक्ती ब्राह्मण आहे असे सांगून मोठा मान देण्याचा नाथांचा विचार असावा.

बालकांडातील, गौतमानी अहल्येला दिलेल्या शापाची कथा दोन लेखकांच्या मनोवृत्तीतील फरक दाखविण्याच्या दृष्टीने महत्त्वाची आहे. अहल्येच्या शापाबाबत वाल्मीकी रामायणात असा उल्लेख येतो—

" इह वर्ष सहस्राणि बहूनि निवसिष्यसि।
वातभक्षा निराहारा तप्यन्ती भस्मशायिनि।
अदृश्या सर्व भूतानामाश्रमेऽस्मिन्वसिष्यसि। " (वा. रा. १·४८·२९-३०)

' इतर कसल्याही प्रकारचा आहार न करता केवळ वायुभक्षण करून व भस्मात पडून राहून आपल्या कृतकर्माचा पश्चत्ताप करीत तू हजारो वर्षे या ठिकाणीच वास्तव्य कर, व कोणत्याही प्राण्याच्या दृष्टीस न पडता (कोणालाही तोंड न दाखवता) तू येथेच आश्रमामध्ये पडून रहा. ' यापुढे लगेचच असा उल्लेख येतो की दशरथ-पुत्राच्या आदरातिथ्याने तू शुद्ध होशील व आनंदाने माझ्या समीप येशील तेव्हा पूर्ववत लोकांच्या दृष्टीस पडशील. या प्रसंगाचे नाथ वर्णन करतात—

" जाणोनि परपुरुषाचे ज्ञान। भोगी न कंटाळे तुझे मन।
ते तू होसी पाषाण। शिळा जाण जडत्वे॥ " (भा. रा. १·१४·७९)

अहल्येने कळकळीने विनवणी करताच प्रभु रामचंद्र भेटतील तेव्हा तू पापमुक्त होशील असा गौतमानी तिला उःशाप दिला.

गौतम पत्नी अहल्या शिळा झाली व रामाने आपल्या पदस्पर्शाने तिचा उद्धार केला. ही कल्पना नाथांनी आनंद रामायणावरून घेतली असावी. (आ. रा. १·३·२१) शिलावत् राहण्याची लाक्षणिक कल्पना प्राकृत रामायणकारांनी वाच्यार्थाने घेतली. रामाच्या अवतारी कल्पनेला ती पोषक वाटली असावी, म्हणून रामस्पर्शाने पुन्हा शिळा, अहल्या झाली ही अद्भुत कल्पना पुढे आली.

मूळ वाल्मीकी रामायणामध्ये असा उल्लेख येतो की विश्वामित्रांच्या सूचनेने राम लक्ष्मणांनी आश्रमाच्या दारात पाऊल ठेवताच आतल्या बाजूस समोर बसलेली अहल्या त्यांना दिसली. राम-लक्ष्मणांनी तिच्या पायावर मस्तक ठेवले. तिनेही यथा-विधी पाद्य, अर्घ्य इत्यादींनी त्यांचे आतिथ्य केले. म्हणजे अहल्या शिळा नव्हती हे वाल्मीकी रामायणावरून स्पष्ट होते.

वाल्मीकी रामायणात सीता स्वयंवराचा प्रसंगच नाही. जनक राजा विश्वामित्रांना सांगतो, 'त्र्यंबक चाप सज्ज करण्यास समर्थ असे ज्याचे वीर्य असेल त्याला सीता द्यायची असा पण केला आहे.' 'राम जर हे धनुष्य सज्ज करील तर अयोनिसंभव सीता मी दाशरथीला देईन.' रामाने सहजपणे ते धनुष्य उचलले व प्रत्यंचा चढविली. ते धनुष्य कानापर्यंत ओढताच मात्र ते काडकन् मोडले. रामाचा अद्‌भुत पराक्रम पाहून जनकाने सीता रामाला देण्याचे मान्य केले. वाल्मीकी रामायणाचा आधार न घेता नाथांनी आनंद रामायणाच्या आधाराने सीता स्वयंवराचा प्रसंग चांगल्या रीतीने रंगविला आहे.

स्वयंवरासाठी आलेल्या राजांच्या नामावळीत रावणाचाही उल्लेख आहे. रावणाला पाहताच सीता परमेश्वराचा धावा करू लागली. स्वयंवराचा पण घोषित करताच गर्वाने धनुष्य उचलू पाहणाऱ्या रावणाच्या फजितीचे नाथ वर्णन करतात :

"तव ते पूर्वीच पालथे। बळे करू जाता उलथे।
भोवंडिता न भोवे विसा हाते। रावणाभोवते भोंविन्नले॥
धरिता न धरावे महाभारी। लोटिता न लोटावे विसाही करी।
येऊनि आदळे उरावरी। पालथा शिरी पडियेला॥" (भा. रा. १·१८·१७-१८)

रावणाच्या फजितीचे वर्णन करून प्रसंगाची रंगत वाढविण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. वाल्मीकी रामायणात स्वयंवर प्रसंगच नसल्याने तेथे रावण येण्याचा प्रश्नच उरत नाही. म्हणजे भावार्थ रामायणाच्या दृष्टीने नायक व खलनायक यांची गाठ स्वयंवर मंडपातच पडली आहे. उलट वाल्मीकी रामायणात त्याची भेट रणभूमीवरच झालेली दिसते.

युद्धसमयी दशरथाच्या रथाचा आस मोडला असता तो रथ कैकयीच्या बाहूंनी सावरला गेला. त्यामुळे संतुष्ट झालेल्या राजाने कैकयीला दोन वर दिले अशी कथा भावार्थ रामायणात आहे. नाथांनी आनंद रामायणावरून ती कथा घेतली असावी. शंबरासुराशी युद्ध चालू असताना जखमी झालेल्या दशरथाला कैकयीने रणातून दूर नेऊन त्याची शुश्रूषा केली व दोन वर मिळवले अशी कथा वाल्मीकी रामायणात ११ व्या सर्गात आली आहे.

'तत्रापि विक्षतः शस्त्रैः पतिस्ते रक्षितस्त्वया' (वा. रा. २·९·१६)
'तत्र त्वां च्यावयच्छत्रुस्तव जीवितमन्तरा' (वा. रा. २·११·१८)

एवढाच कैकयीच्या संदर्भात उल्लेख येतो. हे अगदी योग्य वाटते. नाथ स्वतः उत्तम कीर्तनकार असल्याने प्रसंग खुलवून सांगण्याच्या दृष्टीने त्यांनी आनंद रामायणातील कथेचा स्वीकार केला असावा. या प्रसंगाने मिळालेले वर कैकयीने राखून ठेवले व अगदी योग्य समयी त्याची मागणी करून राजाला पेचात टाकले त्यामुळे या कथेला महत्त्व आले. कथेत बदल करण्यामागे लोकानुरंजनापेक्षा काही वेगळा हेतू असेल असे वाटत नाही.

रामभेटीसाठी आलेल्या भरताने गुहाला मी कोणत्या मार्गाने भरद्वाज मुनींच्या आश्रमात जावे असे मी विचारताच वाल्मीकीचा गुह स्पष्टपणे म्हणतो, ' कर्तव्यदक्ष आणि या प्रदेशातील माहीतगार असे धीवर तुझ्याबरोबर येतील आणि मीही तुझ्या-बरोबर येईन. परंतु सरळपणे वर्तन करणाऱ्या रामाविषयी काही दुष्टभाव मनात धरून तर तू जात नाहीस ? तुझ्या या प्रचंड सेनेमुळे मला तशी शंका येते. ( वा. रा. २·८५·५·७ )

वाल्मिकींच्या लेखनशैलीतील हा परखडपणा नाथांच्या लेखणीतून उतरत नाही

" माझा स्वामी रघुनाथ । तयाचा हा करू पाहे घात ।
मी रणी विभांडीन भरत । सेना समस्त छेदीन ॥ " ( भा. रा. २·१२·८३ )

असा त्यांच्या गुहाचा आवेश असला तरी

" श्रीराम माझा माता पिता । श्रीराम माझा सुहृद भ्राता ।
श्रीराम सद्‌गुरू निजात्मता । श्रीराम तत्त्वता आत्मा माझा ॥ "
( भा. रा. २·१२·८४ )

या ओवीने त्या आवेशाचा जोर कमी होतो. परमार्थाच्या हव्यासापायी संघर्षाची धार बोथट होते व तो संघर्ष मिळमिळीत वाटू लागतो.

"हे जरी आले युद्धासी । तरी मी ख्याति लावीन त्यांची ।
धडमुंडांकित पृथ्वीसी । क्षणार्धेसी मी करीन ॥ ( भा. रा. २ १२·८८ )

असा बोलण्यातील त्वेष असला तरी हे सर्व का ? मित्रकर्तव्य म्हणून असते तर त्याचा जोर वाढला असता. पण ' श्रीराम माझी माता पिता...' या अध्यात्मिक वलयात गुरफटल्याने त्याच्या बोलण्याला वजन राहत नाही.

शूर्पणखेच्या विरूपीकरणाचा प्रसंग सर्वांनाच ज्ञात आहे. वाल्मीकींची शूर्पणखा वनात येते ती कांतिमान व सुंदर अशा रामावर अनुरक्त होऊनच ! रामाकडून हकीगत कळल्यावर व मग स्वतःबद्दलची माहिती सांगून ती रामाला म्हणते :

'हे राम, तुझे अपूर्व रूप दृष्टीस पडल्याने तू पुरुषश्रेष्ठ माझा पती व्हावास या;

हेतूने मी प्रेमाने तुझ्याकडे आले आहे. सीता विकृत व कुरूप असल्याने तुला अनुरूप नाही. भार्या या नात्याने तू माझा स्वीकार कर.' (वा. रा. ३·१८·२०)

परंतु रामाने शूर्पणखेला, 'माझा विवाह झाला आहे, पण माझा कनिष्ठ भ्राता अविवाहित आहे. तो तुझ्या रूपाला योग्य असा पती होईल' असे सांगितल्यावर मग शूर्पणखा लक्ष्मणाकडे जाते. हा संवाद भावार्थ रामायणात नाही. तेथे शूर्पणखेची प्रथम गाठच मुळी पडते ती लक्ष्मणाशी! ती लक्ष्मणालाच आपला पती होण्याची विनंती करते. लक्ष्मणाच्या आज्ञेने ज्येष्ठ भ्रात्याची अनुज्ञा घेण्यासाठी शूर्पणखेचे येणे, रामाचे तिच्या पाठीवर निरोप पत्र पाठवणे वगैरे कथाभाग नवीन आहे. वाल्मीकी रामायणात याचा उल्लेख नाही. वाल्मीकी रामायणातही कथानकातील सर्व पात्रे एकत्रच आहेत. त्यामुळे शूर्पणखेची दोघांनी केलेली थट्टामस्करी यातून सुंदर विनोद निर्मिती झालेली आहे. पण नाथांनी घटनेतच बदल केल्याने एक प्रकारचे विकृत स्वरूप निर्माण झाले आहे. वाल्मीकी रामायणातील उल्लेखानुसार सीतेला खाण्याच्या उद्देशाने शूर्पणखा धावून येताच रामाने तिला विरूप करून टाकण्याची आज्ञा लक्ष्मणाला केली आहे. विरूप कसे करावे ही सूचना रामाने दिलेली नाही. भावार्थ रामायणात रामाने ती आज्ञा स्वतःच केल्याचा उल्लेख येतो.

"सहनासिक सगट ओष्ठ। वेगे करावे सरसपाट।
हाचि इचा शेसपाट। आज्ञा वरिष्ठ हे माझी॥" (भा. रा. ३·९·४६)

लक्ष्मणाने तिचे नाक कापून पाण्यात टाकले. त्या तीर्थात अजूनही निर्नासिक मत्स्य सापडतात अशी माहिती नाथांनी पुरविली आहे.

आपण रामदूत असून सुग्रीवाचा मंत्री असल्याचे हनुमंताने सीतेला वारंवार सांगितले तरी रावणच वेषांतर करून आला असावा ही तिच्या मनातील शंका दूर होईना. सीतेने हनुमंताला राम–लक्ष्मणांच्या चिन्हांचे वर्णन करण्यास सांगितले. त्याप्रमाणे तपशिलवार वर्णन करताच तिची खात्री पटली, म्हणून हनुमंताने रामनामांकित मुद्रा तिच्या स्वाधीन केली. मुद्रिका हाती पडताच सीतेची त्यावरील प्रतिक्रिया वाल्मीकींनी फार सुंदरपणे व्यक्त केली आहे :

"गृहीत्वा प्रेक्षमाणा सा भर्तुः करविभूषितम्।
भर्तारमिव संप्राप्तं जानकी मुदिताऽभवत्॥" (वा. रा. ५.३६·४)

'भर्त्याचे ते हस्तभूषण हातात घेऊन ती जानकी पाहू लागली. तेव्हा जणू काही प्रत्यक्ष भर्त्याचीच गाठ पडल्याप्रमाणे तिला आनंद झाला.' यावरून एक गोष्ट लक्षात येईल की वाल्मीकींच्या हनुमंताने सीतेला मुद्रिका प्रत्यक्ष भेटीतच दिलेली आहे.

नाथांच्या हनुमंताने सीतेची भेट घेण्यापूर्वीच मुद्रिका सीतेपुढे टाकली आहे. नाथानी यातून अगदी स्वतंत्र व मोठा नाट्यमय असा प्रसंग निर्माण केलेला दिसतो. सीतेपुढे मुद्रिका टाकल्यावर ती मुद्रिका पाहून तिची होणारी प्रतिक्रिया अजमाविण्याचा . हनुमंताने प्रयत्न केलेला दिसतो. ती राममुद्रिकाच आहे अशी खात्री पटताच सीता त्या मुद्रिकेशी बोलू लागते. मुद्रिकेला सीतेने विचारलेले प्रश्न आणि मुद्रिका उत्तर देत नाही असे पाहून सीतेची झालेली अवस्था याचे नाथानी फार सुंदर वर्णन केले आहे. मुद्रिकेला सीता मोठ्या काकुळतीने विचारते —

" मुद्रिके तू सांगे गोष्टी । रावणे माते हरिल्यापाठी ।
दोघे येवोनि पंचवटी । अति संकटी काय केले ॥
मज न देखता पर्णकुटी । दोघे जाहले कडेलोटी ।
अथवा शस्त्रे घातली पोटी । केले संकटी गळाफास ॥ "

( भा. रा. ५·११·५२–५३ )

अशी सुरुवात करून सीतेने मुद्रिकेला पुढे विचारलेले प्रश्न वाचताना अंतःकरण खरोखर भरून येते. स्वतः सीता तर इतकी व्याकुळ झालेली आहे की ती बोलता बोलता मूर्च्छित होते. तिची ही अवस्था पाहून हनुमंत पुढे येतो व रामवृत्तांताचे कथन करतो.

आतापर्यंतच्या विवेचनावरून असे लक्षात येईल की नाथांनी काळ व परिस्थितीच्या अनुषंगाने काही प्रसंगात बदल केला आहे, तर काही प्रसंग मात्र स्वतंत्रपणे अतिशय चांगले रंगविले आहेत. काव्यनिर्मितीच्या दृष्टिकोणातून नाथांनी रामचरित्राचे लेखन केलेले नाही तर वाचकांच्या मनावर भक्तितत्त्वाचे संस्कार करण्याच्या उद्देशाने त्यांनी काव्याचा केवळ साधन म्हणून उपयोग केलेला आहे. एखाद्या तत्त्वाच्या प्रचारासाठी जर कलाकृतीची निर्मिती असेल तर कलात्मक मूल्यांच्या दृष्टीने त्यात थोडाफार उणेपणा येणारच. नाथांना याची जाणीव नक्कीच असेलही. ते म्हणतात :

" ग्रंथी राखोनिया गुह्यार्थ । मुख्यत्वे दावावा परमार्थ ।
हाचि कवित्वाचा निजस्वार्थ । येणे रघुनाथ संतुष्ट ॥ " ( भा. रा. १·२७·९५ )

# महात्मा जोतीराव फुले : आधुनिक देशी मराठी साहित्याचे आद्य जनक*

आनंद यादव

इ. स. १८२० ते १८७० पर्यंतचा पन्नास वर्षांचा मराठी वाङ्मयाचा काळ हा 'आधुनिक मराठी वाङ्मया'च्या पूर्व तयारीचा काळ होय. इ. स. १८७५ पासून मराठी साहित्याला आधुनिकता प्राप्त होत गेली,· असे आपण मानतो. विष्णुशास्त्री चिपळूणकरांचे निबंधमालेतील निबंध, हरिभाऊ आपटे यांची कथा—कादंबरी, केशवसुतांची कविता, किर्लोस्करांची नाटके हे मराठी साहित्याच्या आधुनिकतेचे पहिले उन्मेष मानले जातात. ही आधुनिकता मराठी साहित्यात १८७५ नंतरच्या पंचवीसतीस वर्षांत नीटपणे प्रस्थापित झाली. हिची अनेक वैशिष्ट्ये आहेत. त्यांतील आधुनिकतेचे प्रमुख आशय—वैशिष्ट्य म्हणजे सामाजिक वर्तमान वास्तवाच्या आणि भौतिक जीवनाच्या प्रखर जाणिवेचा वाङ्मयातील आविष्कार होय.

या सामाजिक वास्तवाची व्याप्ती किती होती ? कोणत्या मराठी समाजाची संवेदना या मराठी साहित्यात प्रतिबिंबित होत होती ? असे आणि यांसारखे अनेक प्रश्न त्या वेळच्या मराठी साहित्याच्या संदर्भात उपस्थित होतात. त्यांचे थोडक्यात असे उत्तर मिळते की या काळात आणि नंतरही पुढे १९२० पर्यंत आधुनिक मराठी साहित्य समृद्ध आणि विविधतापूर्ण झाले असले तरी मराठी समाजातील मूठभर उच्च वर्णीयच त्याची निर्मिती करीत होते. बाकीचा सर्व ९५ टक्के समाज साहित्यनिर्मितीच्या दृष्टीने अंधच होता. हे उच्च वर्णीय साहित्यिकही पांढरपेशी, बुद्धिजीवी, शहरवासी होते. ते महाराष्ट्राच्या ज्या खेड्यापाड्यांतून पुणे-मुंबईत जमा झाले होते किंवा पुणे-मुंबईच्या भोवताली जी मराठी खेडी होती, तेथील सामाजिक जीवन ते संपूर्ण विसरून गेले होते किंवा त्यापासून ते पराङ्मुख होते. त्याला त्यांनी 'ग्राम्य' मानले होते. एवढेच नव्हे तर ज्या खेड्यापाड्यात त्यांचे बालपण आकाराला आले होते; ते बाळपणही ग्रामीण संपर्कात गेल्यामुळे त्यांनी संपूर्णपणे वाङ्मयबाह्य मानले होते. हीही त्या साहित्याला अंतर्गत मर्यादा होतीच.

वास्तविक कोणत्याही समाजात मूटभर साहित्यिकच साहित्यनिर्मिती करीत असतात.

---

*महाराष्ट्र शासनातर्फे प्रकाशित होणाऱ्या फुले गौरव ग्रंथात हा लेख प्रसिद्ध होत आहे.

अनुक्रमणिका

साहित्यिक कोणत्याही वर्गाचा, जातीचा वा वर्णाचा असला तरी तो प्रतिभावंत असल्यामुळे त्याची वाङ्मयीन जाणीव ही त्याच्या सर्व समाजाला मानसिक दृष्ट्या व्यापून राहणे अवश्यक असते. तरच त्याचे साहित्य त्या समाजाचे ( इथे मराठी समाजाचे ) प्रतिनिधित्व करू शकते. या दृष्टीनेही १८७५ ते १९२० पर्यंतच्या मराठी साहित्याला दुसरी मोठी मर्यादा पडली होती. त्या वेळचा मराठी साहित्यिक आपल्या विशिष्ट वर्ण समुच्चयापुरतीच आपली सामाजिक जाणीव व्यक्त करीत होता. वास्तविक तो समाजघटक सबंध समाजाचा एक अतिलहान, पुढारलेला आणि मानसिक दृष्ट्या सबंध समाजापासून तुटलेला आणि आत्ममग्न झालेला होता. डॉ. केतकरांच्या भाषेत बोलावयाचे झाले तर पुण्याच्या सदाशिव पेठेतच त्याचा आशय होता. बाकीच्या सर्व मराठी समाजाच्या जाणिवा या पेठेच्या बाहेरच होत्या, हे उघड आहे.

असे असले तरी मूठभरांच्या संकुचित जाणीवांच्या साहित्याला सर्व आधुनिक मराठी समाजाच्या साहित्याचे प्रतिनिधित्व दिले जात होते. आणि त्या अर्थाने त्याला ' मराठी साहित्य ' ही संज्ञा वापरली जात होती. अतिव्याप्तीचा दोष या संज्ञेत आहे, हे उघड आहे. कारण सर्व मराठी समाजाच्या मानसिक जाणिवांचे ते प्रतिनिधित्व करू शकत नव्हते. शहरवासी उच्चवर्णीय आणि पांढरपेशा जाणिवांचेच फक्त प्रतिनिधित्व करीत होते. त्या दृष्टीने त्याचा व्यापक मराठी समाजसंवेदनेशी संबंध तुटलेला होता.

व्यापक मराठी समाज म्हणजे काय आणि त्याची मराठी- संवेदना म्हणजे काय, असा प्रश्न वरील विधानातून निर्माण होतो. भारत पर्यायाने महाराष्ट्र हा शेतीप्रधान आणि खेड्यापाड्यांनी भरलेला देश आहे. पस्तीस एक हजार खेडी एकट्या महाराष्ट्रातच आहेत. ह्या खेड्यांत महाराष्ट्राची ८०-८५ टक्के जनता राहते. या सर्व ग्रामीणांचा व्यवसाय शेती व शेतीवर अवलंबून असलेला आहे. त्यामुळे हा देश मूलतः शेतकऱ्यांचा, ग्रामीणांचा, आदिवासींचा, म. फुल्यांच्या भाषेत शूद्रांचा आहे. महाराष्ट्राचा मराठी समाज तिथे आहे. ( आजच्या रूढ अर्थाने दलितही त्यातच येतात. ) त्याची संवेदना, त्याचे तत्कालीन वर्तमान सामाजिक वास्तव, त्याचे जीवनप्रश्न, जीवनपद्धती, त्याची आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक समस्या, रीतिरिवाज, भाषा, यांच्यातून जे साहित्य आकाराला येईल ते व्यापक अर्थाने मराठी जीवनसंवेदनेचे साहित्य असेल, हे उघड आहे. त्यालाच यथार्थपणे ' मराठी साहित्य ' अशी संज्ञा वापरता येईल. पण या व्यापक मराठी समाजाचा मूठभर भाग जो पांढरपेशा उच्च वर्णीय शहरी समाज आहे त्याने आपल्या मर्यादित वर्णीय जीवन संवेदना ज्यात व्यक्त केल्या आहेत, त्या साहित्याला ' आधुनिक मराठी साहित्य ' हा मुळात अतिव्याप्त शब्दप्रयोग वापरून त्या शब्दप्रयोगाचा रूढीने अर्थसंकोच करून टाकला आहे. त्यामुळे मुळातील व्यापक सामाजिक जाणिवा ज्यात व्यक्त होऊ घातल्या आहेत अशा साहित्याला या साहित्याच्या

व्याघाताने ' ग्रामीण साहित्य ' हा शब्दप्रयोग वापरावा लागतो आहे. त्यात मराठी व्यापक समाजाची पर्यायाने या देशीच्या ग्रामीण समाजाची जाणीव व्यक्त होते आहे. स्वातंत्र्योत्तर काळात या जाणिवेला आताशा कुठे आधुनिक ग्रामीण साहित्य, दलित साहित्य, नेमाडपंथी देशी साहित्य, झोपडपट्टीवरील साहित्य इत्यादी विविध नावांखाली धुमारे फुटत आहेत.

व्यापक अर्थाने हे सर्व या देशीचे ग्रामीण साहित्यच आहे. कारण या समाजाचा केंद्रवर्ती माणूस या साहित्याच्याही केंद्रस्थानी आहे झोपडपट्टीवरील साहित्य हे प्रथम-दर्शनी ' शहरी ' साहित्य वाटत असले तरी या शहरच्या झोपडपट्टीत खेड्यापाड्यातून दुष्काळी ग्रामीण भागांतून येणाऱ्या ग्रामीणांच्या जीवनाची शहरी संपर्काने व शहर-व्यवस्थेने कशी वाताहत करून टाकलेली आहे, हेच ते साहित्य दाखवून देते. म्हणजे पर्यायाने भारतीय ग्रामीण समाजव्यवस्थेशी शहरी व्यवस्थेचा जो संबंध निर्माण झाला आहे, त्याचेच दर्शन ते घडवीत असते. या अर्थाने ते या देशीचे ग्रामीण साहित्य मानावे लागते.

अशा या व्यापक मराठी समाजाचे प्रतिनिधित्व करणाऱ्या ग्रामीण साहित्यनिर्मितीच्या प्रेरणारंभाचा शोध घेत मागे मागे जाऊ लागलो की म. जोतीराव फुले यांच्या साहित्या-पाशी येऊन थांबावे लागते. व्यापक मराठी समाजाची संवेदना प्रथम त्यांनी आपल्या साहित्यातून जागविलेली दिसते. त्यामुळे मराठीतील ग्रामीण साहित्याचे ते आद्य जनक ठरतात. अर्थसंकोच न करता, मूलार्थाने ' मराठी साहित्य ' हा शब्दप्रयोग स्वीकारला तर ' आधुनिक देशी मराठी साहित्या 'चे ते आद्य जनक ठरतात. कारण नव्या, आधु-निक समाजाच्या घडणीची व्यापक पातळीवरची ' सामाजिक जाणीव' त्यांच्या वाङ्मय-कृतींतूनच प्रथम दिसून येते. त्यानंतर पुढे काही वर्षांनी ती मर्यादित समाजापुरती हरिभाऊ आपटे इत्यादींच्या साहित्यातून दिसून येते.

श्री. गं. बा. सरदार, म. जोतीराव फुले यांच्या कार्याविषयी व व्यक्तित्वाविषयी आपल्या ' महात्मा फुले : व्यक्तित्व आणि विचार ' या पुस्तकात आरंभीच म्हणतात : " महात्मा जोतीराव फुले हे आधुनिक महाराष्ट्रातील मूलगामी समाजपरिवर्तनाच्या चळवळीचे आद्य प्रवर्तक होते. हिंदू समाजातील शूद्रातिशूद्रांच्या व्यथा त्यांनी निःशंक-पणे बोलून दाखविल्या. कर्जबाजारीपणापायी हैराण झालेल्या शेतकऱ्यांची गाऱ्हाणी त्यांनी वेशीवर टांगली. खेड्यापाड्यांतील या कष्टकऱ्यांचे अज्ञान व दारिद्र्य हे ईश्वरनिर्मित नसून त्याचे मूळ आपल्या समाजव्यवस्थेत आहे हे त्यांना बरोबर उमगले होते. म्हणून या व्यवस्थेतील धर्माधिष्ठित बौद्धिक गुलामगिरी, सामाजिक अन्याय आणि आर्थिक शोषण यांकडे त्यांनी प्रथमच लोकांचे लक्ष वेधले. एकोणिसाव्या शतकात येथे अनेक विद्यावंत समाज सुधारक होऊन गेले. जांभेकर, दादोबा पांडुरंग, राम बाळकृष्ण, लोकहितवादी, भांडारकर, रानडे, विष्णुशास्त्री पंडित, आगरकर ही

नावे सर्वश्रुत आहेत. या सर्वांची दृष्टी उदार व व्यापक होती...तरी देखील त्यांचे कार्यक्षेत्र मर्यादित राहिले...उच्चवर्णीयांच्या कौटुंबिक सुधारणेपलीकडे त्यांच्या कार्याची मजल बहुधा गेली नाही. जोतीरावांच्या कार्याची दिशा याहून अगदी निराळी होती. हा उतारा म. जोतीराव फुले यांच्याविषयी नीटपणे विचार करणाऱ्या अनेक विचारवंतांच्या निष्कर्षाचे सार म्हणावे लागेल इतका प्रातिनिधिक आहे.

मराठी ग्रामीण साहित्याच्या जनकत्वाच्या संदर्भाने म. जोतीराव फुले यांच्या ललित साहित्याचा आणि वैचारिक वाङ्मयाचा कालसापेक्ष विचार करू लागलो तर आपणास काय दिसते? म. फुल्यांनी मराठी जीवनाचा सर्वार्थाने गाभा असलेल्या शेतकऱ्यांच्या, पददलितांच्या, ग्रामीणांच्या सुखदुःखात्म जीवनाचे केंद्र शेकडो वर्षांपासून ते एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत स्वर्गीय धार्मिकतेत होते, ते भौतिकतेत आणले आणि आधुनिकतेशी जोडून घेतले. 'शेतकऱ्याचा असूड' सारख्या ग्रंथामध्ये आधुनिक दृष्टिकोणातून त्याची वैचारिक मांडणी त्यांनी आपल्या पद्धतीने केली. तोपर्यंतचा अडाणी, ग्रामीण माणूस देवदैवाला जो दोष देत बसत असे, त्याला सामाजिकतेचे, वर्तमान वास्तवाचे सर्वांगीण भान दिले आणि आधुनिक मराठी वाङ्मयाचे मूलभूत आशयवैशिष्ट्य वर्तमान सामाजिक वास्तवाचे भान हेच आहे. केवळ ग्रामीण शेतकऱ्याला, ग्रामीण पददलिताला त्याच्या भोवतालचे घनिष्ठ मर्यादित वास्तव काय आहे, एवढेच त्यांनी सांगितले नाही; तर 'संपूर्ण मराठी समाजात' या ग्रामीणांचे स्थान काय आहे त्याचा आणि उच्च वर्णीयांचा सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक, सांस्कृतिक, ऐतिहासिक संबंध काय आहे. त्याचा आणि ब्रिटिश सरकारचा वरील बाबींसह राजकीय दृष्ट्या संबंध काय आहे, याचेही विवरण त्यांनी 'शेतकऱ्यांचा असूड' मध्ये अतिशय स्पष्टपणे आणि प्रभावीपणे केलेले आहे. कमीअधिक प्रमाणात त्यांच्या इतर पुस्तकांतही हाच विचार आलेला आहे.

१८५०–५५ पासून तो १८९० पर्यंत म्हणजे म. फुल्यांच्या मृत्यूपर्यंत चाळीसभर वर्षे त्यांनी आपल्या आठनऊ लहानमोठ्या पुस्तकांतून जे ललित आणि वैचारिक लेखन केले आहे त्यातून त्यांची ही जाणीव सातत्याने आविष्कृत होताना आणि वाटचाल करताना दिसते. ती त्यांच्या केवळ लेखनातूनच प्रत्ययाला येत होती असे नव्हे तर त्यांच्या कृतींतूनही व्यक्त होत होती. मुलींसाठी आणि अस्पृश्यांसाठी शाळा काढणे, व्हाइसरॉय लॉर्ड लिटनच्या पुणे भेटीच्या वेळी शहर सजावटीसाठी खर्च व्हावयाचा पैसा पददलितांच्या शिक्षणासाठी खर्च व्हावा म्हणून खर्चिक शहर सजावटीस विरोध करणे, अस्पृश्यांना आपला पाण्याला हौद वापरण्यास मुक्त करणे, हंटर शिक्षण आयोगाला पाठविलेले निवेदन, ड्यूक ऑफ कनॉटच्या मेजवानीस शेतकऱ्याच्या पोशाखात जाणे, मराठी ग्रंथकारांच्या दुसऱ्या संमेलनाच्या वेळी त्यांना (म. फुल्यांना) मिळालेल्या निमंत्रणानिमित्त पाठविलेले उत्तर इत्यादी कृतींमधून त्यांची व्यापक मराठी

संवेदना अंतर्बाह्य प्रकट होताना दिसते.

म. फुल्यांच्या गद्यात्मक व पद्यात्मक ललित साहित्याला लाभलेले आविष्काराचे जे रूप आहे ते वैशिष्ट्यपूर्ण आहे. ते नीटपणे समजण्यासाठी साक्षेपाने त्या रूपाकडे पाहण्याची गरज आहे. त्या रूपाकडे पाहताना प्रथमच एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की म. फुल्यांच्या मनःचक्षूंसमोर मराठी लोकजीवन आणि प्राकृतांचे सामान्य मानस होते. पंडितांचे आणि पढिकांचे बुद्धिजीवी पांढरपेशे जीवन किंवा स्वत्वाला नकळत विसरून पाश्चात्य संस्कृतीने नटत चाललेले उच्च वर्गीयांचे सुशिक्षित, विदग्ध मानस नव्हते. मराठी लोकजीवनात पुराणांना, संतवाङ्मयाला, पोवाड्यांना, बखरींना जे अनन्य साधारण मानसिक स्थान होते, त्याची म. फुल्यांना पुरेपूर कल्पना होती. लोक संस्कृतीतील सोंगी भजनातील संवादांचे चटकदार स्वरूप किंवा तुकारामाच्या गाथेतील समाज चित्रातून जन सामान्यांसाठी समर्पक आणि सडेतोड जीवनभाष्य करणारे अभंग त्यांनी प्राकृत समाज संस्कृतीचा भाग म्हणून समजून घेतलेले होते. बहुजनांच्या या लोकसाहित्यात उपदेशात्मतेला आणि परिणामहेतूला जे अंतिम स्थान आहे, ते त्यांनी हेरले होते. खरे तर त्यांचे व्यक्तिमत्त्व प्राकृतांच्या या सांस्कृतिक मातीतच घडलेले होते. लोकसाहित्याच्या या प्राकारिक रूपांना धर्मप्रवण उपदेशाचे परंपरागत स्वरूप लाभलेले होते. त्या ठिकाणी म. फुल्यांनी वास्तववादी समाज प्रवण आशयाची स्थापना करून सनातन देशी लोकपरंपरेशी आधुनिकतेचा सांधा जोडून घेतला.

प्राकृत लोकमानसात देवदेवता, सणवार, श्रद्धाळू वृत्ती, लोकसमजुती, परंपरा-निष्ठा, भावनात्मकता, भाबडी सर्वहित दक्षता दाटपणे वसत असतात. त्यांना विदग्ध अशा तार्किक सत्याच्या बैठकीपेक्षा गतानुगतीकतेची बैठक अधिक लाभलेली असते. प्राकृत जनांसाठी अवतरणाऱ्या लोकसाहित्य प्रकारांतून याच गोष्टींचा आश्रय घेऊन तदनुषंगिक शैलीगुण वापरीत अपेक्षित उपदेश केला जातो. त्याचा योग्य तो परिणामही प्राकृत लोकमानसावर विशेष स्वरूपात होत असतो. जणू या गोष्टी उप-देशाचा अपेक्षित परिणाम साधण्याची लोकमानसातील मर्मस्थानेच असतात. म. जोतीराव फुले यांनी आपली साहित्यनिर्मिती ही मर्मस्थाने उद्ध्वस्त करण्यासाठी केलेली आहे. या मर्मस्थानांचे लोकमानसाला असलेले आकर्षण हेरूनच ती मर्मस्थाने हाच विषय आपल्या साहित्याच्या केंद्रस्थानी त्यांनी ठेवला आणि त्यातील पोकळपणा दाखवून दिला. तो दाखवून देण्यासाठी त्या लोकसाहित्य प्रकारांचेच रचना रूप त्यांनी स्वीकारले.

पोवाडा, अभंग ही त्यांनी शाहीर-संतांची रचनारूपे ( किंवा रचना प्रकार ) बाह्यतः स्वीकारलेली आहेत, हे तर स्पष्टच आहे. ‘ गुलामगिरी ’ या पुस्तकातील संवाद हे सोंगी भजने, प्रवचने यांतील खुमासदार संवादांची दाट आठवण करून

देताना दिसतात. 'शेतकऱ्याचा असूड'मधली गद्यरचना तर 'निबंधा'पेक्षा सर्वार्थाने प्रकृतीला जवळची वाटते. या पुस्तकात सत्याचे तार्किक पद्धतीने विवरण करीत करीत ते सत्य पटवून देण्याच्या विदग्ध नैबंधिक पद्धतीपेक्षा स्वतःच्या मनाला अगोदरच पटलेले व्यापक सत्य फक्त अनुकूल उदाहरणे देऊन उपरोध उपहासाच्या वापराने रोचक करून, तळमळीतून निर्माण झालेल्या अभिनिवेशाने त्याला काहीसा गडद रंग देऊन, कोट्यांनी चटकदार करून, प्रभावी शब्दचित्रे रेखाटून, प्रसंगी भावनात्मक आवाहन करून पुनःपुन्हा वेगवेगळ्या पद्धतीने आविष्कृत करून वाचकाच्या मनावर खोल खोल बिंबवत जाणे, ही त्यांच्या गद्यलेखनाची प्रकृती अतिशय जवळची आहे. या पद्धतीचा जनसामान्यांवर अधिक प्रभाव पडतो. ती जास्त आवश्यक आहे.

म. फुल्यांनी आपल्या गद्यपद्य लेखनासाठी परंपरागत देशी, प्राकृतप्रचुर ग्रामीण भाषेचाच वापर केलेला दिसून येतो. पद्यासाठी त्यांनी संत आणि शाहीर या लोक-संस्कृतीच्या सनातन प्रसारकांची भाषा वापरली तर गद्यासाठी जनसामान्यांची बोली, भाषा प्राचुर्याने वापरली. शिवाय मराठी लोकसाहित्याचे शैलीगुण अभिव्यक्तीच्या मांडणीसाठी वापरले. त्यामुळे त्याचे एका बाजूने ग्रामीण, देशी लोकसाहित्य परंपरेशी नाते जोडते आणि आधुनिकतेशीही आशयाच्या अंगाने नाते जोडते.

म. फुल्यांचे साहित्य वगळून १८५० ते १८९० या काळातील साहित्यक्षेत्राच्या मर्यादेत मध्यावर उभे राहून साहित्यक्षेत्राकडे पाहिले तर कोणती साहित्यविषयक मानसिकता दिसून येते ? या साहित्यक्षेत्राचे मन मूलतः विदग्ध आहे. त्याचा पारंपरिक वारसा लोकसंस्कृतीचा नसून संस्कृत प्रचुर पठिकतेचा, ग्रंथज्ञानपुष्टतेचा, बुद्धिनिष्ठेचा आहे. हे मन पाश्चात्त्य संस्कृतीच्या आकर्षणाने भारून गेलेले आहे. साहित्यनिर्मितीत त्या पाश्चात्य संस्कृतीच्या साहित्याचे अनुकरण करायला ते उत्सुक आहे. ( संस्कृत साहित्यातील नाटकादि प्रकारांचे पुनरुज्जीवन त्याला करावेसे वाटत असले तरी ती प्रेरणा प्राश्चात्य संस्कृतीच्या रेट्यामुळे अतिशय शबल झालेली आहे.) त्यामुळे पाश्चात्य साहित्याचे स्वतंत्रपणे, अनुवाद रूपाने, भाषांतर रूपाने वेडेवाकडे अनुकरण जोरकस चालू आहे. या घाईगर्दीत प्राकृतांच्या सर्वच लोकसाहित्य परंपरांना जुनाट, कालबाह्य, ग्राम्य, तुच्छ लेखून आधुनिक होण्याची घाई झाली आहे. जणु पाश्चात्य इंग्रजी वाङ्मयाने मराठी लोकसाहित्यिक प्रकृतीचे ब्रेन वॉशिंग चालले होते.

अशा या पाश्चात्य भाऊगर्दीच्या मराठी वाङ्मयीन क्षेत्रात त्या काळी पाश्चात्य संस्कृतीतील गाभ्याचा आधुनिक मानवतावादी विचार तेवढा मौलिक स्वरूपात स्वीका-रून त्याचे कलम व्यापक मराठी समाजमनावर करण्यासाठी प्राकृतांच्या परंपरागत लोकसाहित्याला सामाजिकतेच्या दिशेने वाकवून, त्याचे नाते आधुनिकतेशी जोडून, ध्रुत्चा विकास साधण्याची दिशा म. जोतीराव फुले यांनी आपल्या साहित्याच्या द्वारा

दाखवून दिलेली होती. जोतीरावांच्या व्यक्तिमत्त्वाचा पिंडच मुळी या देशी समाज-संस्कृतीच्या मातीतील असल्यामुळे हे सहजपणे घडले. घटपटादी सायास त्यांना करावे लागले नाहीत.

म. फुले यांचे यश विष्णुशास्त्री चिपळूणकर, हरिभाऊ आपटे, केशवसुत, अण्णासाहेब किर्लोस्कर यांच्यापेक्षा कालिक दृष्ट्या किती तरी अगोदरचे आणि गुणवत्तेच्या दृष्टीने किती तरी वेगळ्या प्रकारचे आहे. या साहित्यिकांच्या तुलनेने म. जोतीराव फुले यांची साहित्यधारा अधिक देशी, अधिक व्यापक, अधिक मानवतावादी आणि अधिक आधुनिकही आहे. या दृष्टीने ते 'आधुनिक मराठी साहित्याचे आद्य जनक' ठरतात. आणि या देशीची लोकसंस्कृती ही प्राकृतांची, ग्रामीणांची असल्याने ते ग्रामीण साहित्याचे आद्य जनक ठरतात.

म. फुले यांचे साहित्य प्रचारात्म आहे, असा त्यांच्यावर सरसकट आरोप केला जातो. या आरोपाच्या पाठीमागे अनेक गैरसमज आहेत. आपल्या तथाकथित आधुनिक मराठी वाङ्मयाची संकल्पना ही आपण इंग्रजीतून घेतलेली आहे, हे उघड आहे. ती विदग्धांची परंपरा आहे. या साहित्याची संकल्पना उराशी बाळगून म. फुले यांच्या वाङ्मयाकडे आपणांस मूल्यमापन करण्याच्या इराद्याने वळता येणे अशक्य आहे. म. फुले यांचे वाङ्मय समजून घेण्यासाठी इंग्रजपूर्व काळातील प्राकृतांच्या लोक-साहित्याची परंपरा आपण समजून घेतली पाहिजे. एक तर ही परंपरा मुखनिष्ठ आणि श्रोतृनिष्ठ होती. तशीच ती हेतुनिष्ठही होती. 'कलेसाठी कला' वगैरेंसारखा काही प्रकार तिच्यात नव्हता. तो फक्त तत्कालीन आकलनानुसार विदग्ध शास्त्री–पंडितांच्या अभिजात आणि लेखननिष्ठ, वाचननिष्ठ वाङ्मयात होता. लोकसंस्कृतीची ती धारा नव्हती. पाश्चात्यांच्या अनुकरणातून निर्माण झालेली तथाकथित आधुनिक मराठी वाङ्मयाची परंपराही अशीच लेखननिष्ठ आणि वाचननिष्ठ आहे. त्यामुळे तिच्यात येणारी सर्व वैशिष्ट्ये मुखनिष्ठ, श्रोतृनिष्ठ वाङ्मय परंपरेत येणे अशक्य आहे. दुसरे असे की प्राकृतांच्या लोकसाहित्याचा रसिक हा जनसामान्य प्रायः निरक्षर, प्रांजळ, सरळ जगणारा असल्यामुळे त्याच्या प्रकृतीला मानवेल, पचेल अशीच लोकसाहित्याची प्रकृती असते. अभिजात विदग्ध साहित्याचा रसिक हाही विदग्ध असतो आणि ते साहित्य लिखित असते. त्यामुळे त्यातील विदग्धता वाचनाने अनुभवयाची असल्याने वाचनात मागे-पुढे जाऊन अनुभवता येते त्यामुळे तशा प्रकारच्या रसिकाची आस्वाद-आकलन परंपराही वेगळी पडते. तेव्हा या विदग्ध परंपरेचा दृष्टिकोण घेऊन प्राकृत परंपरेच्या साहित्याचे मूल्यमापन करणे मूलतःच अन्यायकारक ठरणारे असते. ज्या कालात म. फुल्यांच्या साहित्याचे मूल्यमापन झाले तो विष्णुशास्त्री चिपळूणकरांचा काळ विदग्ध आणि पाश्चात्य साहित्याच्या मानसिक वरचष्म्याचा होता. अशा वेळी म. फुल्यांच्या साहित्याचे यथार्थ मूल्यमापन होणे अशक्य होते. अशा या काळातच

फुल्यांच्या साहित्यावर दोषारोप केलेले आहेत.

दुसरे असे की म. फुल्यांच्या परंपरेतील नंतरचे साहित्य इतर साहित्यिकांनी सवंग, बाजारी आणि उथळ करून टाकले. त्यातील मनःपूर्वकता संपुष्टात आली नि ते प्रचारकी झाले. तोच आरोप मग म. फुले यांच्या साहित्यावरही कायमच्या शिक्क्यासारखा बसला आणि ते मत मराठी साहित्यात गतानुगतिक वृत्तीने मान्य पावले. पण आज मुळात जाऊन, कालसंदर्भ नीट लक्षात घेऊन, परंपरेचे नीट भान ठेवून निरपेक्ष वृत्तीने म. फुले यांचे साहित्य वाचू लागलो तर ते नामदेव, तुकाराम, रामदास आणि पोवाडे शाहीर यांच्या प्रकृतीचे वाटते. या संत-शाहिरांच्या साहित्याची जी रचनाप्रकृती दिसून येते तीच म. फुले यांच्या साहित्याचीही वाटते. भाषेच्या व आशयाच्या बाबतीतच फक्त फरक पडतो. संत परमार्थवादी होते; तर फुले भौतिक मानवतावादी होते. पण दोघांनीही आपणाला पटलेले सत्य पुन्हः पुन्हा विवरण करून जनसामान्यांना तळमळीने सांगितले आहे. त्या दृष्टीने संत आणि म. फुले दोन्हीही त्यांच्या काळाचे प्रबोधनकारच ठरतात किंवा ( जुन्या भाषेत ) आपापल्या काळाचे संतच ठरतात. मात्र म. फुले हे अधुनिक काळातील संत नसून 'आधुनिक संत' आहेत हा फरक लक्षात ठेवला पाहिजे. 'ब्राह्मणांचे कसब' यामधील म. फुले यांचे अभंग आणि नामदेव-तुकाराम यांनी ज्यांत आपापल्या काळातील समाज चित्रे रेखाटून भाष्य केलेले आहे ते अभंग यांची तुलना करून पाहण्यासारखी आहे. दोघांची प्रकृती एकसारखीच वाटते. किंवा 'अखंडादी काव्यरचना' संपूर्णपणे आधुनिक मानवतावादी संताचीच वाटते.

पण म. फुले यांच्या साहित्यिक कर्तृत्वाचा १८५० ते १८९० हा काळ पाश्चात्य साहित्याच्या कल्पनांच्या भाऊगर्दींचा असल्याने आणि व्यापक समाजाच्या संदर्भाचे भान त्यावेळच्या मराठी साहित्यिकांना नसल्यामुळे किंवा त्यांनी आपल्या उच्च वर्णीय समाजापुरते मर्यादित करून घेतल्यामुळे म. जोतीराव फुले यांचे व्यापक सामाजिक दृष्टिकोण असलेले साहित्य नेतृत्वाच्या दृष्टीने एकाकी पडले.

पण हे नेतृत्व साहित्यक्षेत्रात एकाकी पडले तरी दीपस्तंभासारखे नित्य प्रकाशदायक आणि मार्गदर्शक मात्र ठरले. आधुनिक मराठी साहित्याचे मराठी हे विशेषण त्याने यथार्थ केले आहे. आधुनिक मराठी साहित्याचे आशयक्षेत्र किती व्यापक असू शकते हे त्याने आरंभकाळीच दाखवून दिलेले आहे. ज्या संवेदनेचे भान आधुनिक मराठी उच्च वर्णीय साहित्यिकाला आले नव्हते ते त्यांनी आपल्या साहित्याच्या द्वारा १८५० ते १८९० मध्ये आणून दिले आणि ग्रामिणतेच्या दिशेने मराठी संवेदना जागी केली. वास्तविक त्या वेळच्या बहुसंख्य साहित्यिकांचे सामाजिक मन या दिशेने वळणे शक्य नव्हते त्याला वळविण्याचा निदान त्या अनोख्या व्यापक दिशेची ओळख करून देण्याचा त्यांनी प्रयत्न केला. प्रथम अशी संवेदना मनात जागृत करणे, त्या दिशेने

साहित्यनिर्मिती करणे आणि तिकडे जनमानस वळविणे, एवढेच नव्हे तर या नव्या अनोख्या संवेदनेचा रूपाविष्कार करण्यासाठी इष्ट परंपरांवर कलम करून त्या परंपरेचा आधुनिकतेच्या दिशेने आपसूख विकास साधणे हे साहित्याला यशस्वीपणे नवी दिशा देऊ पाहणाऱ्या प्रतिभावंताचे लक्षण असते. पण मराठी समीक्षकांच्या गतानुगतिक वृत्तीमुळे आणि साहित्यबाह्य इतर अनेक कारणांमुळे आजवर फुल्यांच्या साहित्याचे वेळोवेळी नीटपणे अध्ययनच होऊ शकले नाही हे मराठी साहित्याच्या अभ्यासकाचे आणि आधुनिक मराठी वाङ्मयाच्या इतिहासकारांचे दुर्दैव होय.

●

---

## साभार पोच : चरित्रे, आठवणी, व्यक्तिचित्रे

१. **स्मृतिधन** ( बापूजी अणे यांच्या आठवणी ) : गोविंद देशपांडे संपा ; लो. अणे जन्मशताब्दी समिती, वणी; १९८१; रु. २०.
२. **अनर्थाची फुले** : सौ. शशिकला जाधव; कॉंटिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०, १९८१; रु. १२. ( स्त्रीचित्रे )
३. **गोव्याकडची माणसं** : लक्ष्मणराव सरदेसाई; कॉंटिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०; १९८१; रु. ६.
४. **आंबेडकर भारत** : बाबूराव बागूल; राजहंस प्रकाशन, पुणे; १९८१; रु. २०.
५. **मुलखावेगळी माणसं** : बाळ सामंत व रमेश मंत्री संपादित; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८१; रु. ३५.
६. **संत सेनापती** : पु. पां. गोखले; सेनापती बापट जन्मशताब्दिमहोत्सव समिती, दादर, मुंबई २८; १९८१ ( आ. २ री ); रु. २.
७. **श्री. गुरुदेव रानडे** : नरेंद्र कुंटे; संतकृपा प्रकाशन, पुणे ३०; १९८१; रु. ६.
८. **बांधिलकी** : डॉ. सरोजिनी बाबर; डॉ. सरोजिनी बाबर, पुणे ३०, १९८१; रु ५. ( राजकीय जीवनातील अनुभव )
९. **वाटेवरच्या सावल्या** : वि. वा. शिरवाडकर; कॉंटिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०, १९८१; रु. १५.
१०. **अमृतसिद्धी** : उस्ताद मोहम्मद हुसेनखान सत्कार-स्मरणिका, श्रीरंग संगोराम ( संपादक ), १९८१.
११. **दिगंत** : अनुराधा पाटील, कुशा प्रकाशन, औरंगाबाद, १९८१, रु. १८

# जनसाहित्याची प्रेरणा आणि भूमिका

या. वा. वडस्कर

आधुनिक भारताचा इतिहास अनेक विरोधाभासांनी भरलेला आहे. १८१८ साली पेशवाईचा अंत झाला व इंग्रजांचा भारतावरील एकछत्री अंमल सुरू झाला. या 'स्वराज्या'च्या अंतामधूनच 'स्वातंत्र्य' कल्पनेचा उदय व्हावा, हा असाच एक प्रमुख विरोधाभास. स्वराज्याची कल्पना जुन्या सत्ताधीशांच्या राजकीय सत्तेशी निगडित होती. जनसामान्यांच्या नशिबी या सत्तेत गुलामीशिवाय दुसरे काहीच नव्हते. स्वातंत्र्य संकल्पनेचा आशय मात्र सर्वसामान्यांच्या सामाजिक, राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक आशा-आकांक्षांमधून साकार होत होता. स्वातंत्र्याची ही प्रेरणा एवढी जबरदस्त होती की तिच्यामधून एकोणविसाव्या शतकाच्या उत्तरार्धात सबंध भारतात एक प्रभावी समाजप्रबोधन घडून आले. या प्रबोधनाचा प्रवाह अनेक वळणे घेत अखेर १९४२ च्या 'चलेजाव'च्या क्रांती आंदोलनापर्यंत येऊन भिडला. त्यातून १९४७ मध्ये 'स्वातंत्र्या'चा जन्म झाला. सव्वाशे वर्षांपूर्वी सुरू झालेल्या प्रबोधनाची यशस्वी सांगता झाली, असे सर्वांना वाटले. फुले, गांधी व नेहरू यांनी पुरस्कारलेले 'शेतकऱ्यांचे व कामकऱ्यांचे स्वराज्य' प्रस्थापित झाले असे मानून आनंदोत्सव साजरे करण्यात आले.

प्रौढ मताधिकाराबरोबरच जातीदत्त विषमतेचे संवैधानिक निर्मूलन व शिक्षणाच्या आणि आर्थिक विकासाच्या तुटपुंज्या का होईना पण मिळालेल्या संधी यांमुळे हे स्वराज्य इंग्रजपूर्व 'स्वराज्या'पेक्षा खूपच व्यापक होते हे खरेच. तरी सुद्धा प्रबोधनकालात जागृत झालेल्या स्वातंत्र्यकांक्षांची पूर्ती करण्याचे सामर्थ्य त्याच्यात नव्हते, ही गोष्ट लवकरच स्पष्ट झाली. या भ्रमनिरासातून अनेक नवीन प्रक्रिया सुरू झाल्या. यातूनच एकविसाव्या शतकाच्या उंबरठ्यावर आता एक नवीन अधिक प्रभावी व व्यापक प्रबोधन येऊ घातले आहे. जनसाहित्य चळवळीच्या प्रेरणा व प्रयोजन या आगामी प्रबोधनाशी निगडित आहेत. या सर्वंकष प्रबोधनाची पूर्वतयारी म्हणून जसे ते अस्तित्वात आले व येत आहे, तसेच त्याच्या सिद्धतेचा आविष्कार सुद्धा ते घडवणारे आहे. एवढेच नव्हे तर सिद्धतेनंतर अपरिहार्यपणे येणाऱ्या स्थितिशीलतेची कोंडी फोडण्याचे कार्यसुद्धा जनसाहित्यालाच करावे लागणार आहे.

जनसाहित्य म्हणजे जनांचे जनवादी साहित्य. 'जन' हा शब्द आज त्याचा मूळचा क्रांतिकारी आशय हरपून बसला असला तरी त्याच्या जन्मकथेकडे आपण वळलो की त्याच्यातील स्फोटक अर्थगर्भता आपल्या त्वरित ध्यानात येतात. या शब्दाची कुळ-

अनुक्रमणिका

कथा ' गण ' शब्दापर्यंत जाऊन भिडते. सामुदायिक उत्पादन व समान उपभोग या तत्त्वांवर शोषणविरहित जीवनपद्धती अनुसरणाऱ्या प्राचीन समानध्येयी मानवसमूहांना ' गण ' या संज्ञेने संबोधित असत. जनसाहित्य आपले नाते शोषणविरहित व समताधिष्ठित समाजाच्या आदर्शाशी जोडते.

समाज व साहित्य यांचे नाते सर्वसाधारणपणे अग्रगामी व अनुगामी या पद्धतीत असते. याचा अर्थ असा मात्र नव्हे की साहित्याच्या ठायी जीवनाची प्रतिकृती उमटविण्यापेक्षा अधिक काहीच सामर्थ्य नसते साहित्याचे अस्तित्व आपल्या सभोवतालच्या वास्तवापासून जीवनरस प्राप्त करून सिद्ध होते, हे खरे. पण एकदा ते सिद्ध झाले की मग साहित्याचे स्वतःचे स्वतंत्र असे अस्तित्व विकसित होऊन ते जीवनावर आपला प्रभाव पाडू शकते. जनसाहित्याच्या भूमिकेत जीवन व साहित्य ह्यांच्या संबंधातील हे सृजनात्मक द्वंद्व गृहीत धरले जाते. जनसामान्यांच्या दुःखपूर्ण जीवनसत्वाचे भेदक व प्रत्ययकारी चित्रण करीत असतानाच त्या वास्तवात क्रांतिकारी परिवर्तन घडवून आणण्याच्या प्रेरणा जनसाहित्य देते. उपेक्षित श्रमिक समाजाच्या स्थितीचा व गतीचा अन्वयार्थदर्शी आरसा त्याच्यापुढे मांडून त्याच्या यथार्थाचे भान व परिवर्तनाच्या प्रेरणा निर्माण करते. स्वावलंबन, स्वाभिमान व विजिगीषा या भावनांचे उद्दीपन करून त्याला क्रांतीसाठी उद्युक्त करते.

ह्याचा अर्थ असा मात्र नव्हे की जनसाहित्याने क्रांतीचे केवळ साधन म्हणून कार्य करावे. सामाजिक बांधिलकीचा सिद्धान्त जनसाहित्याला अमान्य नसला तरी त्याला कलेची बांधिलकी सुद्धा तेवढीच महत्त्वाची वाटते. लेखकीय जाणिवेचे भाषिक रूप म्हणजे साहित्य या जाणिवेच्या बाहेर स्वतंत्रपणे अस्तित्वात असलेल्या वास्तवाचे प्रतिबिंब या जाणिवेत पडून साहित्याचा जन्म होतो. परंतु या जाणिवेचे स्वरूप लेखकाच्या विशिष्ट अशा संवेदनशीलतेतून घडते. ही संवेदनशीलता जर जननिष्ठ असेल तर आपोआपच लेखकीय जाणीव जनवादी व म्हणून तिचा भाषिक आविष्कारसुद्धा जनवादी राहील. कलाकृतीचे बाह्यरूप तिचा बाट वा आकार यातून सिद्ध होत असले तरी तिचा प्राण मात्र विशिष्ट संवेदनशीलतेतून जन्माला येतो. त्यामुळे जनवादी साहित्यकृतीचे स्वरूप जनवादी संवेदनशीलता अभिव्यक्त करणाऱ्या कलाकृतीचे असते. ही कलाकृती मग जनवादाचे साधन न राहता कलात्मक आविष्काराचे स्वरूप धारण करते. पुढील उदाहरणाने हा मुद्दा अधिक स्पष्ट व्हावा.

इब्सेनचे A Doll's House व गडकऱ्यांचे ' एकच प्याला ' ही दोन्ही स्त्रीप्रधान नाटके. इब्सेनची नोरा आपल्यावर बाहुलीपण लादणाऱ्या घराचा त्याग करते. गडकऱ्यांची सिंधू मात्र घराचा गुत्ता बनविणाऱ्या पतिदेवाच्या बाबतीत ' कशी या त्यजू पदाला ? ' म्हणत आपले पातिव्रत्य सिद्ध करते. ' एकच प्याला 'मधून पातिव्रत्याच्या उदात्त (?) नावाखाली चालू असलेल्या स्त्रीदास्याचा पुरस्कार होतो; उलटपक्षी घराचा

त्याग करताना नोराने आपटलेल्या दाराचा आवाज सर्वंध जगभर स्त्रीस्वातंत्र्याच्या प्रेरणा निर्माण करतो आणि तरीही इब्सेन गडकऱ्यांप्रमाणे कुठेही भावविव्हल होत नाही किंवा विनोदाच्या आहारी जात नाही. गडकऱ्यांपेक्षा इब्सेनची कलात्मक ताकद किती तरी जास्त आहे. कलात्मतेशी कुठेही तडजोड न करता इब्सेन आपल्या नाट्यकृतीतून स्त्रीस्वातंत्र्याचा व पर्यायाने संपूर्ण मानवी स्वातंत्र्याचा पुरस्कार करतो. गडकरी मात्र पुरुषसत्ताक समाजव्यवस्थेतील स्त्रीदास्यावर उदात्ततेचे रंग चढविण्याचा प्रयत्न करतात.

जनसाहित्याची ही जनवादी भूमिका प्रस्थापितांच्या विशेष हक्कवादी भूमिकेच्या सरळ विरोधात आहे. जनवादी साहित्य समतेचा पुरस्कार करते. प्रस्थापित साहित्य मात्र विषमतेचा प्रकट वा प्रच्छन्न पुरस्कार करते. दोन भूमिकांमधील हा संघर्ष नवीन नाही. अर्वाचीन काळात मात्र साहित्याची जनवादी भूमिका सर्वप्रथम महात्मा फुले यांनी सुमारे एका शतकापूर्वी मांडली. २४ मे १८८५ रोजी मराठी लेखकांची दुसरी वार्षिक परिषद पुणे येथील सार्वजनिक हॉलमध्ये कृष्णशास्त्री राजवाडे यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. या परिषदेला उपस्थित राहावे म्हणून महादेव गोविंद रानडे यांच्याकडून फुलेंना निमंत्रण आले होते. रानडेंना लिहिलेल्या उत्तरात जोतीराव फुले म्हणतात "ज्या गृहस्थांकडून एकंदर सर्व मनुष्यांना मानवी हक्कांविषयी वास्तविक विचार केला जाऊन त्याचे त्यास ते हक्क त्यांच्याने खुषीने व उघडपणे देववत नाहीत व चालू वर्तनावरून अनुमान केले असता पुढेही देववणार नाहीत, वा त्या लोकांनी उपस्थित केलेल्या सभांशी व त्यांनी केलेल्या पुस्तकांतील भावार्थाशी आमच्या सभांचा व पुस्तकांचा मेळ मिळत नाही. कारण त्यांच्या पूर्वजांनी आम्हांवर सूड उगविण्याच्या इराद्याने आम्हास दास केल्याचे प्रकर्ण त्यांनी आपल्या बनावट धर्मपुस्तकात कृत्रिमाने दडपले. याविषयी त्याच्यातील जुनाट खल्लड ग्रंथ साक्ष देत आहेत. यावरून आम्हा शूद्रादी अतीशूद्रास काय काय विपत्ती व त्रास सोसावे लागतात हे त्यांच्यातील उंटावरून शेळ्या वळवणाऱ्या ग्रंथकारास व मोठमोठ्या सभास्थानी आगंतूक भाषण करणारास कोठून कळणार ?

असो आता यापुढे आम्ही शूद्र लोक आम्हास फसवून खाणाऱ्या लोकांच्या थापांवर भुलणार नाही...

सारांश, त्यांच्यात मिसळण्याने आम्हा शूद्रादी अतिशूद्रांचा काही एक फायदा होणे नाही. याबद्दल आमचा आम्हीच विचार केला पाहिजे. अहो, त्या दादांना जर सर्वांची एकी करणे असेल तर त्यांनी एकंदर सर्व मानवी प्राण्यास परस्पर अक्षय बंधुप्रीती काय केल्याने वाढेल याचे बीज शोधून काढावे व ते पुस्तकाद्वारे प्रसिद्ध करावे. अशा वेळी डोळे झाकणे उपयोगाचे नाही. या उप्पर त्या सर्वांची मर्जी."

या पत्रात महात्मा फुलेंनी अनेक मर्मग्राही प्रश्नांना स्पर्श केला आहे. त्यातील

भूमिका उपेक्षितांची बाजू घेणारी असल्यामुळे ते पत्रही उपेक्षित राहावे हे स्वाभाविकच म्हणावे लागेल. या पत्रात ते साहित्यातील वर्गीय प्रतिबिंबाची मार्मिक मीमांसा करतात. वर्गीय समाजव्यवस्थेत वाङ्मयादी कलांचे नियंत्रण शासक-शोषक वर्गाकडून केले जाते. बहुतेक साहित्यिक या बलदंड, परोपजीवी वर्गाचे आश्रयार्थी असल्यामुळे ते सत्ताधारी वर्गाची तळी उचलून धरणारे साहित्य निर्माण करतात. हीही भूमिका सामाजिक बांधिलकीचीच असते. मात्र ही बांधिलकी संपूर्ण समाजाशी नसून ती वरिष्ठ वर्गीयांशी असते.

लोकशाही हक्कांचे भान सर्वसामान्य कष्टकरी वर्गांना जसजसे होऊ लागले तसतसे त्याचे प्रतिबिंब साहित्यातही उमटू लागले. अर्वाचीन मराठी साहित्याची सुरुवातच मुळी या प्रवृत्तीतून जन्माला आली. मराठीतील पहिली कादंबरी 'यमुना पर्यटन' १८५७ साली प्रसिद्ध झाली. तिचे लेखक बाबा पदमनजी हे महात्मा फुलेंचे मित्र व बऱ्याच बाबींमध्ये अनुयायी होते. कासार समाजात जन्माला आलेल्या व पुढे खिस्ती धर्माचा स्वीकार केलेल्या बाबा पदमनजींनी 'यमुनापर्यटन'मध्ये विधवाविवाहाचा प्रश्न हाताळला आहे. या कादंबरीमागील प्रेरणा अस्सल जनवादी होत्या. त्यांच्या मागोमाग हरिभाऊ आपटेंच्या सामाजिक कादंबऱ्या व केशवसुतांची कविता, यांतही आपल्याला जनवादी प्रेरणांचे दर्शन घडते. समान मानवी हक्कांबद्दलच्या जाणिवा तत्कालीन युगजाणिवा असल्या तरी त्या काळात एकूण समाजजीवनावर मात्र ब्राह्मणी वर्गाचाच प्रभाव अधिक होता. साहित्य, कलादि जीवनांगेसुद्धा त्या प्रभावापासून मुक्त नव्हती. या प्रवृत्तींच्या प्रभावामुळे हरिभाऊ आपटे ऐतिहासिक कादंबरी लेखनाकडे वळले तर खाडिलकरांसारखे नाटककार पौराणिक-ऐतिहासिक नाट्यलेखनाकडे आपल्या वैभवशाली (!) इतिहासाची वाङ्मयीन रोमँटिक पुनर्निर्मिती करून ते आपल्या देशबांधवामध्ये ज्वलंत देशाभिमानाची ज्योत पेटवू इच्छीत होते. परंतु ८५ टक्के स्त्री, शूद्र व अतिशूद्रांच्या कपाळी लादण्यात आलेल्या गुलामीची आठवण मात्र त्यांना झाली नाही. या गुलामीचे सरळ समर्थन करता येत नाही. पण पण इतिहासाचे पोवाडे गाऊन सामान्यांची दिशाभूल करता येते. म्हणून ही प्रवृत्ती मूलतः जनविरोधी मानावी लागते.

या जनविरोधी प्रवृत्तींचा खरा प्रभावी आविष्कार मात्र ना. सी. फडके व त्यांच्या अनुयायांनी केला. त्यासाठी त्यांनी कलावादाचे आकर्षक बुजगावणे उभे केले. विज्ञान, तंत्रज्ञान व नवीन सामाजिक जाणिवांच्या प्रभावापुढे इतिहासाचे पोवाडे कितीही रोमहर्षक रीतीने गायिले गेले तरी फारसा प्रभाव पडू शकत नाही, हे त्यांनी ओळखले. कलावादाच्या नावाखाली जनवादी साहित्यातील जनसामान्यांच्या प्रती असलेल्या बांधिलकीला विरोध करीत त्यांनी स्वस्त व सवंग रंजकतेची भूमिका घेतली. खऱ्या अर्थाने ही सुद्धा वरिष्ठ वर्गीयांची प्रच्छन्न बांधिलकीच प्रसिद्धीची सर्व साधने शासक-शोषक वरिष्ठ वर्गीयांच्या हातात असल्यामुळे या प्रवृत्तींना फारच मोठे साहाय्य प्राप्त झाले. त्याच प्रमाणात जनवादी वाङ्मय प्रकृतींची पिछेहाट होणे अपरिहार्य झाले.

ही कोंडी फुटण्याच्या आरंभखुणा सर्वप्रथम दृग्गोचर होतात त्या विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात. १९५० मध्ये प्रसिद्ध झालेल्या विभावरी शिरुरकरांच्या 'बळी' व नंतरच्या 'शबरी' मध्ये अनुक्रमे आदिवासी व स्त्रीयांच्या प्रश्नांना वाचा फोडण्यात आली. जनवादी प्रवृत्तींचा खरा प्रभाव दिसू लागला तो मात्र १९६० नंतरच्या कालखंडात. या काळातील जनवादी लेखकांच्या प्रेरणा सर्वस्वी भिन्न होत्या. स्वातंत्र्यपूर्व काळातील महात्मा फुले प्रणीत समाजप्रबोधन व स्वातंत्र्योत्तर काळातील सर्वांगीण स्वरूपाच्या नवीन जन-आकांक्षा यांमधून त्यांची संवेदनशीलता आकाराला आली. प्रभावी व प्रत्ययकारी समाजचित्रे रंगवीत असतानाच त्या चित्रांचे विशिष्ट स्वरूप नियत करणाऱ्या आर्थिक-सामाजिक शक्तींचे पूर्ण भान बाळगून त्यांनी लेखन केले त्यामुळे त्यांचे लेखन एका बाजूला भावनिक प्रतिसाद निर्माण करीत असतानाच वाचकांच्या मनात प्रचंड वैचारिक वादळे उठविते. मनोहर तल्हार 'माणूस'मध्ये रिक्षावाला शंकरचा करुण-गंभीर संघर्ष रंगवीत असतानाच त्या संघर्षाला मूलतः जबाबदार असणाऱ्या समाजव्यवस्थेचे भेदक चित्र उभे करतात. आनंद यादव 'गोतावळा'मध्ये विषम समाजातील स्थित्यंतराच्या प्रत्येक वळणावर श्रमिक वर्गाची होणारी कारुण्यपूर्ण वाताहत रंगवितात. बाबुराव बागुलांचा नायक आपली जात चोरण्यास भाग पाडणाऱ्या जातिव्यवस्थेचे अमानुष स्वरूप उघडे करून दाखवतो. श्री. ना. पेंडसेंच्या 'रथचक्र'ची नायिका नियतीची बळी नसून शोषणावर उभारण्यात आलेल्या पुरुषसत्ताक समाजव्यवस्थेची बळी असते. रा. रं. बोराडे 'मळणी'मध्ये न्याय व स्वाभाविक मानवी हक्कांना वंचित झालेल्या ग्रामीण अशिक्षित स्त्रियांची करुण व उदात्त चित्रे उभी करतात.

जनसाहित्याची तात्त्विक बैठक समतावादी असल्यामुळे ती मानवकेंद्री व म्हणून भौतिकवादी आहे. चैतन्यवाद आपले लक्ष अनादि, अनंत, अतीत अशा चैतन्यरूप परमेश्वरावर केंद्रित करून माणसांना मायारूप मानतो. मुखाने परमेश्वरी एकात्मतेच्या उदात्त तत्त्वाचा घोष करीत त्याच परमेश्वराची साक्ष काढून अस्पृश्यता, जातिव्यवस्था, स्त्रीदास्य व दारिद्र्य यांसारख्या विषमतांचे समर्थन अनेक चैतन्यवादी करतात. नियती, प्रारब्ध, दैव, कर्मफल यांसारख्या जनविरोधी संकल्पनांचे प्रवर्तन करून संस्कृती व समृद्धीची निर्मिती करणाऱ्या श्रमिक वर्गावर सर्वंकष गुलामगिरी लादण्यात येते. जनसाहित्य या सर्व भ्रामक कल्पना व त्यांना तात्त्विक आधार प्रदान करणाऱ्या तत्त्वज्ञानांविरुद्ध युद्धाची घोषणा करते.

चैतन्यवादाचे साहाय्य घेऊनच विषमतावादी प्रस्थापित साहित्य आत्यंतिक व्यक्तिवादी प्रवृत्तींचा पुरस्कार करून माणसांच्या सामाजिकतेविरुद्ध भूमिका घेते माणसांना मनुष्यत्व प्राप्त होते ते समाजातच. समाजच त्याच्या उर्ध्वदृष्टी आकांक्षांना अर्थवत्ता बहाल करतो. बहुसंख्य श्रमिकांच्या वाट्याला जी गुलामगिरी येते तिच्यासाठी मूलतः समाज जबाबदार नसून समाजावर आपली सत्ता प्रस्थापित करणारे प्रभूवर्ग जबाबदार

असतात. जनसाहित्याचा लढा या वर्गाच्या विरोधी आहे. उपेक्षितांच्या दुःखांचे मूळ जनसाहित्यिक प्रभूवर्गांनी निर्मिलेल्या व जोपासलेल्या व्यवस्थेत शोधतात. ही व्यवस्था माणसांचे माणूसपणा हिरावून घेते. ती माणुसकीचे, मैत्रीचे, प्रेमाचे, माता-पुत्रांचे, बंधुत्वाचे असे कुठलेच बंधन मानीत नाही. ती माणसांचे रूपांतर वस्तूत व मानवी संबंधांचे व्यापारी संबंधात करते. त्यामुळे जनसाहित्य या सबंध व्यवस्थेलाच शत्रू मानते. तिच्या विरोधात वेगवेगळ्या आघाड्यांवर लढणाऱ्या ग्रामीण, पुरोगामी, मार्क्सवादी, दलित, आदिवासी व स्त्री या सर्वच वाङ्मयी उन्मेषांना आपले मित्र मानते.

प्रस्थापित व्यवस्थेने लादलेली विषमता अनेक अंगांनी व विविध रूपांमधून व्यक्त होत असली तरी जनसाहित्य ती मूलतः एकच मानते. विषमताविरोधी लढ्याचे सामाजिक; आर्थिक, सांस्कृतिक, लैंगिक व राजकीय यांसारखे कृत्रिम कप्पे करून एकेका अंगावर भर देणे त्याला मान्य नाही. दलित साहित्याला सामाजिक समतेचा लढा अधिक महत्त्वाचा वाटणे किंवा मार्क्सवादी साहित्याला आर्थिक प्रश्नांबद्दल अधिक निकड वाटणे स्वाभाविक आहे. पण त्यासाठी त्यांनी एकमेकांविरूद्ध भूमिका घेणे अंतिमतः जनविरोधी ठरणार आहे.

ही भूमिका वाङ्मयीन नसून सामाजिक व म्हणून कलाद्रोही आहे, असा आक्षेप प्रस्थापितांच्या प्रवक्त्यांकडून अनेकदा घेतला जातो. हा आक्षेप अर्थातच तथ्यहीन आहे. त्याचे निराकरण सुरुवातीच्या विवेचनात केले आहे. सामाजिक वाङ्मय व वाङ्मयीन वाङ्मय असे भेद करणे हेच मुळी तर्कदुष्टपणाचे आहे. वाङ्मयाचे प्रयोजन समाजनिरपेक्ष राहूच शकत नाही. कलेचा संबंध आशयाच्या प्रभावी अभिव्यक्तीशी असतो. आशयात जिवंतपणा तेव्हाच येतो जेव्हा तो कलावंताने स्वतः अनुभवलेला असतो. आपल्या पत्रात महात्मा फुले उंटावरून शेळ्या वळणाऱ्या ग्रंथकारांचा उपहास करतात. त्याचे कारण हेच आहे की असे ग्रंथकार सामाजिक प्रश्नांपासून पूर्णपणे अलिप्त राहून काल्पनिक लेखन करतात. लेखनासाठी त्यांनी प्राप्त केलेली स्फूर्ती सरळ जीवनापासून घेतलेली नसून ती पुस्तकांपासून– विशेषतः पाश्चिमात्य लेखन कृतींपासून घेतलेली असते. अशा या कृतींमधील कलात्मकता त्यामुळे शबल झालेली असते.

जनसाहित्यिकांकडून जिवंत अनुभवाची अपेक्षा आहे. त्यांचा जन्म उपेक्षित वर्गांमध्ये झाला असल्यामुळे त्यांना प्रत्यक्ष वास्तवाचा अनुभव आहेच. हे लेखक उपेक्षितांच्या विविध लढ्यांमध्ये त्यांच्या खांद्याला खांदा लावून सहभागी होतील तेव्हा हे अनुभव विलक्षण तेजस्वी होऊन समूर्त होतील. या सहभागातून उपेक्षित वर्ग जसे नवीन वाङ्मयीन व सांस्कृतिक भान प्राप्त करणार आहेत, तसेच त्यांचे कलावंत आपल्या कलेसाठी नवे तेज निर्माण करणार आहेत. या एकात्मतेतूनच उपेक्षित वर्गांची उद्याच्या स्वातंत्र्याची स्वप्ने वास्तवतेत रूपांतरित होणार आहेत.

# ग्रामीणता आणि कलावंत

## शरद फटांगरे

---

ग्रामीणतेबद्दल नव्याने विचारप्रवृत्त करणारी दोन लक्षवेधी पुस्तके नुकतीच प्रकाशित झाली आहेत. वर्तमान ग्रामजीवनातील अनुभवांचे प्रत्ययकारी दर्शन घडवणारा 'तिसऱ्या पिढीची ग्रामीण कथा' हा प्रातिनिधिक कथासंग्रह आणि 'ग्रामीणता : साहित्य आणि वास्तव' हा डॉ. आनंद यादवांचा नवा लेख संग्रह. बदलत्या खेड्यांच्या पार्श्वभूमीवर ग्रामीण साहित्याच्या स्वतंत्र विचाराची अपरिहार्यता स्पष्ट आणि सडेतोड शब्दांत मांडणारा हा संग्रह. ग्रामीण साहित्याच्या 'विकासाच्या ध्यासातून केलेला विचार' हे यादवांच्या विचारांचे प्रमुख वैशिष्ट्य असल्याने ग्रामीण साहित्याविषयीचे प्रेम आणि जाणकारी यांचे एकत्रित दर्शन या विचारांमधून घडते. शिवाय विकासाच्या जाणिवेमुळेच या विचारांमध्ये वास्तवाचे भानही कायम राहते. हे वास्तवाचे भान ठेवूनच जुन्या आणि नव्या किंवा बदलत्या खेड्यांचा तुलनात्मक विचार संग्रहातल्या अनेक लेखांमधून झालेला आहे.

या विवेचनातले जुन्या खेड्याचे चित्र पाहिल्यानंतर लक्षात येते की, त्या खेड्यातली 'ग्रामीणता' ही एक जगण्याची पद्धत होती. ती नैसर्गिकता आणि निसर्गावलंबन यांवर आधारलेली पद्धत होती. निसर्गावलंबन अर्थातच मुख्यतः पावसावर अवलंबून असणाऱ्या शेतीमुळेच आले होते. साऱ्या भौतिक गरजांची पूर्तता करणाऱ्या वस्तू मूलतः शेतातूनच निर्माण होणाऱ्या होत्या. पर्जन्यमानानुसार जे कमी अधिक उत्पादन होईल त्याच्या वितरणाची एक 'सर्वमान्य' व्यवस्था परंपरेने चालत आली होती. या व्यवस्थेत विषमता तर होतीच, पण प्रत्येकाच्या किमान गरजांच्या पूर्ततेची शाश्वती होती. एवढ्या शाश्वतीवर लोक समाधान मानीत होते. भौतिक गरजांविषयीची ही अल्पसंतुष्टता कितपत समर्थनीय होती, हा सर्वस्वी वेगळा प्रश्न आहे. पण निसर्गावलंबी शरीरश्रमावर आधारित उत्पादन पद्धती आणि पारंपरिक 'सर्वमान्य' वितरण व्यवस्था यामुळे ते ग्रामजीवन कृत्रिमता आणि दण्डसत्ता यांच्या प्रभावापासून खऱ्या अर्थाने मुक्त होते.

धनधान्याच्या विपुलतेची आणि दुध-दुभत्यांच्या वाहत्या गंगांची मराठीतील 'पुस्तकी' वर्णने अवास्तवच म्हटली पाहिजेत. प्रत्येक गावात एखाद-दुसरे घर तसे असेलही. पण ते संपूर्ण खेड्याचे चित्र नव्हे. विषमता होती, दारिद्र्य होते. ते संपावे असे फारसे वाटतही नव्हते. पण दारिद्र्यातही जीवन मनसोक्त उपभोगण्याची जाद

ग्रामीणांना सापडली होती. ही जादूही त्या ग्रामजीवनातल्या लोक कलावंतांचीच देणगी होती. लोकांच्या संवेदना जाग्या ठेवण्याचे आणि जीवनात आनंद फुलवण्याचे काम या लोक-कलावंतांनी पत्करले होते. लोककलांचा आणि लोकवाङ्मयाचा कोणताही आविष्कार याची साक्ष देईल. जीवनात आनंद फुलवण्याची भूमिका लोक-कलावंतांनी उत्स्फूर्तपणे स्वीकारली होती. उत्स्फूर्तपणे म्हणजे आपण 'कलावंत' वगैरे असल्याची फारशी जाणीवही नसताना, एक स्वभावधर्म म्हणून अत्यंत सहजतेने स्वीकारलेली ती भूमिका होती, कलावंत आणि रसिक असे वेगवेगळे प्रकार तेव्हा नव्हतेच. सारेच नैसर्गिक जीवन जगणारे, सारेच अंतःप्रवृत्तींच्या आदेशानुसार चालणारे होते. वासना, भावना आणि संवेदना यांच्या उत्स्फूर्त, सामर्थ्यवान आणि सौंदर्यपूर्ण आविष्कारांवर प्रेम करणारे होते. ज्यांच्या अशा उत्स्फूर्त आणि अकृत्रिम आविष्कारांना प्रतिभेचा स्पर्श लाभला असेल, ते अधिक परिणामकारक ठरले असतील, सर्वस्पर्शी ठरले असतील, प्रत्येकालाच आवडल्याने पुनरावृत्त होत गेले असतील, इतिहासात काही मागे उरले असतील. बहुतेक पारंपरिक लोककलाकृतींच्या रचना याच पद्धतीने झाल्या असल्या पाहिजेत. त्यामुळेच त्यांचे रचनाकार सापडणेही कठीण जाते. आधी उत्स्फूर्त आविष्कारांमधून कलानिर्मितीच्या सामर्थ्याचा प्रत्यय येतो, आणि मग जाणीवपूर्वक निर्मितीला प्रारंभ होतो. कलावंतांच्या विकासाचा हा नैसर्गिक क्रम आजच्या इतकाच तेव्हाही खरा असणार.

या ग्रामीण लोककलावंतांनी जेव्हा जाणीवपूर्वक निर्मितीला सुरुवात केली तेव्हा त्यातून शाहिरी वाङ्मय निर्माण झाले. संत वाङ्मयही निर्माण झाले. संत स्वतःला सर्वार्थाने कलावंत समजत नव्हते; त्यामुळे त्यांच्या भूमिका वेगळ्या झाल्या; हे खरे. शाहिरांनी मात्र जीवनात आनंद फुलवण्याची लोक-कलावंतांची पारंपरिक भूमिकाच पुढे चालू ठेवली. त्यांनी नैसर्गिकता हे ग्रामीणतेचे वैशिष्ट्य कायम ठेवले.

नैसर्गिकता कायम राहिली तरी निसर्गावलंबनात हादरे बसत होते. तत्कालीन खेडे निसर्गाखेरीज दुसऱ्या कोणावरही अवलंबून नव्हते. या अर्थाने ते स्वयंपूर्ण होते. पण बाहेरच्या जगावर अवलंबून नसलेले खेडे बाहेरच्या जगापासून अलिप्त राहू शकले नाही. इस्लामी आक्रमकांचे हल्ले वारंवार होऊ लागले. त्यांचे आक्रमण देशाच्या अगदी खोलवरच्या भागापर्यंत सर्वत्र पोचू लागले; तेव्हा संरक्षणाची गरज जास्त तीव्रतेने भासू लागली. राजसत्तेचे महत्त्व पटू लागले. कोणत्यातरी दण्डसत्तेचा स्वीकार करणे अटळच झाले. तेव्हा परकीय दण्डसत्तेपेक्षा स्वकीयांच्या दण्डसत्तेवर विश्वास ठेवणे लोकांनी पसंत केले. त्यामुळे आधीच अस्तित्वात असलेल्या धर्माधीष्ठित राज्य-सत्ता अधिक दृढ झाल्या. परिणामी धर्मसत्ता आणि दण्डसत्ता, दोन्हींचेही प्राबल्य वाढले. त्यामुळे इस्लामी आक्रमणाच्या काळात निसर्गावलंबी ग्रामजीवन या दोन शक्तींवरही अवलंबून राहू लागले.

ब्रिटिश आक्रमणाचे प्रारंभीचे परिणाम अशाच प्रकारचे असले तरी त्यांची भू मोटी होती. खेड्यातल्या प्रत्येक व्यवसायाला स्वतःला अनुकूल उपयुक्त आणि फायदे शीर ठरेल असे वळण देण्याचा त्यांचा प्रयत्न होता. शेतजमिनींचे केंद्रीकरण त्यामुळे वाढले, विषमता वाढली, नगदी पिकांचे महत्त्व वाटले. इतर धंदेही बंद होत गेले किंव बदलत गेले. निसर्गावलंबी उत्पादन पद्धतीत फार मोठा फरक पडला नाही पण उत्पादनाला जास्तीत जास्त हिस्सा गावाबाहेर जाऊ लागल्याने खेड्याची सर्व पारंपरि वितरण व्यवस्था मोडकळीस आली.

शिवाय निसर्गक्रमानुसार खेड्यात होणाऱ्या परिवर्तनाचा एक भाग म्हणूनही ई रचना संपू लागली. देश एकसंध बनवण्याच्या प्रयत्नात खेड्याचे स्वयंपूर्णत्व नाहीसे होणे संपूर्ण अपरिहार्य होते. जातिव्यवस्था उखडून टाकण्याचा प्रयत्नात खेड्यातील समाज व्यवस्था व तिच्यातून निर्माण झालेली जातिनिष्ठ वितरण व्यवस्थेची सर्वमान्यता टिकणे शक्य नव्हते. शिक्षणामुळे ( अल्पप्रमाणात असल्या तरी ) ज्या अनेक नव्या जाणिव आल्या त्यांचा संपूर्ण पारंपरिक रचनेलाच शह बसणे अटळ होते. हे सारे होत राहिले तरी त्यातून खेडे उद्ध्वस्त होण्याचे काम बऱ्याच संथ गतीने चालू होते.

पण खेड्यातल्या परिवर्तनाच्या या टप्प्यावर स्वातंत्र्य आले; आणि नवे खेडे घडवण्याचा नवा उत्साह या परिवर्तनाला येऊन मिळाला. तेव्हा परिवर्तन जास्त जोमाने सुरू झाले. परिवर्तनाची दिशा स्पष्ट होती. अधिक शेती-उत्पादन, नगदी पिके यांवर अधिक भर होता. शक्य तिथे खेड्यांत इतर उद्योगांची वाढ वगैरे करण्याची उद्दिष्टे डोळ्यांसमोर होती. भौतिक गरजांबद्दलची अल्पसंतुष्टता आता संपली होती. त्याबाबत निसर्गावर अवलंबून राहणेही नकोसे वाटू लागले होते. निसर्गावर मात करण्याची भाषा सुरू झाली होती. काही हुशार माणसांनी निसर्गावर मात करता करता उरलेल्या माणसांवरही मात करायला सुरुवात केली. त्यांच्या किमान गरजांच्या पूर्ततेची जुन्या समाज व्यवस्थेतली हमीही आता उरली नाही. उत्पादनातला त्यांचा वाटा हा उत्पादन–साधने बळकावलेल्यांच्या मर्जीचा भाग बनला. उत्पादन वाढले. निसर्गावलंबन संपले, त्याने काहींना समृद्धी दिली. बाकीच्यांच्या निसर्गावलंबनाचे ' मानवी पराधीनतेत ' रूपांतर झाले.

ही मानवी पराधीनता बिनतक्रार स्वीकारलेली खेडी हे आजच्या बदलत्या खेड्याचे एक वैशिष्ट्यच बनल्यासारखे झाले आहे. प्रगतीच्या खऱ्या आणि खोट्या वाटचालीत खेडी बाहेरच्या जगात जसजशी मिसळून जात आहेत, तसतशी समृद्धी वाढते आहे. त्याबरोबरच पराधीनतेच्या कक्षाही रुंदावत आहे. खेड्यातल्या धनिकांनी खेड्यातल्या गरिबांची पिळवणूक करणे, एवढेच या पराधीनतेचे स्वरूप राहत नाही. शोषणाचे अनेक स्तर त्यातून निर्माण झाले आहेत. एका स्तरावर इतरांना ताब्यात ठेवणारा माणूस दुसऱ्या स्तरावर स्वतःच पराधीन झालेला दिसतो. सर्व प्रकारच्या शोषणाला

मूलतः आणि तत्वतः विरोध करण्याची वृत्ती अशा परिस्थितीत कोठून निर्माण होणार ? उलट बदलत्या काळात, आधुनिक जीवनाच्या संदर्भात हे सारे योग्यच आहे, त्याचा स्वीकार करण्यातच शहाणपणा आहे, हे पटवून घेण्याची, पराधीनता स्वीकारण्याची मानसिक तयारी करण्याचीच खटपट सुरू होते. आपल्यापेक्षा दुर्बल असणारांना अंकित ठेवण्यातच पराक्रम मानणारी आणि आपल्यापेक्षा प्रबळ असणाऱ्यांच्या आधीन राहण्यालाच 'चातुर्य' समजणारी एक नवी 'संस्कृती' त्यातून निर्माण होते. खेड्यांत आणि शहरांत, कोठेही या संस्कृतीचा अभाव दिसणार नाही. खेड्याची जी जीवनपद्धती–ग्रामीणता–ती या संस्कृतीने पूर्णतः उद्‌ध्वस्त झाली आहे. नैसर्गिकता आणि निसर्गावलंबन या दोन्ही वैशिष्ट्यांसह निसर्गावलंबन संपूर्ण समर्थनीय असले तरी त्यातून उद्‌भवलेल्या मानवी पराधीनतेचे समर्थन कसे करणार ? एकदा पराधीनता बिनतक्रार स्वीकारली की स्वप्न हरवून जायला फारसा वेळ लागत नाही. हे स्वत्व हा तर नैसर्गिकतेचा प्राण होता. जे निसर्गतःच आहे, स्वतःतच आहे, त्यापेक्षा जे बाहेरून येत आहे, लादले जात जात आहे, ते जास्त चांगले आहे असे मानण्याची वृत्ती पराधीनतेचा मनःपूर्वक स्वीकार केल्यानेच निर्माण होते. ही वृत्ती शहरापेक्षा खेड्यांमध्ये फार कमी आहे, असे मानण्याचे कारण नाही.

आता बिघडलेली अभिरुची, हरवलेला आनंद. नैसर्गिकता, अशा ग्राम–जीवनात कलावंतांचे स्थान कोणते ? जीवनात आनंद फुलवण्याची कामगिरी आता उरली नाही मग या खेड्यात कलावंतांची भूमिका कोणती ? या भूमिकेचा विचार करू लागलात म्हणजे लोककला आणि लोकवाङ्मयापेक्षा आधुनिक ग्रामीण साहित्याचा वेगळेपणा लक्षात येतो. पूर्णार्थाने 'माणूस' म्हणून जगण्यातला आनंद आता खेड्यात ( ही ) सहजसाध्य राहिलेला नाही. स्वतःच्या माणूसपणाशी अनेक स्तरांवर संघर्ष करावा लागतो आहे. वर सांगितलेल्या 'संस्कृती'तून उद्‌भवलेल्या या संघर्षांचे यथार्थ आणि परिणामकारक चित्रण करणे हाच वास्तववादी ग्रामीण साहित्याचा आजचा प्रमुख विषय आहे. कारण या संघर्षांना कारणीभूत होणारे तणाव आणि विसंवाद यांनीच ग्रामीण वास्तवाचा बहुतांश भाग व्यापलेला आहे.

त्यांतला सर्वांत मोठा आणि तीव्र संघर्ष अर्थातच दारिद्र्य आणि विषमता याविरुद्धचा. कलाकृतींमधून घेतला जाणारा जीवनाचा शोध हा बहुधा संघर्षांचाच शोध असतो. हा संघर्ष कधी अस्तित्त्वासाठी असतो, कधी निर्माणासाठी असतो. दारिद्र्याविरूद्ध करावा लागणारा संघर्ष, विषमतेतही ताठ मानेनें जगण्यासाठी करावा लागणारा संघर्ष हा अस्तित्त्वासाठीचाच संघर्ष असतो. अस्तित्त्वासाठीचा संघर्ष म्हणजे नुसता व्यावहारिक चरितार्थासाठीचा संघर्ष नव्हे, तर स्वतंत्र जाणिवा, संवेदनक्षमता, मनाचा निरोगीपणा आणि एकंदरीत माणूसपणा टिकवून धरण्यासाठी करावा लागणारा संघर्ष असतो. हा अस्तित्त्वासाठीचा संघर्ष निर्माण होतो, तेव्हा एकस्याने

झगडण्यापेक्षा समूह बनवण्यालाच प्राधान्य मिळते. कारण अशा संघर्षात एकाकी लढत फक्त असहायतेचाच प्रत्यय देत असते. स्वतःचा आणि इतरांचा दारिद्र्य-विषमतेविरुद्धचा संघर्ष साहित्यात आणताना 'सामाजिक'तेचा आग्रह म्हणूनच धरला जातो. सामूहिक लढ्याच्या जाणिवा, एकेकट्या लढतीतल्या असहायतेच्या जाणिवा जेव्हा कलानिर्मितीला प्रेरणा देतात, तेव्हा त्यांतून सामाजिक आशयाच्या कलाकृतीच निर्माण होणार, हे तर उघड आहे. पण या सामूहिक जाणिवांनाही प्रत्येकाच्या व्यक्तित्वाचे रंग असतात. हे रंग दुर्लक्षिले गेले तर सामाजिक आशयाच्या कलाकृती प्रत्ययकारी ठरणार नाहीत, फारशा परिणामकारकही ठरणार नाहीत. तेव्हा 'बांधिलकी'चे कोणतेही ठराविक संकेत न बनवता अधिक मुक्तपणाने हा सामाजिक आशय ग्रामीण साहित्यात आला पाहिजे.

दारिद्र्यातून, बदलत्या खेड्यातल्या थोड्याफार लोकांची सुटका झाली असली तरी वाढती कृत्रिमता टाळणे सर्वांनाच कठीण आहे. माणूसपणाचा दुसरा संघर्ष आहे तो या कृत्रिमतेविरुद्ध. शेती उत्पादनाचे तंत्र बदलले, उद्योग धंदे वाढू लागले आणि त्यापेक्षा उद्योगांबद्दलचे प्रेम वाढू लागले म्हणजे 'कृत्रिमता' हे नुसत्या उत्पादन तंत्राचे वैशिष्ट्य राहात नाही. तकलादू वस्तूंचा हव्यास, आनंदाची कृत्रिम साधने बळकावीत बसण्याचा हव्यास, माणसामाणसातील संबंधात घृणास्पद वाटावी एवढी औपचारिकता ही सारी त्या कृत्रिमतेचीच फळे आहेत. एकदा 'ग्रामीणता'च नष्ट झाल्यानंतर 'जे शहर नाही, ते खेडे' एवढीच खेड्याची व्याख्या उरते. आधु-निकीकरण म्हणजे शहरीकरण, आणि शहरीकरण म्हणजे कृत्रिमता ही समीकरणे मनात ठासून बसतात. ग्राम-जीवनातला कोणताही नवा बदल स्वीकारताना एका बाजूने परंपरा आणि आधुनिकता यांच्यातला संघर्ष तर दुसऱ्या बाजूने नैसर्गिकता आणि अनैसर्गिकता (कृत्रिमता) यांच्यातला संघर्ष अनुभवाला येतो. नैसर्गिकता आणि आधुनिकता या अर्थातच समर्थनीय बाजू. पण नैसर्गिकता पारंपरिकतेशी आणि आधुनिकता अनैसर्गिकतेशी एक कृत्रिम, सांकेतिक, वरवरचे नाते जुळवून बसली आहे त्यामुळे या संघर्षातला गुंता वाढला आहे. कशाचा स्वीकार करायचा, कशाला नकार द्यायचा, काय आग्रहपूर्वक टिकवून धरायचे, काय इथेच सोडून पुढे जायचे याबद्दल प्रचंड गोंधळ आहे. या गोंधळलेल्या अवस्थेत कशाचाही स्वीकार केला तरी तो बदलत्या खेड्यातल्या फक्त विस्कळितपणातच भर टाकतो आहे. अशा स्थितीत वर्तमान ग्राम-जीवनाच्या पार्श्वभूमीवर सर्वसामान्य माणसाच्या खऱ्या नैसर्गिक-आधुनिक जीवनाचे दर्शन घडवणे हेही ग्रामीण कलावंतांचेच काम आहे.

दारिद्र्य-विषमतेविरुद्धचे संघर्ष शहरातील लोकांनाही अनुभवावे लागणारे संघर्ष आहेत. कृत्रिमतेविरुद्धचा मानसिक संघर्ष तर नागरी कलावंतांनाही करावा लागतो आहे. पण यापेक्षा वेगळा असा एक आणखी संघर्ष ग्रामीण जीवनात प्रकर्षाने

जाणवतो आहे. बदलत्या आणि प्रगतिशील खेड्यात व्यक्ती आणि समाज यांच्यातले प्रत्यक्ष नाते, आणि थेट व्यवहार जवळ जवळ संपुष्टात आला आहे. या खेड्यांमधला वेगवेगळ्या आर्थिक स्तरावरचा, कोणताही माणूस हा गटानेच जगतो आहे. गट जातीचा, पोट जातीचा, पोट-पोटजातीचा व्यावहारिक हितसंबंधांचा कसाचाही असला तरी चालतो, पण गटाशिवाय मात्र चालत नाही. समूहात राहूनच आपणा सर्वांचा विकास होईल असे वाटणे निराळे आणि समूहावाचून आपल्याला गत्यंतर नाही, असे वाटणे निराळे. गटाबाहेरच्या कोणत्याही गोष्टीत स्वारस्य नसणे, गटाच्या (बहुधा हितसंबंधातूनच निर्माण झालेल्या) आवडी निवडींव्यतिरिक्त कोणतीही वेगळी अभिरुची नसणे, हे काही स्वतंत्र वृत्तीशी पूर्णतः विसंवादी असा हा समूहपणा बदलत्या खेड्यात राहणारांना टाळता येणे कठीण दिसते. मात्र हा समूहपणा शहरात फारसा निर्माण होत नाही. कारण स्पर्धा आणि गर्दी हे दोनच शहरातले परवलीचे शब्द आहेत. रस्त्यावरून जाताना गर्दी टाळणे जेवढे अशक्य, तेवढेच कुठल्याही प्रकारची करियर वगैरे स्वीकारली तरी स्पर्धा टाळणे शहरात अशक्य आहे. स्पर्धात्मक जीवनात संवाद आणि सहकार्य यांना एका जुजबी मर्यादेपलीकडे वाव नसतो. सभोवतालच्या आणि बरोबरीच्या प्रत्येकाबद्दल सुप्त अविश्वास आणि परकेपणा बाळगल्याखेरीज स्पर्धेसाठी कायम दक्ष आणि जागरूक राहण्याचे काम पुरे होत नाही. या सर्वांच्या सर्वांबद्दलच्या अविश्वासातून आणि सुप्त परकेपणातून प्रत्येकावरच ‘एकटेपणा’ लादला जातो. स्वतंत्र आणि स्वयंभू व्यक्तिमत्त्वाचा विकास साधायचा झालाच तर शहरात लादल्या गेलेल्या ‘समूहपणा’शी संघर्ष करूनच तो साधावा लागतो. व्यक्तिविकासाच्या प्रेरणांना आणि ‘माणूसपणा’ला खेड्यात आणि शहरात कराव्या लागणाऱ्या संघर्षाचे स्वरूपही निराळे. त्यामुळेही ग्रामीण आणि नागरी साहित्याचा स्वतंत्र विचार करणे अपरिहार्यच राहणार आहे.

प्रगतिशील खेड्यांपेक्षा वेगळ्या प्रकारची खेडीही ग्रामीण साहित्याच्या संदर्भात विचारात घेतली पाहिजेत. काळाबरोबर बदलता बदलता या खेड्यातल्या रम्य सकाळची आता भकास दुपार झाली आहे. निसर्गाला कोरड पडली आहे. माणसे परागंदा झाली आहेत. पक्ष्यांनी अर्थातच सर्वांच्या आधी गाव सोडला आहे. गावात उरले आहे ते पंख झडून गेलेले जर्जर वार्धक्य, माणसांना पंख असतात हे मुळातूनच माहीत नसलेली पोटार्थी माणसे, आणि परिस्थितीने पंख जखडून टाकलेले ‘बेकार’ तारुण्य. जखडलेल्या पंखांचा स्वतःलाच हळूहळू विसर पाडीत, पारावर नाहीतर बसस्टँण्डवर दिवस घालवीत, पदव्यांची भेंडोळी जपून ठेवीत, बेकारी संपण्याची वाट पाहात पंचविशी-तिशीतले तरुण कोणत्या प्रेरणेने जगत असतील? हे ‘काल्पनिक खेड्या’चे चित्र नव्हे. किंवा फक्त मराठवाड्यातच मोठ्या प्रमाणावर आढळणारे खेडे नव्हे. राज्यातल्या कोणत्याही तालुक्याच्या गावी बसस्टँण्डवर कडेच्या फलाटावर किंवा

बाजूच्या शेडसमोर रोज संध्याकाळी निदान चार-पाच 'मुक्कामी' गाड्या उभ्या दिसतील, त्यांतल्या कोणत्याही गाडीत चढलात तरी ती तुम्हाला न चुकता अशा खेड्यातच नेऊन सोडील. दिवसातली एक मुक्कामी गाडी हाच बाहेरच्या जगाशी संपर्क साधणारा एकटा दुवा. या गाडीतून माणसांबरोबर एखाद-दुसरे दैनिक येते, एखादा 'मायापुरी' चा अंक येतो; आणि दिवसभर हवेतून एक-दोन बँडच्या ट्रान्झिस्टरमधून विविध भारतीच्या जाहिराती येतात. पंखांचा विसर पाडण्याचं काम 'मायापुरी' आणि जाहिराती चोख बजावीत असल्या तरी पंखातल्या ऊर्मी जाग्या करण्याचे काम कलाकृतींनीच करायचे आहे. मृतप्राय झालेले खेडे हाही जिवंत कलाकृतीचा विषय होऊ शकतो, याचे भान त्यासाठीच राखले पाहिजे. कारण प्रेत निर्जीव असले तरी स्मशानातले अश्रू जिवंत असतात. मृत्यूवरची एखादी कविता त्यापेक्षाही जिवंत असते. मृत्यूची भीषणता दाखवीत जिवंतपणाचे मोल ती पटवून देते. मृतप्राय ग्राम जीवनावरचे उद्गार आणि त्यावरचे भाष्य ही अशाच जिवंत ग्रामीणतेचे—नैसर्गिकतेचे महत्त्व पटवून देतील. ही सगळीच काही पूर्वीपासून निसर्गाचा कोप झालेली खेडी नव्हेत, पण आपल्या 'जंगलतोड आधुनिकते'च्या हव्यासामुळे आता तिथे बाराही महिने दुष्काळ हा एकच ऋतू असतो. उजाड जमीन, कोरड्या विहिरी, भकास माणसे...आधुनिक बदलत्या जीवनात या खेड्यांच्या वाट्याला आलेले हे दैन्य, ही अर्थशून्यता हे ग्राम—जीवनातले फार मोठे वास्तव आहे. या वास्तवाचे प्रत्ययकारी दर्शन या खेड्यातल्या लोकांपेक्षा कदाचित बाहेरच्या लोकांना जास्तच अंतर्मुख करणारे ठरेल !

ग्रामीण वास्तवातील संघर्ष आणि अर्थशून्यता यांचे चित्रण मोठ्या प्रमाणावर ग्रामीण साहित्यात येऊ लागले आहेच. 'तिसऱ्या पिढीची ग्रामीण कथा' मधील अनेक कथाही त्याचा प्रत्यय देतील. हे संघर्ष आणि अर्थशून्यता यांच्या मिश्रणातून बनलेले ग्रामीण वास्तव ही अनेक सामाजिक शोकांतिकांची जन्मभूमी ठरावी अशी परिस्थिती आहे. अमानुष समाजपद्धतीत माणूस म्हणून जगताना अनुभवाव्या लागणाऱ्या तणावांमधून आणि विसंवादांमधून सामाजिक शोकांतिका निर्माण होतात. अशा परिस्थितीतल्या अनुभवांचेच चित्रण या कथांमध्ये असल्यामुळे प्रत्येक कथेला स्वतःचे रंग असले तरी त्या साऱ्या कथांमागच्या अंतःप्रवाहाला एक अपरिहार्य शोकांतिकेचा 'मूड' आहे. हा मूड ज्या अनुभवांतून निर्माण झाला ते अनुभव सामाजिकतेशीच निगडित आहेत. त्यामुळे त्यातून निर्मिती झाली आहे (आणि होणार आहे) ती सामाजिक शोकांतिकांचीच. हा शोकात्म मूड ग्रामीण साहित्याचा यापुढचा प्रवास सूचित करणारा आहे.

ग्रामीणतेतील आणि ग्रामीण वास्तवातील आनंद संघर्ष आणि अर्थशून्यता यांचे चित्रण करण्यातूनच ग्रामीण साहित्याचा विकास होत जाणार आहे.

# चंदेरी दुनियेत

## श्री. वसंत नरहर कुबेर

---

हिंदी चित्रपटसृष्टीच्या एका कालखंडावर स्वतःच्या जिवंत अभिनयाच्या साहाय्याने खास ठसा उतरविणाऱ्या प्रख्यात अभिनेत्री लीला चिटणीस यांची स्वकथित जीवन-कहाणी म्हणजे 'चंदेरी दुनियेत' हे एक सहजसुंदर आत्मचरित्र. महाराष्ट्रीय कुटुंबातील लीलाबाईंनी चित्रसृष्टीतील केलेल्या वाटचालीचा तपशील आणि त्यांचे खासगी आयुष्य यांचे दर्शन प्रस्तुत आत्मचरित्रात घडते.

मराठी साहित्यात नट्यांची आत्मचरित्रे ही बाब नवीन नाही. शान्ता आपटे, हंसा वाडकर, स्नेहप्रभा प्रधान इत्यादींची आत्मचरित्रे आतापर्यंत प्रसिद्ध झाली आणि गाजली. आता प्रश्न असा उत्पन्न होतो की साहित्यिक नसताना अभिनेत्यांची आत्म-चरित्रे आवडीने वाचली जातात, गाजतात, प्रतिष्ठा मिळवितात याची कारणे कोणती असावीत ? अभिनेत्यांची आत्मचरित्रे वाचताना वाचकाचा दृष्टिकोण वाङ्मयीन असतो की अवाङ्मयीन ? अशा प्रकारच्या लेखनाला प्रतिष्ठा मिळते ती लेखकाच्या नावा-मागील प्रसिद्धीच्या वलयामुळे की त्यातील वाङ्मयीन मूल्यांमुळे ? जर या लेखनाला वाङ्मयीन मूल्य नसेल तर हे लेखन कितपत टिकू शकेल ?

सर्वसाधारणपणे समाजात नटनट्यांच्या खासगी किंवा प्रकट जीवनाबद्दल लोकांना कुतूहल असते. ही नटमंडळी किती काम करतात, त्यांना लाखांच्या आकड्यात पैसे कसे मिळतात, त्यांच्या श्रीमंत वातावरणात मेजवान्या कशा चालतात, सुंदर स्त्री-पुरुषांमध्ये सर्व प्रकारचे संबंध कसे येतात, आपले सर्वसामान्यांचे जीवन व नटनट्यांचे जीवन यांत कसा फरक असतो अशा अनेक बाबतींत सामान्य माणसांना आत्यंतिक उत्कंठा असते. याबरोबरच निरनिराळ्या प्रसिद्धी माध्यमांतून कळणाऱ्या नटनट्यां-संबंधीच्या माहितीने या लोकांबद्दल अनेक समजगैरसमज पसरत असतात. नटनट्यांचे जीवन चैनीचे, उपभोगाचे, विलासीपणाचे असते; त्यात दुःख नाही, कटकटी नाहीत अशी समजूत सर्वसामान्य जनतेत दृढमूल झालेली असते. या मनोभूमिकेवरून कोण-त्याही नटाचे, विशेषतः नटीचे आत्मचरित्र वाचताना सर्वसामान्य माणूस त्याकडे अवाङ्मयीन दृष्टीनेच अधिक बघतो; इतकेच नाही तर वाङ्मयीन जाण असलेल्या वाच-काच्या मनातसुद्धा काही प्रमाणात इतरांप्रमाणे कुतूहलाचा भाग असतोच. आत्मचरित्र वाचताना लेखक-लेखिकेच्या आयुष्यातील काही भानगडी कळाव्यात, चुरचुरीत चचला विषय मिळावेत, नेहमी वेगळ्या जगात वावरणाऱ्या या लोकांचे व त्यांच्या जगाचे दर्शन

व्हावे असे हेतू बऱ्याच जणांच्या मनात असतात. निष्कलंक चारित्र्याचा नट किंवा नटी असेल तर त्यांचे आत्मचरित्र सामान्य वाचकांना अळणी वाटते इतक्या प्रमाणात या चित्रपट क्षेत्राचा लौकिक ' भानगडींचे क्षेत्र ' म्हणून पसरला आहे.

अभिनेत्यांच्या आत्मचरित्र वाचकांची ही एक बाजू असली तरी ती संपूर्ण नसते. कित्येक संवेदनाशील मनाचे वाचक असेही असतात की अभिनयक्षेत्रातील कष्टाची, वेगडीपणाची, फसवाफसवीची त्यांना कल्पना असते; प्रत्येक माणसाला मन असते, भावना असतात याची जाणीव असणारे काही वाचक असतात. त्यांना कुतूहल असते ते या नटनट्या आपल्या मनाचा कोंडमारा कसा सहन करतात ? त्यांची भावनिक ओढाताण कशी होते ? याबद्दल. कलावंताच्या कलेच्या खास जगाचे वास्तव, दर्जेदार दर्शन घेणे असाही काही लोकांचा प्रामाणिक हेतू असतो. हा हेतू वाङ्मयीन गुणधर्मांना जवळचा असतो.

यावरून असे म्हणता येईल की, ' नटनट्यांच्या आत्मचरित्राचा वाचकवर्ग ठराविक अशा एकाच वर्गातील असेल असे नाही आणि वाचकाचा जो दर्जा असेल, बौद्धिक कुवत असेल त्यावर वाचकाचा वाङ्मयीन किंवा अवाङ्मयीन दृष्टिकोण अवलंबून असतो.

ज्यावेळी अशा प्रकारचे लेखन प्रसिद्ध होते. त्यावेळी त्याला वाङ्मयीन दर्जा असतो म्हणून ते प्रकाशित होते असे नाही. कदाचित केवळ खळबळ माजविण्यासाठी, सवंग लोकप्रियतेसाठी एखादे आत्मचरित्र प्रसिद्ध होईलही; परंतु एक गोष्ट मात्र खरी की, अभिनेत्यांचे प्रकाशित लेखन त्यांच्यामागील प्रसिद्धीच्या वलयामुळे प्रथम प्रकाशित होते आणि त्यातील वाङ्मयीन कस नंतर तपासला जातो.

अभिनेत्यांमागील प्रसिद्धीचे वलय त्यांच्या लेखनाला प्रसिद्धी मिळवून देते पण प्रतिष्ठा नाही. सवंगतेसाठी झालेले लेखन हे तितक्याच वेगाने विसरले जाते. त्यामुळे अवाङ्मयीन दृष्टिकोण असणाऱ्या वाचकांवरून लेखनाला प्रतिष्ठा मिळत नाही. वाङ्मयीन दर्जा हा काही मूल्यांवर ठरत असतो. अभिनेत्यांच्या लेखनात जर काही वाङ्मयीन गुण असतील तर सुजाण वाचक ते लेखन उचलून धरतात व त्यामुळे लेखनाला प्रसिद्धीसोबत प्रतिष्ठाही मिळू शकते

वाङ्मयीन दर्जा हा लेखकाच्या अनुभव घेण्याच्या आणि व्यक्त करण्याच्या क्षमतेवर, पद्धतीवर अवलंबून असतो. त्यामुळे लेखकाचा अनुभव जितका जिवंत, समृद्ध असतो व त्याची अभिव्यक्ती जितकी प्रांजल, परिणामकारक असते त्या प्रमाणात आत्मचरित्राचा दर्जा उंचावत जातो. अशा वेळी कलावंत लेखकामागील प्रसिद्धीचे वलय थोडे कमी असले तरी चालते परंतु भरपूर प्रसिद्धी असूनही वेगडी अनुभवदर्शन घडविणारे आत्मचरित्र कधीच प्रतिष्ठा पावू शकत नाही. तसेच त्याचा काळ हा अल्पजीवी ठरतो.

आतापर्यंत केलेल्या विवेचनाच्या आधारावर लीला चिटणीस यांच्या ' चंदेरी दुनियेत ' या आत्मचरित्राचा विचार केला तर या आत्मचरित्रात ' समृद्ध अनुभवांचा प्रांजल अविष्कार ' असल्याने त्याचा वाङ्मयीन दर्जा उच्च प्रतीचा आहे अशी कबुली प्रथमच द्यावी लागते.

१९२४ ते १९८० या कालखंडातील जीवन लीलाबाईंनी चित्रित केले असून विवाहपूर्व आणि विवाहोत्तर जीवनाचे दर्शन घडविले आहे. लीलाबाईंच्या व्यक्तिमत्वाचा विकास डॉ. चिटणीसांशी विवाह झाल्यानंतर सुरू झाला. नाट्य व चित्रपट क्षेत्रात सर्वसाधारणपणे एकाच वेळी लीलाबाईंनी प्रवेश केला व यश संपादन केले. वैवाहिक जीवनाच्या बाबतीत मात्र त्यांच्या वाट्याला आले केवळ अपयश, विफलता, आणि त्यांतून वाट्याला आला संघर्ष. लीलाबाईंना पतीचे भावनिक सुख मिळालेच नाही. डॉ. चिटणीस, गुली, चंद्रशेखर आर्या यांच्याकडून लीलाबाईंच्या वाट्याला असमाधान आले तर मा. विनायक , गजानन जागीरदार, शशिधर मुकर्जी यांच्याशी लीलाबाईंची जोडी जमू शकली नाही आणि बाबुराव पेंढारकरांनी तर केवळ मनस्ताप दिला. परंतु या साऱ्यांबद्दल लिहिताना लीलाबाईंनी अतिशय संयम बाळगला असून त्यात कुठेही राग नाही, असूया नाही, आहे केवळ निराशा आणि दैवाने दिलेल्या अपयशा-मुळे वाट्याला आलेले वैफल्य. या बाबतीत असा एक विचित्र योगायोग आहे की वास्तवात तर जोडीदाराचे सुख त्यांना फार काळ मिळालेच नाहीच परंतु चित्रपटात देखील त्यांच्या वाट्याला प्रेयसीपेक्षा आईच्या भूमिका अधिक आल्या.

चित्रपटात आईची भूमिका करताना मुलांवर वात्सल्याची पाखर घालणाऱ्या लीलाबाईंना स्वतःच्या मुलांपासून कायम दूर राहावे लागे. अखंड कामाच्या व्यापात व्यग्र असल्याने इच्छा असूनही त्यांना मुलांचा सहवास अधिक काळ मिळत नसे. पुत्रविरहाच्या या काळातच त्यांच्या थोरल्या मुलाचे जीवन व्यसनात होरपळून निघाले आणि या प्रकाराचा लीलाबाईंच्या मनावर जबरदस्त ताण आला. अशा प्रकारे सर्व बाजूने त्यांचे खासगी जीवन दुःखमय बनून गेले.

जीवनात अपयशी ठरलेल्या लीलाबाईंनी हिंदी चित्रपटातून एक काळ मात्र अक्षरशः गाजवला. ' कंगन, ' ' बंधन ' ' झूला ' हे बॉम्बे टॉकीजचे चित्रपट लीला-बाईंना अखंड कीर्तिदायी ठरले. या चित्रपटाद्वारे लीला चिटणीस व अशोककुमार या प्रणयी जोडीने रसिकांच्या हृदयात कायमचे स्थान पटकावले. अर्थात हे यश म्हणजे काही जादू नव्हती तर ते लीलाबाईंच्या तपश्चर्येचे फळ होते. अभिनयाचा श्रीगणेशा ठाऊक नसलेल्या लीलाबाईंनी ' धुंवाधर ' चित्रपटाच्या अपयशापासून सुरुवात केली होती, नंतर ' हंस, ' ' प्रभात ' इत्यादी संस्थांच्या चित्रपटांतून कामे केली, अनुभव जमा केला, कष्ट केले, प्रसंगी बेकारीदेखील अनुभवली. आणि नंतर त्यांना बॉम्बे टॉकीजमध्ये प्रवेश मिळाला. बॉम्बे टॉकीजचे वातावरण अतिशय शिस्तीचे होते.

त्यात हिमांशू रॉयसारखे कष्टाळू, सिद्धहस्त दिग्दर्शक त्यांना लाभले. तहानभूक विसरून एका कर्तव्यपूर्तीच्या ध्येयाने ही मंडळी झपाटली होती. ‘ झूला ’च्या चित्रीकरणाच्या वेळी अखंड सत्तेचाळीस तास चालू असणाऱ्या चित्रणाचा अनुभव वाचला म्हणजे मन आश्चर्यचकित होते.

१९४८ सालापासून लीलाबाई ‘ आई ’ च्या भूमिकेत दिसू लागल्या. चित्रपटसृष्टी याबेळी हळूहळू बदलत होती. लोक कष्ट विसरले व झटपट यशाच्या, पैशाच्या मागे लागले. जुन्या परंपरेतील लीलाबाईंसारख्या प्रामाणिक कलाकारांना हे बदल पचविणे कठीण गेले. तरीदेखील लीलाबाईंनी १९८० सालापर्यंत कामे केली.

हिंदी चित्रपटात काम करताना लीलाबाई आपल्या मातृभाषेला विसरल्या नाहीत. मराठी चित्रपट आणि मराठी नाट्यक्षेत्रातही त्यांनी कामे केली. ‘ छाया ’, ‘अर्धांगी’, ‘ प्रेम आंधळं असतं ’, ‘ आधी कळस मग पाया ’, ‘ पाहू रे किती वाट ’ इत्यादी मराठी चित्रपटांतून त्यांनी कामे केली अभिनेत्री म्हणून लीलाबाईंचा प्रवेश झाला तोच मुळी रंगभूमीवर. ‘ उसना नवरा ’ हे त्यांनी केलेले पहिले नाटक. नंतर नाट्य-मन्वंतर संस्थेत त्यांनी काही वर्षे काम केले. स्वतःदेखील एक नाटक लिहून त्याचे काही प्रयोग केले.

या आत्मचरित्राचे ‘ तपशिलाची विपुलता ’ हे वैशिष्ट्य म्हणावे लागेल. डॉ. चिटणीसांची पत्नी असताना लीलाबाईंनी पाहिलेल्या व अनुभवलेल्या सामाजिक, राजकीय चळवळींचे वर्णन त्यांनी समरसून केले आहे. नाट्यमन्वंतर, प्रभात, बॉम्बे टॉकीज व तत्कालीन अन्य चित्रसंस्था यांच्या स्वरूप-वैशिष्ट्याबरोबरच विस्तृत इतिहास मूळ निवेदनाचा प्रवाह कायम टेवून वर्णन केला आहे. १९५० सालानंतरच्या चित्रपटक्षेत्रातील परिवर्तनाचे बदलते स्वरूप कारणमीमांसेसहित वर्णन केले आहे.

लीलाबाईंच्या आत्मचरित्रात अनेक वाङ्मयीन गुण आढळतात. त्यांपैकी एक गुण म्हणजे त्यातील जिवंत शब्दचित्रे आणि व्यक्तिचित्रणे हा होय. बॉम्बे टॉकीज, प्रभात संस्था, आधुनिक काळातील ध्येयहीन स्थितीत पैशामागे भरकटत चाललेली फिल्मी दुनिया यांची सुंदर शब्दचित्रे ओघात आली आहेत. त्याशिवाय लेखिकेच्या सह-वासात आलेले केशवराव दाते, मा. विनायक, के. ना. काळे, व्ही. शांताराम, नट प्रल्हाद, विष्णुपंत पागनीस, हिमांशू रॉय, व्ही. एच. देसाई, अशोक कुमार, दिलीप कुमार, देवआनंद, राजकपूर, बिमल रॉय, हृषिकेश मुकर्जी आदि प्रमुख नट व दिग्दर्शकांची व्यक्तिचित्रणे हृद्य, वास्तव, डोळस उतरली आहेत. याशिवाय प्रसंगपरत्वे राजा परांजपे, भय्या टेंगडी, शम्मीकपूर, नंदा इत्यादी नटनट्यांची दुय्यम स्वरूपाची व्यक्तिचित्रणे कथनाच्या ओघात सहजपणे आली आहेत. दिलीपकुमार. देवआनंद, राजकपूर, अशोककुमार, बिमल रॉय, हृषिकेश मुकर्जी यांच्या कार्याचे व कर्तृत्वाचे मूल्यमापन लीलाबाईंनी स्वतंत्र प्रकरणात अभ्यासपूर्ण रीतीने केले आहे.

या संपूर्ण आत्मचरित्रात लीलाबाईंचे घडणारे दर्शन अतिशय विलोभनीय आणि वैविध्यपूर्ण आहे. एक दुर्दैवी पत्नी व माता, एक कष्टाळू व श्रेष्ठ दर्जाची अभिनेत्री, प्रिय व्यक्तीवरून सर्वस्व ओवाळून टाकणारी प्रामाणिक परंतु अभागी स्त्री, स्वतःच्या दोषांची कबुली देणारी प्रामाणिक व्यक्ती, स्वतःच्या क्षेत्राचे डोळसपणे निरीक्षण करणारी अभ्यासू—अशा निरनिराळ्या पैलूंचे दर्शन लीलाबाईंच्या आत्मनिवेदनातून घडले जाते.

लीलाबाईंच्या लेखनातील अन्य वैशिष्ट्ये म्हणजे त्यांच्या लेखनात समतोलपणा, प्रामाणिकपणा, कलात्मक अलिप्तता, जिव्हाळ्याची भाषा यांचा उल्लेख करावा लागेल. यशस्वी आत्मचरित्रासाठी आवश्यक असणारे स्वतःभोवती आरती न ओवाळणे, स्वतःच्या वृत्तीचे समर्थन न करणे, लपवाछपवी न करणे इत्यादी गुण या आत्मचरित्रात पुरेपुर उतरले आहेत. आत्मचरित्राच्या लेखनातून सलग प्रवाहित्व सहज जाणवते. त्याचे एक कारण म्हणजे अनुभव सहज-साध्या भाषेतून अकृत्रिमपणे व्यक्त झाले आहेत हे सांगता येईल. दुसरे असे की, कथनात कुठेही राखून ठेवण्याचा प्रयत्न केलेला नाही. स्वतःबद्दल लिहिताना ज्याप्रमाणे आत्मप्रौढी नाही त्याप्रमाणे दुसऱ्याबद्दल लिहिताना पूर्वग्रहदूषितता, आकस नाही. जे आहे किंवा जे होते ते तसेच वास्तव पद्धतीने सांगितले आहे. अशा वाङ्मयीन गुणांनी समृद्ध, उत्कट अनुभवांनी संपन्न असणारे हे आत्मचरित्र मराठी वाङ्मयात महत्त्वपूर्ण आहे असे म्हणावयास प्रत्यवाय नाही.

---

चंदेरी दुनियेत—लीला चिटणीस. श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०.
पृष्ठे ३८६, मूल्य पन्नास रुपये.

अनुक्रमणिका

# कोरस : विश्वास वसेकर

## अरूणा ढेरे

---

शब्दांचं जग फार फसवं आहे. या जगात पाऊल टाकण्यापूर्वी प्रत्येकाला अंतर्बाह्य शुद्धतेचं अग्निदिव्य करावं लागतं. इथे हजारो चकवे आहेत. भूलभुलैया आहेत. त्यावर पावलं टाकत चाचपडताना ठेचकाळतानाही नितांत विश्वासाचा जप करावा लागतो. जे जे अनुभवाला येईल ते ते स्वच्छ न्याहाळणारे पाखराचे डोळे लागतात. कमळासारखं ते फुलून येईपर्यंत वाट पाहणारं, तरीही कोवळं हृदय लागतं आणि त्याला निखाऱ्यासारखं पेलणारे धीट तळहात लागतात.

भोवताली, रोज नव्यानं दृष्टीला पडणारी मराठी कविता पाहिली तर आपल्या माध्यमाचा असा जाणीवपूर्वक विचार करणारे, त्यावर विश्वास ठेवणारे आणि उत्कट प्रेम करणारे फार थोडे आढळतात. त्यामुळे कृतक कवितेचं प्रमाण वेगानं वाढतं आहे असं दिसतं. कोणत्याही काळात श्रेष्ठ, स्वयंभू साहित्याबरोबरच सामान्य, सवंग आणि कृत्रिम निर्मितीही होत राहतेच. पण तिचं प्रमाण ज्या गतीनं वाढतं आहे, ती गती लक्षात घेतली म्हणजे कवितेच्या लहानशा जिवाची परवड लक्षात येते.

गेल्या दहा-बारा वर्षांत मराठी साहित्यात ज्या कवितेनं आपलं स्थान पक्कं केलं ती जीवनाला घट्ट बिलगलेली, जीवनाचा पदरन् पदर सुटा करू पाहणारी, त्यातली सारी भयंकर वास्तवता पेलू पाहणारी कविता आहे. दलित कवितेनं त्यात जिवंत, जोमदार असा नवा आवाज मिसळला. कलामूल्यांचं एकलक्षी भान न ठेवता आपल्या जाणिवेच्या केंद्रातून मनःपूत उफाळणारी, क्वचित एकाच कक्षेत फिरत राहिलेली ही कविता अगदी वेगळी ठरली तरी तिच्या मर्यादांचं आणि सामर्थ्यांचं भान नसणाऱ्या अनुभवाला एका आक्रस्ताळ्या आक्रोशी साच्यातून बाहेर काढणाऱ्या कवितेनेही लगेच जन्म घेतला.

दलित कवितेखेरीजच्या मराठी कवितेतही अस्तित्वासंबंधीच्या प्रश्नांपासून असंख्य भयद प्रश्नांना धीटपणे भिडणाऱ्या भेदक कवितेबरोबरच खोटे प्रश्न, खोटी दुःखं आणि खोटेच सामाजिक भान व्यक्त करणाऱ्या अनंत कवितांचा जन्म होत राहिला. या अपुऱ्या बळाच्या अनभ्यस्त कवितेनं कवितेचं फार मोठं क्षेत्र व्यापून टाकलं. अवघडपणातला जोरही त्यांच्यात नाही, नैसर्गिक जिवंततेचा तजेलाही नाही अशी स्थिती झाली. यातून वाट काढणाऱ्या आजच्या प्रत्येक कवीला फसवणुकीच्या फार मोठ्या चकव्यातून बाहेर पडावं लागतं यात शंका नाही.



अनुक्रमणिका

आपली वाट अशी स्वतंत्रपणे शोधणाऱ्या कवींपैकी वसेकर एक आहेत. त्यांनी आपली नाव आपल्या बळावर अलग वल्हवलेली दिसते म्हणून त्यांच्या ओठावरचं समूहगाणंही खास त्यांच्या आवाजातलं आहे. त्यात त्यांच्या जगण्यातल्या प्रामाणिक-पणाचं भान व्यक्त झालं आहे.

असं भान असणारा प्रत्येक माणूस वैयक्तिकता आणि सामाजिकता, यांमधल्या ताण्याबाण्यांचा सतत शोध घेताना दिसतो. व्यक्तिजीवनातली स्वयंप्रेरितता आणि तिच्यावर येणारे विविध दाब-दबाव, सामाजिक गतीचे व्यक्तीशी असणारे नाते आणि त्यातून जगाला मिळालेला आकार यांचा हा शोध असतो.

असा शोध घेणारी कविता आपल्या सामर्थ्याइतकंच मर्यादांचं भानही स्पष्टपणे घडवते. वैशिष्ट्यांबरोबरच दोषांना उघडपणे मिरवते. कधी कधी मर्यादा फार मोठ्याही असतात. पण तरीही अशा कवितेचा समूहापेक्षा वेगळा आवाज, तो जपण्याची धडपड आणि प्रामाणिकपणा यांची नोंद घेतलीच पाहिजे.

कवितांचे साचे आपण फार लवकर करतो आणि प्रेमाची कविता, नैराश्याची कविता, शोषणाची कविता अशा तऱ्हेचे शिक्के मारून त्या त्या साच्यात एखाद्याची कविता बसवून टाकण्याचा मोहही आपल्याला होतो पण हेही खरं की स्वयंस्फूर्तांची वाट चोखाळून आपला भलाबुरा मार्ग जिद्दीनं शोधणाऱ्या प्रत्येक कवितेचा विचार आपल्याला वेगळाच करावा लागतो. एखाद्या साच्यात तिला नुसते टाकून चालत नाही. आणि अ = ब, ब = क म्हणून अ = क अशी समीकरणं मांडूनही मोकळं होता येत नाही. तिला तुम्ही चांगल्या वाईटाच्या, श्रेष्ठ कनिष्ठपणाच्या कोणत्याही पातळीवर नंतर बसवा, पण तसा विचार करण्याची अट मात्र ही कविता घालते.

ही प्रश्नांची कविता आहे. जीवनाशी असलेल्या नात्यांमधून जे सनातन प्रश्न माणसाला सतत सतावत आले आहेत, त्यांच्या वैयक्तिक अनुभवांचा, वर्तमान संदर्भातला पुनरुच्चार इथे आहे.

> नुकते जुळले धागे, हात आणि हातात
> असे कसे एकाएकी थंड पडत जातात ?

अशा वैयक्तिकातून उमललेल्या मूल्य संदर्भातल्या अनुभवापासून

> 'दिठीआड माणसे ही कुठे जात असतात ?
> आणि पुन्हा निर्विकार कशी जात असतात !'

अशा सामूहिक जीवनाच्या अनुभवापर्यंतचे हे प्रश्न आहेत. कधी 'माझी मलाच फक्त कळणार कहाणी' हे जाणवते तरी 'सारेच मला कळते, पण काय कळूनी ?' हा प्रश्न असतोच. कधी 'कधी पायांवरच सक्त नाराज होतो मी मग' असा प्रामाणिक राग

येतो पण, 'चालणे तर सक्तीचे आहे; थांबलो तर काय म्हणेल जग?' अशा प्रश्नाची धास्ती असते.

अर्थात हे प्रश्न जीवनावर चिडलेल्या, अगतिक संतापलेल्या माणसाने निराशेपोटी विचारलेले कडवट प्रश्न नाहीत आणि ही गोष्ट मला फार महत्त्वाची वाटते. तशा चिडलेल्या माणसाचे नकार जितके त्याच्यावरच्या अन्यायाला, अन्यायमूलक परंपरेला असतात तसेच नकळता, त्याला बळ देणाऱ्या अनेक गोष्टींना असतात. एका बेहोष-उद्रेकाच्या भरात नकारांची भूमिका जोपासताना हे त्याच्या लक्षात येत नाही. नकाराइतके ठाम बळ स्वतःतून उपजणाऱ्या होकारांमागे उभे केले जात नाही.

वसेकरांची कविता जीवनावर प्रेम करते. 'मनाच्या डोळ्यांनी' ते जेव्हा विश्वाकडे पाहतात तेव्हा 'कमी दाबाकडे धावणारे सघन मान्सून' त्यांना आईच्या डोळ्यांत ओथंबलेले दिसतात. रसरसल्या सृजनाला जाग येते असे दिवस उलटून जातात. पण जीवनाविषयीची प्रचंड आसक्ती असंख्य पडझडीतूनही टिकून राहते. आत्म-श्लाघेपासून आत्महत्येपर्यंत प्रवास घडतो, दुभंगण्याचे, बरबादीचे क्षण येतात पण स्वतःसाठी अनोळखी, नवा होत हा कवी बचावतो. तडपत राहतो. पण प्रेमही करत राहतो. 'दुःखालाही सांभाळण्यास आयुष्याच्या संदर्भात अर्थ आहे!' असं दोस्तांना सांगत जातो.

जीवनावर असं प्रेम आहे म्हणून वसेकरांना माणूस प्रेमाचा वाटतो. 'माझ्या कवितेनं फक्त माणूस निवडला.' असं ते म्हणतातही, अन् त्याच माणसाच्या दुरावल्या चेहऱ्याची खंत बाळगतात.

'कधी थांबणार आहे हे चेहऱ्यांचे निखळणे?'

कधी भेटणार आहेत माणसं समोरासमोर? ही जिव्हाळ प्रश्नावली त्यातून उगवते. 'लहान मुलाच्या जिज्ञासेने, डोळ्यांना ताण देऊन माणसांचे चेहरे त्याच आत्मीयतेतून वाचले जातात आणि त्यांच्या जीवनाचे गूढगर्भ लिपीतले मानभावी सूत्र सापडत नाही याबद्दल त्याच प्रेमापोटी तळमळ वाटते.

प्रेयसीचं माणूस म्हणून असतेपण वसेकरांना अधिक भावतं. प्रेमाचा सर्वनाशी बेहोषपणा किंवा जीवनसमृद्धीला कारण होणारा उत्कट आवेग यांपेक्षाही परस्पर समजुतीची त्यातली शांत जाणीवच इथे प्रकर्षाने दिसते. प्रेमभंगानं उरी फुटून रडणारा प्रियकर इथे नाही तर त्या दुःखाचा एक सोशिक अन्वयार्थ लावणारा प्रियकर आहे. 'स्वप्नांच्या उरसात खांद्याला खांदा भिडवून जगल्यानंतर' आणि 'कवितेचे ऋतू तिच्याच चेहऱ्यावरून सरकत गेल्यानंतरही' दुरावल्याची कळ संयमानं सोसणारा हा प्रेमिक 'जेव्हा काळोखाचे वासे मोजावेत असं वाटावं, वाटूही नये. आपण फक्त आषाढमेघांपाशी हलकं व्हावं', असं म्हणतो तेव्हाच त्यांच्या प्रेम-कवितेची समजुतदार जातकुळी समजून जाते. प्रेमाच्या रंगोत्सवातही तिची मिठी अशी

असावी की कविता लिहिण्याइतकं अंतर बाकी उरावं, असं मानणारा आणि वाऱ्याचे रंग बदलले तरी तोल ढळू न देण्याविषयी तिला बजावणारा हा प्रेमिक आहे. यातल्या काही सुंदर कविता आठवतात पुनः पुन्हा. पण त्या विषयी काही बोलू नये. त्या वाचताना त्यातलं सुंदर स्वयंपूर्णत्व जाणवतं. पण काही फसलेल्या कवितांविषयी बोललंच पाहिजे. काही गझलांबाबत आणि काही बांधीव कवितांबाबत हे विशेषत्वानं जाणवतं की रचनेचा बांध एकदा स्वीकारल्यावर त्यातली अचूकता जर कवीनं सांभाळली नाही तर आस्वादाचं पाऊल वारंवार ठेचकाळतं. त्यातून अनुभवाची अंतर्गत लय नसली तर मग हे बाह्य लयीचं ठेचकाळणं फार बोचतं. काही सांकेतिक उपमाकल्पनांमधे कवी अजून सापडतोच आहेसं वाटतं. काही वैज्ञानिक उपमा अट्टाहासानं आणल्याची किंचित जाणीव होते.

वसेकरांचं आपल्या माध्यमावर प्रेम आहे. ' शब्द माती असतात तेव्हा ते मूर्तिकारही असतात ' हेही त्यांना माहीत आहे. त्यांची उद्याची कविता हे दोष टाळणारी असेल याची खात्री देणारे आविष्कार या संग्रहात आहेत आणि रात्रीच्या चिंतनाने दिवसाच्या कविता उंचावून येण्याचा अनुभव त्यांना आहे. तेव्हा इतरांच्या कहाण्यांशी ताडून पाहात ते आपली जी कहाणी सांगताहेत, त्या कहाणीची तालबद्धता अनुभव आणि आविष्कारातून अधिकाधिक मर्मस्पर्शी होत प्रत्ययाला येवो, हीच सदिच्छा !

●

---

## साभार स्वीकार / कविता

१. **गौरवांजली** : अनंतराव जगताप; उषा ज्योती प्रकाशन, औरंगाबाद; १९८१; रु. १२

२. **गीतज्ञानदेव** : वसंत रा. अत्रे; सौ. कुसुम अत्रे, पुणे ९; १९८१; रु. ३

३. **दिशांची पावले** : अनिल द्रविड; वाल्मीक प्रकाशन, मुंबई; १८१९; रु. १२

४. **देवदूत** : सुधाकर गायधनी; श्रावणजी गायधनी, खापा; जि. नागपूर; १९८२; रु. १५

५. **क्षितिजा** : मधु जामकर; अंबेकर प्रकाशन, नांदेड; १९८१; रु. १०.

६. **संदर्भाच्या शोधात** : सदानंद मोरे; पैस प्रकाशन, अहमदनगर; १९८१; रु. ६

७. **दिगंत** : अनुराधा पाटील; कुशा प्रकाशन, औरंगाबाद; १९८१; रु. १८

अनुक्रमणिका

# आचार्य काकासाहेब कालेलकर यांची साहित्यसेवा

**श्रीपाद जोशी**

---

आचार्य दत्तात्रेय बाळकृष्ण उर्फ काका कालेलकर हे मूळचे बेळगाव जवळच्या बेळगुंदी गावचे. ( जन्म १ डिसेंबर १९८५ ) त्यांचे शिक्षण बेळगाव व पुणे येथे झाले. परंतु काही काळ महाराष्ट्रात कामे केल्यावर ते गांधीजींच्या साबरमती आश्रमात गेले; आणि गुजरातचेच होऊन गेले. त्यांना दीर्घायुष्य लाभले. वयाच्या ९६ व्या वर्षी २१ ऑगस्ट १९८१ रोजी त्यांचे निधन झाले. आपल्या या दीर्घ जीवनात त्यांनी केलेली प्रचंड साहित्यनिर्मिती गुजराती वाचकांच्या स्मरणात दीर्घकाळ राहील. गुजराती साहित्याच्या इतिहासात त्यांनी आपल्या नावाचे एक कालेलकर युगच निर्माण करून ठेवले आहे.

महाराष्ट्रापासून दूर राहिल्याने आणि मराठीत अत्यल्प साहित्यनिर्मिती केल्याने मराठी-भाषी असूनही काकासाहेब मराठीला व महाराष्ट्राला तसे परकेच राहिले. १९३२ साली बेळगावजवळच्या हिंडलगा तुरुंगात असताना काकासाहेबांनी ' खेडेगावातील काही प्रश्न, आश्रमगत शिक्षणाची पद्धती, परलोकाविषयीच्या कल्पना, वर्णव्यवस्थेचा पुनरुद्धार, गीताचर्चा, आजची उपासना वगैरे कित्येक विषयांवर सुचलेले विचार ' श्री पुंडलीकजी कातगडे यांच्या मदतीने लिहून काढले. ते १९३४ साली प्रसिद्ध झाले. ( सुमारे ३००० पृष्ठांच्या या पुस्तकाची किंमत होती फक्त ९ आणे )

या पुस्तकाला कर्नाटक सिंह श्री गंगाधरराव देशपांडे यांची छोटीशी प्रस्तावना आहे. तिच्यात ते काकासाहेबांसंबंधी लिहितात, " काकासाहेब कालेलकर यांची माहिती वर्तमानपत्रांवरून महाराष्ट्राला बरीच असली तरी त्यांच्या विचारांची, विचार करण्याच्या पद्धतीची, खोल दृष्टीची आणि तत्त्वनिष्ठेची ओळख महाराष्ट्रातील कार्यकर्त्यांना पुरेशी नाही. ही ओळख त्यांना व्हावी, अशी माझी फार इच्छा आहे; आणि ती करून देण्यास या पुस्तकाचा चांगला उपयोग होईल असे वाटते. काकासाहेब हे महात्माजींच्या अत्यंत विश्वासातले आहेत. आज पंधरा सोळा वर्षे ते महात्माजींच्या सहवासात राहात असून महात्माजींच्या अनेक राष्ट्रव्यापी प्रवृत्तींमध्ये ते प्रामुख्याने व एक जबाबदार कार्यकर्ते या नात्याने भाग घेत असतात. ते गुजरात विद्यापीठाचे आचार्य (कुलपती) होते. महात्माजींच्या ' नवजीवन ' पत्रामध्ये ते नेहमी लिहित असत. एवढेच नव्हे तर त्या पत्राचे ते संपादकही होते. अनेक राष्ट्रीय आंदोलनांमध्ये त्यांना अनेक वेळा

अनुक्रमणिका

कारागृहवासही भोगावा लागला आहे. आणि अमुक प्रसंगी महात्माजींनी अमुक विषयावर काय अभिप्राय दिला असता, अथवा तो तसा का दिला असता हे अचूक सांगू शकणाऱ्या काही थोड्या लोकांमध्ये काकासाहेबांची गणना प्रामुख्याने केली जाते, इतकीच त्यांची माहिती महाराष्ट्राला आहे... गेल्या पंधरा वर्षांमध्ये गुजरात प्रांतामध्ये जे नवचैतन्य उत्पन्न झाले आहे, राजकारणाचे व समाजकारणाचे शुद्धीकरण होऊन त्यातील उत्कटता जी वृद्धिंगत झाली आहे, आणि या गोष्टी घडवून आणण्यामध्ये काकासाहेबांनी प्रामुख्याने भाग घेऊन जे परिश्रम केले आहेत त्यांचा विचार ज्या ज्या वेळी माझ्या मनात येतो त्या-त्या वेळी महाराष्ट्राचा व काकासाहेबांचा परिचय व सहवास खूप वाढला पाहिजे. असे मला मनःपूर्वक वाटते."

श्री गंगाधररावांची ही इच्छा कधीच पूर्ण झाली नाही. काकासाहेब हे शेवटपर्यंत गुजरातचे गांधीवादी विचारवंत व गुजरातीचे साहित्यसेवक म्हणूनच लोकांसमोर राहिले. संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्याच्या वेळीही ते गुजरातचेच प्रतिनिधी समजले गेले. आणि गोमंतकाच्या आंदोलनास ते कोकणीवाद्यांच्या बाजूनेच राहिले. यामुळे महाराष्ट्राशी त्यांचे जवळचे नाते निर्माण होऊ शकले नाही. १९४५ च्या सुमारास सर्वश्री प्रभाकर पाध्ये. श्री. पु. भागवत, वा. रा. ढवळे वगैरे मुंबईच्या मराठी साहित्यिकांनी काकासाहेबांना मराठी साहित्यात प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करून पाहिला परंतु त्यांनाही त्यात फारसे यश आले नाही.

## गांधीवादाचे प्रवक्ते

असे का घडले ? मला वाटते, गांधी आणि गांधीवाद यांचे प्रवक्ते म्हणून काकासाहेबांचे गुजरातेत जे स्थान होते ते त्यांना महाराष्ट्रात मिळू शकले नाही. आचार्य शंकरराव जावडेकर, आचार्य स. ज. भागवत, शंकरराव देव वगैरे मराठी मंडळींनाच महाराष्ट्रातील लोकांनी गांधीवादाचे खरे प्रवक्ते मानले. आचार्य विनोबा भावे, जावडेकर व भागवत यांनी आपापल्या परींनी गांधीवादाच्या विचारांत जी मौलिक भर घातली तशी काकासाहेबांनी न घातल्यामुळेच तसे घडले असावे. याचेही कारण समजून घेतले पाहिजे. काकासाहेब हे खऱ्या अर्थाने विचारवंत किंवा बुद्धिवंत नव्हते. ते रसिक साहित्यिकच होते. त्या अर्थाने ते गांधींचे नव्हे तर विश्वकवी रवींद्रनाथ टागोरांचेच अनुयायी होते. गांधीजींच्या सहवासात राहिल्यामुळे त्यांच्या विचारांवर गांधीवादाचा पगडा अवश्य राहिला. परंतु त्यांचे मन रवींद्रनाथांच्या मार्गाकडेच पुनः पुन्हा धाव घेत राहिले. 'रवींद्र प्रतिभेचे कोवळे किरण,' 'मालंच,' 'रवींद्र मनन,' 'रवींद्र वीणा,' रवींद्र झंकार' यांसारखी रवींद्रनाथांच्या साहित्याचा आस्वाद घेणारी जी पुस्तके त्यांनी मराठीत लिहिली त्यावरून रवींद्रनाथांकडील त्यांचा ओढा स्पष्ट दिसून येतो. रवींद्रनाथांप्रमाणे तेही आनंदयात्रीच होते. महाराष्ट्रापासून शरीराने व

मनाने दूर राहिल्यामुळे त्यांच्या या पुस्तकांचे महाराष्ट्रात फारसे स्वागत झाले नाही. परंतु जीवनाकडे रसिकतेने पाहण्याचा रवींद्रनाथांचा दृष्टिकोण मराठी वाचकांना समजावून देण्याचा जो प्रयत्न त्यांनी केला त्याचे महत्त्व त्यामुळे कमी होत नाही. आचार्य भागवत हेही रवींद्रनाथांचे भक्त होते. परंतु त्यांचा भर रवींद्रनाथांच्या तत्त्वज्ञानावर अधिक होता. काकासाहेबांना रवींद्रनाथांची आनंदमयी काव्यदृष्टी अधिक आकृष्ट करणारी ठरली.

## काही गाजलेली पुस्तके

काकासाहेबांनी सुमारे शंभराहून अधिक पुस्तके गुजराती, मराठी व हिंदी या तीन भाषांत लिहिली. त्यांपैकी त्यांची गाजलेली व अत्यंत लोकप्रिय ठरलेली पुस्तके गुजरातीची होती. ' स्मरण यात्रा ' ' हिमालयातील प्रवास ', ' उत्तरेकडील भिंती ', ' लोकमाता ', ' जीवनातील आनंद ', ही त्यांपैकी काही पुस्तकांची नावे. या सर्व पुस्तकांमध्ये त्यांनी स्वतःसंबंधीच वेगवेगळ्या पैलूंतून लिहिले आहे, हे त्यांचे वैशिष्ट्य लक्षात घेण्यासारखे आहे. ' स्मरण यात्रा ' ही काकासाहेबांची आत्मकथा तिच्यातील निरागस भाबडेपणामुळे अत्यंत लोकप्रिय झाली. तिच्यात मुख्यतः त्यांच्या लहानपणाच्याच आठवणी आहेत. जुना काळ व जुनी माणसे यांच्याशी अगदी समरस होऊन काकासाहेबांनी लिहिले आहे. अशीच समरसता ' लोकमाता ' या पुस्तकात पाहावयास मिळते. भारतातील नद्यांचे असे काव्यपूर्ण वर्णन त्यापूर्वी कुणीच केले नव्हते. ' हिमालयातील प्रवास ' हे काकासाहेबांनी साधुवेशात केलेल्या हिमालयातील यात्रेचे मोठे मोहक वर्णन आहे. त्यात त्यांच्यातील चिंतकाचाही आढळ अधूनमधून होतो. परंतु त्यांच्या त्या जीवन-चिंतनाने त्यांचे विवेचन क्लिष्ट अथवा बोजड होत नाही. काकासाहेबांनी देशात व परदेशात खूप भ्रमण केले आणि त्यासंबंधी भरपूर लिखाणही केले. ते मुख्यतः गुजरातीत असले तरी ते हिंदीत व मराठीतही अनुवाद रूपाने आले आहे. पाटण्याच्या बिहार राष्ट्रभाषा परिषदेने 'यात्रा का आनंद' हा सुमारे साडेतीनशे पृष्ठांचा देखणा ग्रंथ प्रकाशित केला आहे. हे पुस्तक मला भेट म्हणून देताना काकासाहेबांनी त्यावर स्वतःच्या हस्ताक्षरात लिहिले होते, " माझ्या साहित्याशी तुमचा परिचय अनेक प्रकारचा आहे. रसिक वाचक म्हणून, अनुवादक म्हणून, संस्कारी विवेचक म्हणून तुम्ही माझ्या विविध साहित्याशी आपला संबंध कायम ठेवला आहेच. कित्येक लेख तुमच्या हाती मी लिहविलेही आहेत. आणि आता तुम्ही स्वतःची प्रवास वर्णने लिहून व संस्मरणे टिपून ठेवून समानधर्मीही झाला आहात. तेव्हा माझ्या या ' यात्राका आनंदा 'चे अधिकारी झाला आहात. हा सर्वार्थाने तुमचा होवो व तुमच्या मार्फत इतरांनाही मुबलक मिळो." मला प्रवासाची व प्रवास वर्णनाची प्रेरणा काकासाहेबांकडून मिळाली. त्याबद्दलचे कौतुक काकासाहेबांच्या

या अभिप्रायातून व्यक्त होते.

गुजराती साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद, राज्यसभेवर राष्ट्रपतींकडून नियुक्ती, 'जीवन व्यवस्था' या गुजराती पुस्तकाला साहित्य अकादमीचे पारितोषिक, सरदार पटेल व गुजरात युनिव्हर्सिटी या विद्यापीठांकडून डी. लिट. ची उपाधी, साहित्य अकादमीची फेलोशिप वगैरे अनेक मानसन्मान काकासाहेबांना मिळाले. परंतु ते सारे काळाच्या ओघात विसरले गेले तरी काकासाहेबांची प्रवास वर्णने आणि आत्मपरिचयात्मक लिखाण गुजराती वाचकांना नेहमीच आकर्षित करीत राहील. गांधीजींच्या उदयानंतर गुजराती भाषेला एक नवे तेज आले. ते तेज अधिक मोहक करण्यात काकासाहेबांचा सिंहाचा वाटा आहे.

## लोकप्रियतेचे रहस्य

गुजरातमध्ये आजही काकासाहेब हे एक अत्यंत लोकप्रिय लेखक समजले जातात. नवसाहित्याच्या झंझावातातही त्यांच्या लोकप्रियतेची पणती टिकून आहे. याचे कारण असे की काकासाहेबांनी गुजराती वाचकांना सात्त्विक आनंदाचा एक नवा मार्ग मिळवून दिला. त्यांच्या ललित लिखाणात कसलाही भडकपणा नाही. गुजरातच्या सौम्यप्रकृती प्रजेला काकासाहेबांच्या लाघवी शैलीने मोहून टाकले. लहान लहान गोष्टींतून जीवनाचा आनंद कसा मिळविता येतो ते काकासाहेबांनी आपल्या वाचकांना शिकविले. 'उत्तरेकडील भिंती' या त्यांच्या छोटेखानी पुस्तकात तुरुंगातील कावळे, खारी, मुंग्या, आकाशातील तारे वगैरेंची मोठी खुसखुशीत वर्णने आहेत. वाचकाला आपल्याबरोबर खेचून नेण्याचे अद्‌भुत सामर्थ्य काकासाहेबांच्या लेखणीत असल्यामुळे ते वर्णन करीत असलेले प्रसंग आपण स्वतःच अनुभवतो, जगतो आहोत, असे वाचकाला वाटते. त्यामुळे काकासाहेब हे आपले खास प्रिय लेखक आहेत, अशी भावना वाचकामध्ये निर्माण होते. नदी, समुद्र, तलाव, मैदान, वाळवंट, डोंगर, आकाश या सर्वांशीच काकासाहेब तादात्म्य अनुभवतात, आणि आपला तो अनुभव वाचकाच्या अंतःकरणापर्यंत नेऊन भिडविण्यात यशस्वी होतात. कथा, नाटक, कादंबरी यांसारख्या रूढ ललित साहित्य प्रकारांचा अवलंब काकासाहेबांनी केला. परंतु आपल्या आत्मकथनपर लिखाणात व प्रवास वर्णनात त्यांनी या रूढ ललित साहित्य-प्रकारांचा प्रभाव निर्माण केला. त्यामुळे त्यांचे लिखाण वाचताना एखादी कादंबरीच आपण वाचत आहोत, असे वाचकाला वाटते. गांधीजींच्या ज्या आठवणी त्यांनी 'बापूजींची ओझरती दर्शने' या पुस्तकात सांगितल्या आहेत त्यातून गांधीजींच्या जीवनावर अधिक प्रकाश पडण्यास मदत होणार आहे. 'परमसखा मृत्यू' हा काकासाहेबांचा लेखसंग्रह असाच वैशिष्ट्यपूर्ण आहे. मृत्यूसंबंधी परंपरागत विषादपूर्ण विचार मनात न आणता त्याच्याविषयीची सख्य भावनाच त्यांनी खुबीदारपणे मांडली आहे.

त्यांचे ते विचार वाचल्यावर मृत्यूविषयी भीती वाटण्याऐवजी तो आपला मित्रच आहे, अशी भावना वाचकाच्या मनात निर्माण होते.

सारांश, जीवनाकडे खेळकरपणे पाहाण्याची व त्याचबरोबर समाजाशी असणाऱ्या आपल्या बांधिलकीचा विसर न पडू देण्याची जी किमया काकासाहेबांना साधली होती तीतच त्यांच्या लोकप्रियतेचे रहस्य दडलेले आहे, असे म्हणता येईल. मात्र मराठीने आपली योग्य ती कदर न केल्याची खंत काकासाहेबांच्या बोलण्यातून कधी कधी व्यक्त होई. त्या ना-कदरीची कारणे त्यांनी समजून घेतली असती तर त्यांचा विषाद थोडा कमी झाला असता, असा विचार मनात येऊन जातो. अर्थात गुजराती हीही आपलीच भाषा आहे. तिची सेवा करण्याची संधी एका मराठीच्या सुपुत्राला लाभली, ही काय कमी गौरवाची गोष्ट आहे?

●

---

## नवे आजीव सभासद

### पुणे

(१) देवी अप्पु नायर (२) शिल्पा पाथरकर (३) अनिल मोगलगिद्दीकर (४) आसावरी गुळवणी (५) सीता कुलकर्णी (६) अभय खानापुरे (७) शंकर य. प्रधान (८) दिगंबर य. लेले (९) किशोर ग. कर्वे (१०) भालचंद्र लेंभे (११) माणिक साने (१२) सौ. विमल पटवर्धन (१३) चैत्री देशपांडे

### इतर

(१) वि. पां. देऊळगावर (गुलबर्गा) (२) मालती गाडगीळ (ठाणे) (३) मंजिरी केळकर (ठाणे) (४) नरहर (दाजी) पणशीकर (ठाणे) (५) अमन तांबोळी (गोंदवले बु. ॥) (६) मा. गों. पवार (धुळे) (७) जी. एस्. कुंभोजकर (सातारा) (८) लीलाबाई जोशी (ठाणे) (९) चं. र. देशपांडे (धुळे) (१०) पंढरीनाथ मांडवगणे (अकोला) (११) राजा राजवाडे (मुंबई) (१२) फा. हिलरी फर्नांडिस (वसई) (१३) पंढरीनाथ कुलकर्णी (महाबळेश्वर) (१४) काळू कृष्णा सोनार (धुळे) (१५) रघुनाथ बा. फाटक (मुंबई) (१६) म. ना लोही (नागपूर) (१७) सुनील सुभेदार (नागपूर) (१८) अर्चना ढेकणे (सातारा) (१९) चिं. रा. वेलणकर (सातारा) (२०) वसंत गुर्णन (मुंबई) (२१) आनंद द. डोळे (ठाणे)

# कन्नड कवितेचा अजान वृक्ष

## अ. रा. तोरो

महाकवी द. रा. बेंद्रे यांच्या निधनाने आधुनिक कन्नड कवितेच्या इतिहासातील एक युग समाप्त झाले. १९२० साली त्यांच्या काव्यलेखनाला प्रारंभ झाला तेव्हापासून गेल्या ५०–६० वर्षांत कन्नड कवितेत जे जे नवे प्रयोग झाले व जे नवे कवी उदयाला आले. त्या सर्वांवर बेंद्रे यांच्याच कवितेचा कमी-अधिक प्रभाव उमटला आहे. डॉ. व्ही. के. गोकाक, श्री. गोपालकृष्ण अडिग हे कन्नड नवकाव्याचे प्रवर्तक. पण त्यांनीही आपल्यावरील बेंद्रे यांच्या प्रभावाचा मुक्तकंठाने गौरव केला आहे. बेंद्रे यांच्या कवितेची लोकप्रियता तर मन स्तिमित करते. समाजाच्या सर्व थरांत मुक्तकंठाने त्यांची कविता गायिली जाते. " कुणियोणु बार " ( नाचू या ये ) "इन्नू याक बरलिल्लव्वा" ( अजून का नाही आला ), " हक्कि हारुतिदे नोदिदिरा " ( पक्षी उडतो आहे. पाहिलंत का ? ) यांसारख्या त्यांच्या अत्यंत लोकप्रिय कविता तर कन्नड भाषेची सार्वजनिक मालमत्ताच ठरली आहे. गुणाने श्रेष्ठ असूनही लोकप्रियतेचे वरदान लाभलेल्या भाग्यवंत कवींत म्हणूनच बेंद्रे यांची गणना करावी लागते.

### पुण्यात अध्ययन

बेंद्रे यांचा जन्म १८९६ साली धारवाडला झाला. मातृभाषा मराठी. पण शालेय शिक्षण कानडीतून झाले. मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर ते उच्चशिक्षणासाठी पुण्याच्या फर्ग्युसन महाविद्यालयात दाखल झाले. १९१३ ते १८ या कालखंडात पुण्यातील राजकीय व सामाजिक विचारांनी त्यांच्या मनावर विलक्षण परिणाम केला. टिळक, आगरकर, अरविंद, टागोर, केशवसुत, गोविंदाग्रज, इमर्सन, खलिल जिब्रान इत्यादी प्रज्ञावंतांचा परिचय आपल्याला याच काळात कसा घडला याचा सगळा तपशील स्वतः बेंद्रे यांनी आपल्या आत्मनिवेदनात सांगून ठेवला आहे. अरविंद घोष यांच्या ' आर्य ' मासिकातून प्रसिद्ध होणारी गीतेवरील लेखमाला व लोकमान्यांच्या गीतारहस्याने तरुण बेंद्रे यांच्या मनात परमार्थ विचारांचे खोलवर बीजारोपण केले. ज्ञानेश्वरी व दासबोध या मराठी संतकाव्यांचा परचयही याच काळात त्यांना झाला. द. वा. पोतदार, नाना खाडिलकर, बाबुराव भिडे, इंटरनॅशनलचे विठ्ठलराव दीक्षित शीनप्पा जोग हे त्यावेळचे बेंद्रे यांचे सहकारी मित्र होत. ' शारदा मंडळ ' या नावाचे या मंडळींनी एक वाङ्मय मंडळ चालविले होते. या मंडळाच्या बैठकीतून काव्य-

वाचनाचे कार्यक्रम होत. अशाच एका बैठकीत बेंद्रे यांनी आपली पहिली कन्नड कविता वाचून दाखविली. कवितेचे नाव होते, 'तुतारी'. दुर्दैवाने आज मात्र ही कविता उपलब्ध नाही.

## गेळेयर गुंपू ( मित्रमंडळ )

१९१८ साली बी. ए. होऊन बेंद्रे धारवाडला परतले. तेथे त्यांनी 'गेळेयर गुंपु' या नावाचे एक कविमित्रमंडळ स्थापन केले. अर्वाचीन कन्नड कवितेच्या इतिहासात या मंडळाने ऐतिहासिक मोलाचे काम केले आहे. या मंडळाच्या सभासदांत आपल्या पुढील आयुष्यात ज्यांनी मोठा लौकिक मिळविला असे अनेक साहित्यिक त्यावेळी होते. उदाहरणार्थ डॉ. व्ही. के. गोकाक ( कन्नड नवकाव्याचे प्रवर्तक ), डॉ. मुगळी ( कन्नड वाङ्मयाचे इतिहासकार ), शं. बा. जोशी ( प्रसिद्ध इतिहास संशोधक व यंदाच्या कन्नड साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष), मधुरचेन्न अरविंदाश्रमाचे प्रमुख प्रचारक आनंदकंद, श्रीधर खानोलकर इत्यादी त्या मंडळाचे सभासद होते. अर्थात बेंद्रे ही या मंडळाची प्रेरक शक्ती होती. याच सुमारास म्हणजे १९२० साली कन्नड साहित्यात विशेषतः कवितेत नवे प्रयोग सुरू झाले. इंग्रजी साहित्यातील रोमँटिक प्रवृत्तीने प्रभावित झालेली नवी पिढी उदयाला येत होती. मराठी साहित्यात १८८५ साली जे घडले तशीच स्थिती यावेळी कन्नड साहित्यात होती. मैसूरचे इंग्रजी प्राध्यापक श्री. बी. एम्. श्रीकंठय्या यांनी इंग्रजी कवितांचा अनुवाद प्रसिद्ध केला. मंगळूरचे श्री. पंजे मंगेशराव नवे विषय पण जुन्या रचनेत मांडू लागले होते आणि याच सुमारास बेंद्रे यांची नवी कविता कन्नड मातीचे अस्सल रंगरूप घेऊन प्रगट होऊ लागली. हाच कन्नड कवितेच्या अर्वाचीन युगाचा प्रारंभ होय. यापूर्वीची कन्नड कविता वृत्त–मात्रांनी जखडलेली व परमार्थ विचारांनी साकळलेली होती. पण बेंद्रे यांच्या नव्या कवितेने नवे लौकिक विषय दिले. लोकभाषेतून लोकभावना प्रगट होऊ लागली. १९२२ ला बेंद्रे यांचा "कृष्णकुमारी" हा पहिला काव्यसंग्रह प्रकाशित झाला. जुनी कात टाकून कन्नड कविता नवे रूप धारण करीत होती. बेंद्रे या काळात एका राष्ट्रीय शाळेत शिक्षक म्हणूनही काम करीत होते. शिवाय 'जय कर्नाटक' या नियतकालिकेचे ते संपादकही होते. त्यामुळे त्यांच्या या काळातील काही कवितांवर राष्ट्रीय चळवळीचे व स्वातंत्र्यप्रेमाचे प्रतिबिंब उमटले आहे. त्यांची "मुव्वत्तु मुरु कोटि" ( तेहतीस कोटि ) ही प्रसिद्ध देशभक्तीपर कविता त्या काळात कर्नाटकात अत्यंत लोकप्रिय झाली होती. ३३ कोटी पुत्र असताना भारत मातेची अशी दैन्यावस्था का ? या प्रश्नाने त्यांची कविता लोकांची मने जागवीत होती. 'गरी' ( पिसे ) हा बेंद्रे यांचा दुसरा काव्यसंग्रह. या संग्रहातील प्रेम-कवितांनी बेंद्रे यांची कवि म्हणून प्रतिमा अधिकच उजळली. त्यांची 'नरबली' नावाची एक कविता ब्रिटिश राज्य-

कर्त्यांच्या रोषाला बळी पडली. आणि त्यामुळे बेंद्रे यांना नऊ महिन्यांचा कारावासही भोगावा लागला.

## साहित्य संमेलनाचे अध्यक्ष

१९३५ ते १९४४ हा बेंद्रे यांच्या आयुष्यातील मोठा कठीण काळ होता. एम. ए. होऊनही नोकरी नसल्याने पोटासाठी त्यांनी अनेक ठिकाणी भटकंती करावी लागली. मारुती व्यंकटेश अय्यंगार यांनी बेंद्रे यांच्यासाठी 'जीवन' नावाचे मासिक सुरू केले. त्या मासिकाचे संपादक म्हणून बेंद्रे यांनी केलेले कार्य ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचे ठरले. बेंद्रे यांच्या अनेक उत्तमोत्तम कविता या काळात प्रकाशित झाल्या. त्यांचे 'सखीगीत' हे सर्वात लोकप्रिय खंडकाव्य याच काळातले. 'उय्याले' (हिंदोळा) 'नांदलीले' हे त्यांचे लोकप्रिय काव्यसंग्रह त्यानंतर पाठोपाठ प्रकाशित झाले. जनसामान्यांच्या हृदयाला स्पर्श करील अशी भावगीते बेंद्रे यांनी या काळात लिहिली. १९४३ साली शिमोगा येथे भरलेल्या साहित्यसंमेलनासाठी त्यांची अध्यक्ष म्हणून निवड झाली. त्यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात यावेळी साहित्याच्या विराट स्वरूपाचे तात्त्विक विवेचन केले आहे.

"रस म्हणजे जनन
विरस म्हणजे मरण
व समरस म्हणजे जीवन"

हा आपला सिद्धांत त्यांनी स्पष्ट केला. आपल्या अध्यक्षीय भाषणाच्या शेवटी त्यांनी आपली प्रसिद्ध 'गंगावतरण' ही कविता म्हणून दाखविली. ही कविता वाचताना मराठीतील तांबे यांच्या 'रुद्रास आवाहन' या कवितेची आठवण होते

१९४४ साली सोलापूरच्या दयानंद महाविद्यालयात कन्नड प्राध्यापक म्हणून बेंद्रे यांची नियुक्ती झाली. १९५६ साली तेथून ते सेवानिवृत्त झाले. या १२ वर्षांच्या काळात बेंद्रे यांच्या जीवनाला थोडे स्थैर्य लाभले. या काळात त्यांचे "जीवनगीत" "गंगावतरण" "सूर्यपान" हे काव्य संग्रह प्रसिद्ध झाले. मराठी साहित्य आणि साहित्यिक यांच्याशी बेंद्रे यांचा संपर्क अधिकाधिक वाढत होता. या कालात त्यांनी मराठीतही अनेक कविता लिहिल्या. अनेक मराठी पुस्तकांना प्रस्तावना लिहिल्या मराठी संत साहित्यावर व्याख्याने दिली. कै. पु. मं. लाड यांच्या स्नेहामुळेच त्यांनी नागपूर आकाशवाणीवर विठ्ठल संप्रदायावर व्याख्याने दिली. 'अंबिकातनयदत्त' या टोपण नावाने बेंद्रे आपल्या कविता लिहीत. काव्यनामाने कविता लिहिण्याची ही परंपरा कन्नड कवितेत नवीन होती.

## मान सन्मान

१९५६ साली सेवानिवृत्तीनंतर बेंद्रे काही काळ धारवाडच्या आकाशवाणी केंद्रावर अधिकारी होते. त्यांचा ६० वा वाढदिवस म. म. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली मोठ्या थाटाने साजरा झाला. १९६९ साली " अरळु मरळु " या काव्यसंग्रहाला साहित्य अकादमीचे पारितोषिक मिळाले. याच वर्षी म्हैसूर विद्यापीठात त्यांनी मराठी साहित्यावर कानडीतून व्याख्याने दिली. पुढे पुस्तकरूपाने ती प्रसिद्धही झाली. १९६१ साली आकाशवाणीने दिल्ली येथे १ ले अखिल भारतीय कवी संमेलन भरविले होते. त्यांच्या अध्यक्षपदी बेंद्रे यांची निवड झाली होती. १९६५ साली त्यांनी मराठीत लिहिलेल्या " संवाद " या पुस्तकाला साहित्य सम्राट न. चि. केळकर पारितोषिक मिळाले होते.

१९६९ मध्ये भारत सरकारने त्यांना 'पद्मश्री' दिली. म्हैसूर विद्यापीठ व कर्नाटक विद्यापीठ यांनी त्यांना डी. लिट्. ची पदवी देऊन त्यांच्या साहित्यसेवेचा गौरव केला. १९६९ ला साहित्य अकादमीचे सन्माननीय सदस्यत्व त्यांना लाभले. १९७२ मध्ये, कर्नाटक राज्य सरकारने त्यांच्या दैनंदिन जीवनक्रमावर आधारलेली एक डॉक्युमेंटरी फिल्म काढली. आणि शेवटी त्यांच्या 'नाकुतंती' काव्यसंग्रहाला ज्ञानपीठ पारितोषिक मिळाले, तो त्यांच्या आजवरच्या मानसन्मानांचा कळस ठरला. साहित्यिकांच्या भाग्यलेखात असावे, ते–ते सारे भाग्य त्यांना प्राप्त झाले. पण त्या साऱ्या पसाऱ्यातही त्या साधुतुल्य महाकवीचे मन मात्र दशांगुळे वरच राहिले.

## विपुल साहित्य

बेंद्रे यांची आजवरची एकूण साहित्यसंपदा पाहिली की त्यांतील विविधता व विपुलता पाहून मन अवाक होते. २६ कथासंग्रह, ९ समीक्षा ग्रंथ, ४ नाटके, अनेक कथा ३ मराठी ग्रंथ, शिवाय कालिदासाचे मेघदूत, योगी अरविंदाचे 'Renaissance in India' आणि डॉ. रा. द. रानडे यांच्या 'The constructive survey of upnishadic philosophy' इत्यादी ग्रंथाचे कन्नड अनुवाद! ज्ञानेश्वरांपासून गोविंदाग्रजांपर्यंत आणि रवींद्रनाथांपासून ते कबीरापर्यंत सर्वश्रेष्ठ कवींच्या शेकडो कवितांना त्यांनी कन्नड भाषेचा सौंदर्यसाज चढविला आहे. शिवाय याहून दसपट तरी मोठे साहित्य बेंद्रे यांनी बोलून टाकले आहे, अशी खंत डॉ. गोकाक यांनी व्यक्त केली आहे.

## ज्ञानपीठ पारितोषिक

बेंद्रे यांच्या ज्या काव्यसंग्रहाला ज्ञानपीठ पारितोषिक मिळाले त्याचे स्वरूप प्रामुख्याने आध्यात्मिक वा पारमार्थिक आहे. विश्वाच्या मुळाशी असलेल्या चैतन्याचा

सनातन स्रोत बेंद्र्यांची प्रतिभा कुतूहलाने न्याहाळते आहे, असे या कवितांचे स्वरूप आहे. बेंद्रे नुसते कवी नाहीत, ते तत्त्वचिंतक आहेत. दार्शनिक आहेत. ब्रह्मपिपासू आहेत. डोळस आत्मवादी आहेत. आपल्या ज्ञानचक्षूंनी ब्रह्मांडाचा कोपरा न कोपरा धुंडाळावा, असा त्यांच्या मनाचा ध्यास आहे. हे सारे या 'चार तंतू' काव्यसंग्रहात पदोपदी जाणवते.' या दृष्टीने या संग्रहातील 'पुन्हा श्रावण आला' 'अणुमहत,' 'श्री विवेकानंद शिखरशीळा,' 'नी हृदय शेतकऱ्याचे गाणे,' 'चैतन्याची पूजा,' 'नादमधुर' अशा काही प्रमुख कवितांचा आवर्जून उल्लेख करता येईल. बेंद्र्यांची आत्मप्रेरणा अध्यात्माची असल्याने त्यांची कविता कधी कधी गहन गूढ अनाकलनीय स्वरूप धारण करते. पण अशा अपवादात्मक कविता वगळल्या तर त्यांच्या प्रतिभेचे नाते-' अतींद्रिये भोगवीन, इंद्रियांकरवी' अशी सार्थ प्रतिज्ञा करणाऱ्या संत कुळाशी आहे हे सहज ध्यानात येते.

## अरविंद तत्त्वज्ञान

भारतीय परंपरेचा नितांत अभिमान हा त्यांच्या कवितांचा स्थायीभाव आहे. एका कवितेत ते म्हणतात,

समरस आनंदाच्या अनंत कळा।
अभूत दृष्टीचा अपूर्व लळा।
कोण पुरविणार असे वेगळा।
ईश्वराविणा॥
ईश्वर ईशांची ही मैत्री।
पार्थिव दैहिकतेची धात्री।
भारतावीण इतर अपात्री।
कैसी अवतरे।'

अरविंद हे बेंद्र्यांचे उपास्य दैवत! म्हणूनच त्यांच्या कवितेला अभिजात, अक्षर व अविनाशी जीवनमूल्यांचा ध्यास लागला आहे. अरविंदाचा 'Life devine' वाचल्यावर आपल्याला काय वाटेल ते बेंद्रे यांनी एका मराठी कवितेत सांगितले आहे. ती कविता म्हणजे स्वतः बेंद्र्यांच्या उच्च तत्त्वज्ञानाचा व संस्कृतीवरील निष्ठेचा आलेखच म्हणता येईल. बेंद्रे म्हणतात,

'भास्करते प्रकाश बीज।
पालवते स्वातंत्र्य बीज।
फुलते अमृत तेज।
देवो देवी॥'

या ओळी वाचताना इंद्रायणीकाठी बसल्याचा भास होतो.

### अध्यात्म विचाराची बैठक

आधुनिक काळात निरनिराळया पाश्चिमात्य विचारसरणीच्या चिंतनाला नव्या जीवनसंदर्भात स्वाभाविकत्व प्राधान्य मिळाल्यामुळे आध्यात्मिक प्रेरणेनुसार साहित्याचा विचारत्व होऊ शकला नाही. या पार्श्वभूमीवर टागोरांची गीतांजली, अरविंदाची सावित्री आणि बेंद्रयाची 'चार तंतू' या कवितांची श्रेष्ठता उमगू लागते. तत्त्वज्ञान हे साहित्याचे अंतर्गत संजीवन आहे; अशी या तिघांची श्रद्धा आहे. दैवी संपत्ती प्राप्त करून घेण्याचा एक कलात्मक कर्मयोग या दृष्टीने ते साहित्याकडे पहातात. साहित्य ही सहानुभूतिजन्य स्वानुभूती आहे, असे बेंद्रे यांनी एके ठिकाणी म्हटले आहे. प्रत्येक मानवात प्राणकेंद्र, हृदयकेंद्र व बुद्धिकेंद्र अशी तीन केंद्रे आहेत. प्राणकेंद्रात साधुत्व आणि सामर्थ्य, हृदयकेंद्रात सौंदर्य आणि आनंद व बुद्धिकेंद्रात सत्य आणि प्रीती यांची सांगड कलेने घातली पाहिजे अशी बेंद्रयांची चिकित्सा आहे. कलेद्वारा भावजागृती, भावजागृतीने रसपरिपोष, रसपरिपोषाने चित्तप्रसाद व चित्तप्रसादाने स्वत्वजागृती ही कलानुभवाची सोपान परंपरा आहे. बेंद्रे यांच्या आध्यात्मिक कवितेचा आस्वाद सुलभ नाही, त्यासाठी रसिकाला ही सोपान परंपरा समजावून घ्यावी लागेल.

बेंद्रे यांनी कन्नड कवितेला काय दिले या प्रश्नाचे उत्तर अनेक रीतीने देणे शक्य आहे. पण आपल्या नादवती व अर्थघन शब्दकळेने ६०-६५ वर्षे अखंडपणे कन्नड रसिकांना त्यांची कविता सुखावीत आली. समाजातील सर्व थरांना ही कविता आपलीच अशी वाटली यातच बेंद्रे यांच्या कवितेचे अनन्यसाधारणत्व आहे असे म्हणता येईल.

•

अनुक्रमणिका

# " वाङ्मयेतिहासलेखनाची संकल्पना " चर्चासत्र

डॉ. द. दि. पुंडे

महाराष्ट्र साहित्य परिषदेने आपल्या अमृतमहोत्सवी वर्षात विविध स्वरूपाचे काही उपक्रम योजिले होते. त्यांतील अभ्यासविषयक एक उपक्रम म्हणून वाङ्मये-तिहासलेखनविषयक चर्चासत्रे घेण्याचे ठरविले होते. त्यानुसार "वाङ्मयेतिहासलेखनाची संकल्पना " या विषयावरील पहिले चर्चासत्र दिनांक ६ नोव्हेंबर व ७ नोव्हेंबर १९८१ या दोन दिवशी घेण्यात आले. या चर्चासत्रात खालील विद्वान मंडळींनी त्यांच्या नावासमोर नमूद केलेल्या विषयावरील आपले निबंध वाचले.

१. डॉ. श्रीनिवास प्रधान : " वाङ्मयाचा इतिहास : संकल्पना आणि तत्त्वे "
२. प्रा. सीताराम रायकर : " मराठी वाङ्मयेतिहासलेखनातील काही प्रश्न "
३. डॉ. सुजीत मुखर्जी : " भारतीय वाङ्मयेतिहासातील समस्या "
४. प्रा. म. द. हातकणंगलेकर : " आधुनिकता, नवता आणि आजचे वाङ्मय "

या चारही निबंधांचे वाचन चार स्वतंत्र सत्रांत झाले. प्रा. दिगंबर पाध्ये, डॉ. प्रधानांच्या निबंधाचे व श्री. वसंत पळशीकर, प्रा. रायकरांच्या निबंधाचे प्रमुख चर्चिक होते. डॉ. मुखर्जी यांच्या निबंधासाठी डॉ. र. बा. मंचरकर व प्रा. जहागीदार अशा दोन चर्चिकांची नियुक्ती केलेली होती. प्रा. हातकणंगलेकरांच्या निबंधाचे प्रमुख चर्चिक प्रा. रमेश तेंडूलकर होते. प्रा. अ. के. भागवत, प्रा. गं. बा. सरदार, प्रा. अशोक केळकर व श्री. प्रभाकर पाध्ये यांनी अध्यक्ष या नात्याने अनुक्रमाने या चारी सत्रांची सूत्रे सांभाळली होती.

पहिले चर्चासत्र सुरू होण्यापूर्वी परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. वि. रा. करंदीकर यांनी प्रास्ताविक भाषण केले. हे चर्चासत्र परिषदेच्या अंगीकृत असलेल्या वाङ्मयेतिहास-लेखन योजनेशी संबंधित असल्याचे त्यांनी सांगितले. अमृत महोत्सवातील कार्यक्रमाचा एक भाग म्हणून अभ्यासविषयक चर्चासत्र प्रथमच होत असल्याचा आनंदही त्यांनी व्यक्त केला. तदनंतर प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी चर्चासत्रासंबंधीची भूमिका स्पष्ट केली.

डॉ. प्रधानांनी आपल्या निबंधात वस्तुलक्षी, कलालक्षी, अनुबंधलक्षी व समग्रलक्षी अशा वाङ्मयेतिहासलेखनाविषयीच्या विविध संकल्पनांची चर्चा करून समग्रलक्षी इतिहास लिहिला जाण्याची आवश्यकता प्रतिपादिली होती. प्रा. सीताराम रायकरांनी याच समग्रलक्षी वाङ्मयेतिहासलेखनाच्या संकल्पनेच्या अनुषंगाने मराठी वाङ्मयेतिहास

लेखनाकरिता एक द्विस्तरीय बंध ( मॉडेल ) सुचविलेला होता. डॉ. मुखर्जी यांनी एकूण भारतीय वाङ्मयेतिहासाची पार्श्वभूमी लक्षात घेऊन तशा संदर्भांनिशी मराठी वाङ्मयेतिहास सिद्ध करण्याची आवश्यकता प्रतिपादन केली होती. प्रा. हातकणंगले-करांनी ' आधुनिकता ' व ' नवता ' या संकल्पनांची चर्चा करून वाङ्मयेतिहास-लेखनातला त्यांचा संदर्भ स्पष्ट केला होता.

निबंधलेखकांनी व प्रमुख चर्चिकांनी मांडलेल्या विचारांवर अतिशय गंभीरपणे मूलगामी अशी चर्चा झाली. या चर्चासत्रासाठी बाहेरगावाहून सुमारे ३० व पुण्यातील ४० अशी सत्तरपंच्याहत्तर मंडळी उपस्थित होती. वर नमूद केलेल्या अध्यक्ष, निबंधवाचक व चर्चिकांबरोबर चर्चासत्रात प्रामुख्याने डॉ. व दि. कुलकर्णी, डॉ. मु. श्री. कानडे, डॉ. आनंद यादव, डॉ. भालचंद्र फडके, डॉ. सुधाकर भोसले, डॉ. हे. वि. इनामदार डॉ. विलास खोले, डॉ. सौ. अंजली सोमण, डॉ. सौ. कुंभोजकर, डॉ. श्री. दा. संगोराम, डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर, डॉ. दासवानी, डॉ. सौ. दासवानी, डॉ. विद्याधर पुंडलिक, डॉ. कल्याण काळे, डॉ. गो. मा. पवार, प्रा. रमेश तेंडुलकर, डॉ. अ. वा. कुलकर्णी, डॉ. म. रा. जोशी, प्रा. ह. श्री. शेणोलीकर, डॉ. गं नी. जोगळेकर, डॉ. स. रा. गाडगीळ, डॉ द. ता. भोसले, प्रा. बाळकृष्ण कवठेकर, डॉ. र. बा. मंचरकर, डॉ. सुरेश जोशी, डॉ. सुधाकर देशपांडे, डॉ. अनंत देशमुख, डॉ. सु. रा. चुनेकर, डॉ. वि. भा. देशपांडे, कविवर्य ना. धों. महानोर, डॉ. चंद्रशेखर बर्वे, डॉ. भालचंद्र नेमाडे प्रा. अरविन्द मंगरूळकर, डॉ. भीमराव कुलकर्णी, प्रा. विलास जहागीरदार, डॉ. सरोजिनी वैद्य, डॉ. स. गं. मालशे, प्रा. गंगाधर पाटील, प्रा. मीनाक्षी रायकर, प्रा. प्र ना. परांजपे, सौ. रंजना पंडित, प्रा. गो. म. कुलकर्णी, डॉ. द. दि. पुंडे, श्री. यशवंत कानिटकर, इत्यादी मान्यवर मंडळी उपस्थित होती.

चर्चासत्रात झालेल्या चर्चेची सुविहित टिपणे घेण्याचे बहुमोल कार्य डॉ. अंजली सोमण व डॉ. कल्याण काळे यांनी केले. या टिपणांच्या अनुषंगाने त्यांनी चर्चासत्राच्या समारोपात एकूण चर्चेची दिशा सांगणारा आढावाही सादर केला. प्रा. पुष्पा भावे आणि डॉ. गो. मा. पवार यांनी चर्चासत्राची फलश्रुती कथन केली. डॉ. व. दि. कुलकर्णी यांनी चर्चासत्रास मदत करणाऱ्या सर्वांबद्दल कृतज्ञता व्यक्त केली आणि वाङ्मयेतिहास लेखनाबद्दल सर्वांनी गंभीरपणे विचारमंथन केल्याने चर्चासत्राचे उद्दिष्ट सफल झाल्याचा आनंदही व्यक्त केला.

या चर्चासत्राचे संयोजन डॉ. व दि. कुलकर्णी, प्रा. गो. म. कुलकर्णी आणि डॉ. द दि. पुंडे यांनी केलेले होते. त्यांना चर्चासत्राच्या अभ्यासविषयक नियोजनात डॉ. अशोक थेळकर व प्राध्यापक सीताराम रायकर यांचे आणि व्यवस्थापनविषयक आखणीत कार्याध्यक्ष डॉ. वि. रा. करंदीकर, कार्यवाह श्री. म. श्री. दीक्षित, कार्यकारिणी सदस्य श्री. ग. वा. बेहेरे यांचे सहाय्य लाभले. कार्यालयप्रमुख श्री. जी. व्यं. देशपांडे

यांनी चर्चासत्राच्या अनुषंगाने येणारी अनेक कामे तत्परतेने केली. चर्चासत्रास सुमारे सहा हजार रुपये खर्च आला.

या चर्चासत्रात व्यक्त झालेल्या विचारांच्या अनुषंगाने " मराठी वाङ्मयेतिहासाचे लेखन " या विषयावरील आणखी एक चार दिवसांचे चर्चासत्र आयोजित करण्याचा प्रयत्न संयोजक करीत आहेत.

●

---

## साभार स्वीकार / लेख, व्याख्याने, स्वगते इत्यादी

**लोकनायक** : ( लो. बापूजी अणे यांचेवरील लेखसंग्रह ); शांताराम कवडे संपादित; प्राचार्य लो. टिळक व लो. अणे महाविद्यालय; वणी; १९८१; रु. ६.

**टिळक विचार** : भा. कृ. केळकर; श्रीविद्या प्रकाशन; पुणे ३०; १९८१; रु. ४५.

**गीता प्रवचने** : विनोबा; परमधाम प्रकाशन; पवनार; १९८१: रु. १.

**समन्दे तलाश** : द. ग. गोडसे; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८१; रु. ३०.

**आपुन तर माणसं हाय** : ( स्वगते ) प्रा. माधव थोरात; मल्लिकार्जुन प्रकाशन, कराड; १९८१; रु. ८.

**नाट्य दर्शन** : डॉ. सुनील सुभेदार; मुंबई मराठी साहित्य संघ मुंबई; १९८१; रु. १२

**आणखी गडकरी** : डॉ. मधुकर आष्टीकर ( संकलक ) वि. सा. संघ; नागपूर; १९८१; रु. १०

## साभार स्वीकार / समीक्षा

**ग्रामीणता : साहित्य आणि वास्तव** : आनंद यादव; मेहता पब्लि. हाऊस; पुणे ३०; १९८१; रु. २०.

**अनुषंग** : मा. ना. आचार्य; यत्न प्रकाशन; अलिबाग, रायगड; १९८२. रु. १;

**मर्ढेकरांची कविता—एक अभ्यास** : धोंडो वि. देशपांडे; सा. प्र. केंद्र; नागपूर; १९८० रु. ९

# परिषदवार्ता

## १ ऑक्टोबर १९८१ ते २५ जानेवारी १९८२

---

गेल्या चार महिन्यांत परिषदेतर्फे जे विविध कार्यक्रम झाले त्यांचा हा संक्षिप्त वृत्तान्त

**शारदीय व्याख्यानमाला :** या मालेचा उपक्रम पाच वर्षांपूर्वी सुरू झाला. मालेचे यंदाचे ५ वे ज्ञानसत्र २९ सप्टेंबर ते ७ आक्टोबर या अवधीत भरले होते. ' संपादकांची सुखःदुखे ' हा एकत्र विषय देऊन नऊ संपादकांना आपापले अनुभव कथन करण्याची विनंती करण्यात आली होती. त्याप्रमाणे सर्वश्री श्री. ग मुणगेकर ( सकाळ ), वि. ना. देवधर ( तरुण भारत ), वसंतराव काणे ( संध्या ), पां र. अंबिके ( महाराष्ट्र ) अनंतराव पाटील ( वि. सह्याद्री ) पुरुषोत्तम पाटील ( अनुष्टुभ धुळे ) यदुनाथ थत्ते ( साधना ), शांताबाई किर्लोस्कर ( किर्लोस्कर मासिके ) आणि माधव गडकरी ( मुंबई सकाळ ) या संपादकांनी मोकळेपणाने आपापली सुखदुःखे कथन करून जिज्ञासू श्रोत्यांचे समाधान केले. ८ आक्टोबरला सकाळीं विजयादशमी-निमित्त श्री सरस्वतीपूजन आणि ग्रंथपूजन करण्यात आले.

**दिवाळी अंक स्पर्धा :** उत्कृष्ट दिवाळीअंकांना काही श्रेष्ठ संपादकांच्या नावे पारितोषिके देऊन गौरव करण्याचा उपक्रम परिषदेने गेल्या दोन वर्षांपासून नव्याने सुरू केला. १९८१ मधील आवाहन करून जे जे अंक स्पर्धेसाठी आले त्यांची एका समितीमार्फत निवड करून पुढील अंकांना पारितोषिके देण्यात आली. (प्रत्येकी १०१ रु. ची ) दीपावली : सं. केशव कोठावळे ( मासिक मनोरंजनकर्ते का. र. मित्र यांच्या स्मृत्यर्थ ) पुस्तक पंढरी : सं. पां. ना. कुमठा ( शं. वा. किर्लोस्कर यांच्या स्मृत्यर्थ ) युगवाणी : सं. शरद कोलारकर ( विविधज्ञानविस्तारकर्ते रा. र. मोरमकर यांच्या स्मृत्यर्थ )

याशिवाय साहित्यसूची ( सं. मो. द. नांदुरकर ) जाईजुई ( सं आशादेवी मोरे ) या दोन अंकांना रु ५१ ची दोन विशेष पारितोषिके देण्यात आली.

पारितोषिकांची शिफारस करण्याचे काम गेली तीन वर्षे सर्वश्री गजानन क्षीरसागर, माधव कानिटकर, निवृत्ती झुरंगे, वसंत मिरासदार, गो. म. कुलकर्णी, न. म. जोशी आणि म. श्री. दीक्षित यांच्या समितीने केले.

**ग्रंथप्रकाशन :** ' भाषा व साहित्य : संशोधन ' ( संपादक वसंत स. जोशी, वाई ) या परिषदेच्या अभिनव व उपयुक्त ग्रंथाचे प्रकाशन २७ नोव्हेंबरला तर्कतीर्थ लक्ष्मण-शास्त्री जोशी यांच्या हस्ते झाले. डॉ. वसंत स. जोशी, डॉ. अशोक केळकर, प्रा. गो.

म. कुलकर्णी आणि डॉ. स. गं. मालशे यांची याप्रसंगी समयोचित भाषणे झाली. ग्रंथासाठी साहित्य-संस्कृतीमंडळ आणि पुणे विद्यापीठ यांनी प्रकाशनार्थ अनुदान दिल्यामुळे ६०० डेमी पृष्ठांचा हा ग्रंथ ३० रु. स उपलब्ध करून देता आला.

**अमृतमहोत्सवी कार्यक्रम :** परिषदेने प्रस्तुतच्या अमृतमहोत्सवी वर्षात वाङ्मयीन आणि वैचारिक दर्जाचे दोन विशेष कार्यक्रम केले. दि. ६ व ७ नोव्हेंबरला वाङ्मयेतिहास योजनेला मार्गदर्शक ठरेल असे एक तज्ज्ञ व्यक्तींचे चर्चासत्र भरविण्यात आले. (सत्राची तपशीलवार माहिती या अंकात अन्यत्र दिलेली आहे) सौंदर्यशास्त्रासंबंधी प्रा. म. द. हातकणंगलेकर यांनी २१ व २२ नोव्हेंबरला दिलेली व्याख्याने आणि त्याप्रसंगी झालेली चर्चा हासुद्धा वैशिष्ट्यपूर्ण कार्यक्रम ठरला. प्रा. हातकणंगलेकर यांच्या व्याख्यानांचे विषय 'पाध्ये आणि मर्ढेकर-पाटणकर' आणि 'पाध्ये यांचा सौंदर्यानुभव' असे होते. दोन्ही दिवशी श्री. प्रभाकर पाध्ये उपस्थित होते व त्यांनी चर्चेत भाग घेतला. प्रा. विलास खोले आणि प्रा. सौ. अंजली सोमण यांनी दोन्ही दिवशींच्या चर्चेचा गोषवारा शेवटी वाचून दाखविला.

**स्मृतिजागर :** २९ नोव्हेंबरला कै. माधव जूलियन यांचे स्मृत्यर्थ प्रा. कृ. ब. निकुंब यांचे 'साहित्यास्वादाच्या काही दिशा' या विषयावर डॉ. वि. म. कुलकर्णी यांचे अध्यक्षतेखाली व्याख्यान आणि नंतर सौ. सुलभा पिशवीकर (सोलापूर) यांचे गझलगायन. १३ जानेवारीला कै. र. धों. कर्वे यांच्या जन्मशताब्दीनिमित्त प्रा. भास्करराव कर्वे यांच्या अध्यतेखाली प्रा. य. दि. फडके यांचे व्याख्यान. २१ जानेवारीला कै. वा. म. जोशी यांच्या जन्मशताब्दीनिमित्त प्रा. गं. बा. सरदार यांच्या अध्यक्षतेखाली प्रा. गो. म. कुलकर्णी यांचे व्याख्यान. कै. वामनराव यांच्या कन्या सौ. शकुंतला देवधर आणि पुतणे प्रा. अ. म. जोशी या कार्यक्रमाला उपस्थित होते.

परिषदेचे माजी विश्वस्त, कवी आणि नामवंत शिक्षणतज्ज्ञ कै. वि. द. घाटे यांच्या स्मृत्यर्थ परिषद दरवर्षी त्यांच्या जन्मदिवशी १८ जानेवारी एक कार्यक्रम करणार आहे सोयीसाठी यंदा हा कार्यक्रम २३ जानेवारी रोजी साजरा करण्यात आला. या दिवशी प्रा. श्री. पु. भागवत यांचे 'वि द. घाटे—लेखक आणि माणूस' या विषयावर तासभर व्याख्यान झाले. कार्यक्रमास डॉ. अनुराधा पोतदार, श्री शिवाजीराव आणि अशोकराव घाटे, इतर घाटेकुटुंबीय, तसेच प्रा श्री. बा रानडे, श्रीमती आनंदीबाई शिर्के, श्री. मोहनराव शहाणे इत्यादी अनेक नामवंत रसिकमंडळी उपस्थित होती.

**सत्कार :** रायपूर साहित्यसंमेलनाचे नियोजित अध्यक्ष प्रा. गंगाधर गाडगीळ यांचा प्रथेप्रमाणे पहिला प्रकट सत्कार करण्याची संधी दि. १० डिसेंबर रोजी परिषदेस लाभली मराठा चेंबरच्या सभागृहात झालेला हा सत्कार परिषदेचे अध्यक्ष प्रा. वसंत कानेटकर यांच्या अध्यक्षतेखाली झाला ही घटना सर्वांना फार अर्थपूर्ण व स्वागतार्ह वाटली. कार्याध्यक्ष डॉ. वि. रा. करंदीकर, प्रा. गो. म. कुलकर्णी, श्री. ग. वा. बेहेरे

आणि प्रा. द. मा. मिरासदार यांची या प्रसंगी समुचित भाषणे झाल्यानंतर प्रा. गाडगीळ यांचे उत्तरादाखल भाषण झाले. प्रा. न. म. जोशी यांनी आभार मानले.

वेंगुर्ले येथे भरलेल्या बाल-कुमार साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष श्री. यदुनाथ थत्ते यांचा २१ डिसेंबरला परिषदेच्या ग्रंथालयात सत्कार करण्यात आला. प्राध्यापक कवी वसंत सावंत यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या समारंभात श्री. द्वारकानाथ लेले, श्री. गजानन क्षीरसागर, प्रा. न. म. जोशी यांची भाषणे झाली. श्री. म. श्री. दीक्षित यांनी आभार मानले.

**श्रद्धांजली :** सुप्रसिद्ध कन्नड कवी श्री. द. रा. बेंद्रे यांना परिषदेतर्फे २३ नोव्हेंबर रोजी श्रद्धांजली वाहण्यात आली. श्रद्धांजली सभेत प्रा. अ. रा. तोरो यांचे मुख्य भाषण झाले.

**संमेलन आणि परिषद :** रायपूर येथे भरलेल्या संमेलनप्रसंगी परिषदेच्या कार्यकारी मंडळाची सभा आयोजित करण्यात आली. या सभेला सर्वश्री वि. रा. करंदीकर, गो. म. कुलकर्णी, आनंद यादव, म. श्री. दीक्षित, ग. वा. बेहेरे, वसंत सावंत, प्रा. ह. श्री. शेणोलीकर, प्रा. म. वि. फाटक, प्रा. व. दि. कुलकर्णी, प्रा. व. के. दीक्षित हे सभासद उपस्थित होते. तसेच मराठी साहित्य महामंडळाच्या सभेस श्री करंदीकर, फाटक आणि बेहेरे प्रतिनिधी म्हणून उपस्थित होते. कार्यकारी मंडळातील बहुसंख्य सभासदांनी संमेलनाच्या कार्यक्रमात आणि वरील तिघा प्रतिनिधींनी महामंडळाच्या कामकाजात विशेष दक्षतेने भाग घेतला.

वणी ( जि. यवतमाळ ) येथे परिषदेची तिसरी ग्रंथव्यवहार परिषद ३१ आक्टोबर व १ नोव्हेंबर रोजी भरली होती. तिचा वृत्तांत 'पत्रिके'च्या या अंकात अन्यत्र दिलेला आहे.

**द. रत्नागिरी सा. संघ :** सावंतवाडी येथील या संघाचा दशवार्षिक उत्सव १० व ११ ऑक्टोबरला साजरा करण्यात आला. श्री. मंगेश पाडगावकर आणि प्रा. रमेश तेंडुलकर यांची कविता आणि विचार ऐकण्याची संधी या भागातील लेखक आणि वाचक यांना मिळाली.

**दोन नवीन शाखा :** दोन अडीच वर्षांपूर्वी ठाणे येथे प्रा. म. वि. फाटक यांच्या विशेष प्रयत्नामुळे शाखासभा स्थापन झाली. त्यानंतर गेल्या दोन महिन्यांत पिंपरी-चिंचवड ( पुणे ) आणि खोपोली ( जि. रायगड-कुलाबा ) या दोन ठिकाणी नवीन शाखा स्थापन झाल्या आहेत. दोन्ही ठिकाणी मिळून सुमारे १२५ नवे सभासद झाले. या तीन शाखा धरून आजमितीस महाराष्ट्रात परिषदेच्या एकूण ११ शाखा कार्य करीत आहेत.

**काही देणग्या :** कै. वि. द. घाटे यांचे स्मरणार्थ प्रतिवार्षिक कार्यक्रमासाठी त्यांची कन्या आणि पुत्र, तसेच इतर दोन चहाते यानी ३३०० + २०० = ३५००

रु. ची देणगी दिली आहे. श्री. शंकर प्रधान ( पर्वती पायथा, पुणे ) यांनी अकाली दिवंगत झालेल्या आपल्या पुत्राच्या स्मरणार्थ ३००० रु. देणगी दिली आहे. प्रा. प्रधान यांच्या ठेव देणगीवर येणाऱ्या व्याजातून परिषदेतर्फे प्रतिवर्षी उत्कृष्ट बाल-वाङ्मय प्रकारातील पुस्तकाला पारितोषिक ( रु. २०० चे ) दिले जाणार आहे. सौ. शकुंतला देवधर यांनी आपले वडील कै. वा. म. जोशी यांचे स्मृतिदिनी १०० रु. देणगीदाखल दिले.

परिषद या सर्व देणगीदारांची ऋणी आहे.

**संदर्भ ग्रंथालय :** खरेदी आणि परतभेटी या दोन मार्गांनी परिषदेच्या वा. गो. आपटे संदर्भग्रंथालयात नित्य भर पडत असतेच. पण याशिवाय काही ग्रंथप्रेमी व्यक्तीही आपल्या संग्रहातील ग्रंथ अधूनमधून भेट म्हणून देत असतात. गेल्या चार-पाच महिन्यांत केसरी-मराठा संस्था आणि सर्वश्री अ. म. जोशी, ग. गं. सोमण कैलास देशपांडे, वा. कृ. गलगली, श्रीमती कृष्णाबाई मोटे यांच्याकडून सुमारे २५० पुस्तकांचा ग्रंथालयास लाभ झाला. परिषद या दात्यांची आभारी आहे.

## १. सांगली शाखा

( १ ) दि. १५–३–८१ रोजी सकाळी श्रीनिवास शिंदगीलिखित ' पुंगीवाला ' या बाल–वगनाट्य पुस्तकाचा प्रकाशन समारंभ मा. वि. ना. करंदीकर ( C. E. O. जिल्हा परिषद सांगली ) यांचे हस्ते संपन्न झाला. अध्यक्षस्थानी ख्यातनाम समीक्षक प्रा. म. द. हातकणंगलेकर होते. नंतर याच बाल–वग–नाट्याचा बहारदार प्रयोग भावे–नाट्य–मंदिर येथे सादर करण्यात आला.

( २ ) वरील तारखेसच दुपारी ४–३० वाजता श्री. भा. ल. रानडे यांनी केलेल्या स्वा सावरकर विरचित ' सप्तर्षि ' काव्याच्या गद्य अनुवादाचे पुस्तक श्रीमंत सौ. उमाराजे पटवर्धन यांच्या अध्यक्षतेखाली श्री. ग. व. देशमुख ( प्राचार्य 'लॉ' कॉलेज) यांच्या हस्ते प्रकाशित झाले.

( ३ ) दि. २९ मार्च १९८१ रोजी सायंकाळी ४ वाजता म. सा. प. व शाखासभेच्या विद्यमाने कै. वि. ज. तथा पिलाजीराव फडणीस यांचे स्मरणार्थ कविवर्य ' सुधांशु ' यांच्या अध्यक्षतेखाली वासंतिक कविसंमेलनाचा अत्यंत रंगतदार कार्यक्रम संपन्न झाला. या संमेलनात सांगली जिल्ह्यातील सुमारे २० ते २५ कवींनी आपल्या निवडक कवितांचे वाचन केले. या कविसंमेलनास कै. फडणीस यांच्या कन्या व म. सा.प. पुणे प्रतिनिधी श्री. न. म. जोशी उपस्थित होते.

( ४ ) याच सभेत मा. प्रा. म. द. हातकणंगलेकर यांचा म. सा. प. व सांगली जिल्हा साहित्यसभा यांचे वतीने त्यांच्या ' साहित्यातील आधोरेखिते ' या ग्रंथाला सा.

परिषदेच्ये समीक्षेचे पारितोषिक मिळाल्याबद्दल सत्कार करण्यात आला व पारितोषिक प्रदान करण्यात आले.

## २. नेवासा शाखा

( १ ) ५ मे रोजी शिवजयंती निमित्त शाखेचे कार्यवाह प्रा. अशोक शिंदे यांचे ज्ञानेश्वरनगर येथे छत्रपतींचे कार्य या विषयावर व्याख्यान.

( २ ) १५ ऑगस्ट रोजी श्री. च. वि. जोशी, श्री. म्हस्के, श्री. सांगळे, श्री. सोयगावकर या महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचा काव्यवाचनाचा कार्यक्रम.

( ३ ) १२ ऑक्टोबर रोजी कोजागिरी पौर्णिमेनिमित्त रात्री पु. ल. देशपांडे यांच्या ध्वनिमुद्रित टेपस् ऐकवण्याचा कार्यक्रम.

( ४ ) १२ डिसेंबर रोजी डॉ. आनंद यादव यांचे 'माझी लेखनाची भूमिका' या विषयावर व्याख्यान.

( ५ ) श्री. च. वि. जोशी या महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या स्वलिखित 'द पोर्ट्रेट' या एकांकिकेबाबत 'प्रयोगशीलता कशी वाढविता येईल' या विषयावर दि. ४-१-८२ ला चर्चा.

## ३. जळगाव शाखा

( १ ) पुस्तक परिचय : १. कै. वि. स. खांडेकर यांचा पत्रसंग्रह 'दीपगृह' या नावाने प्रसिद्ध झाला आहे. या पुस्तकाचा परिचय प्रा. शा. न. पाटील यांनी करून दिला. ताराशंकर बंदोपाध्याय यांच्या 'कवी' या बंगाली कादंबरीचा (मराठी अनुवाद सौ. अरुणा अंतरकर ) परिचय प्रा. राजा महाराज यांनी करून दिला. दोन्ही कार्यक्रमांचे संयोजन प्रा. प्र. श्रा. चौधरी यांनी केले.

( २ ) महाराष्ट्र शाहीर दु. आ. तिवारी यांच्या स्मृतिदिनी सर्वश्री. द. वि. गंधे, देवकीनंदन सारस्वत यांची भाषणे झाली. श्री. नारायण शिरसाळे यांनी हा कार्यक्रम आयोजित करण्यास सहकार्य केले.

( ३ ) महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या अमृतमहोत्सवानिमित्त जळगाव, भादली, पाचोरा आणि जामनेर येथे पुढील कार्यक्रम आयोजित करण्यात आले.

**जळगाव :** दि. २८-११-८१ रोजी डॉ. भाऊ मांडवकर यांच्यांशी साहित्यिक गप्पा आयोजिण्यात आल्या. अध्यक्षस्थानी श्री. ल. नी. छापेकर होते. चर्चेत सर्वश्री स. सो. सुतार, मु. द. छापेकर, राम बोरकर यांनी भाग घेतला.

**भादली :** येथे दि. ६-१२-८१ रोजी श्री. पुरुषोत्तम नारखेडे यांच्या सहकार्याने कविसंमेलन आयोजित केले. २८ कवींनी काव्यवाचनात भाग घेतला.

**पाचोरा :** येथे दि. १३-१२-८१ रोजी काव्योपासक मंडळाचे कार्यवाह श्री.

दत्तात्रय कमळेगुरुजी यांच्या सहकार्याने कविसंमेलन घेतले. २४ कवींनी सहभाग घेतला. श्री. स. सो. सुतार आणि नारायण शिरसाळे यांनी संचलन केले.

**जामनेर :** येथे दि. २७-१२-८१ रोजी 'साहित्य मंडळाच्या मदतीने कविसंमेलन आयोजित केले. 'ओळखी अनोळखी' या महाराष्ट्र शासन पुरस्कार लाभलेला कवी एकनाथ देशमुख यांनीही सहकार्य केले. साहित्य मंडळाचे कार्यवाह प्रा. घनःश्याम मोहरीर यानीं कार्यक्रमाचे संचलन केले. २१ कवींनी काव्यवाचनात भाग घेतला. हे सर्व कार्यक्रम कार्याध्यक्ष प्रा. प्र. श्रा. चौधरी यांनी सर्व पदाधिकाऱ्यांच्या सहकार्याने आयोजित केले.

## ४. धुळे शाखा

साहित्य परिषदेच्या अमृतमहोत्सवानिमित्त शाखेतर्फे दि. ३ डिसेंबरला सुप्रसिद्ध कवी प्रा. कृ. ब. निकुंब यांचा एकसष्टी निमित्त सत्कार व 'साहित्य, साहित्यिक व वाचक' या विषयावर त्यांचे उत्कृष्ट व्याख्यान झाले. दोंडाईचे येथे 'वेगळ्या वाटा आनंदाच्या' या विषयावर त्यांनी आणखी एक व्याख्यान दिले. दि. १४ व १५ डिसेंबरला धुळे येथे साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. वि. रा. करंदीकर यांची 'समर्थ रामदास : एक प्रवृत्तीमार्गी सन्त' या विषयावर विचारपरिप्लुत व्याख्याने झाली. प्रा. ह. श्री शेणोलीकर यांनी याप्रसंगी प्रास्ताविक केले, प्रा. कुसुमाकर शिंपी यांनी परिचय करून दिला व प्रा. दा. वि. पाटील यांनी आभार मानले. शेवटी शाखे-तर्फे व्याख्यात्यांचा सत्कार करण्यात आला.

## ५. अहमदनगर शाखा

(१) १४ एप्रिलला डॉ. अनुराधा पोतदार यांच्या उपस्थितीत त्यांच्या व नगर येथील निवडक कवींच्या काव्यवाचनाचा सुश्राव्य कार्यक्रम.

(२) १८ मे रोजी श्री. ना. या. जोशी, महाराष्ट्र राज्य पाठ्य पुस्तक निर्मिती मंडळ शास्त्र विभाग प्रमुख पुणे यांचे 'श्री सूक्त–एक वैज्ञानिक विचार' या विषया-वर उद्बोधक व्याख्यान.

(३) १६ जूनला श्री. विजय रणदिवे (औरंगाबाद) यांचे बहारदार कथाकथन. यावेळी म. सा. परिषदेचे सभासद व कवी श्री. दिगंबर जोशी यांची नगरहून बदली झाल्याबद्दल त्यांना सत्कारपूर्वक निरोप देण्यात आला.

(४) ७ सप्टेंबरला प्रा. वसंत कानेटकर यांच्याशी, साहित्यिक-नाट्यविषयक गप्पांचा रंगतदार कार्यक्रम.

(५) ८ नोव्हेंबरला प्रसिद्ध कीर्तनकार डॉ. गोविंद खरे यांचे 'ग्रंथ महिमा' या विषयावर उद्बोधक व रंजक कीर्तन.

( ६ ) १२ डिसेंबरला प्रसिद्ध समीक्षक व मनमाड कॉलेजचे प्राचार्य डॉ. म. सु. पाटील यांच्या अध्यक्षतेखाली कविसंमेलन झाले व कवितेवर त्यांचे मननीय व्याख्यान झाले.

( ७ ) २५, २६ व २७ डिसेंबर ८१ रोजी रायपूर (मध्यप्रदेश) येथील अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाला म. सा. परिषद नगर शाखेचे सात सभासद जाऊन आले. त्यातील श्री. चंद्रकांत पालवे व श्री. अरुण शहाणे या उदयोन्मुख कवींनी कविसंमेलनात भाग घेतला.

( ८ ) ३ जाने. ८२ रोजी रायपूर साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रा. गंगाधर गाडगीळ व तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा नगरशाखेतर्फे सत्कार करण्यात आला.

( ९ ) अमृत महोत्सवानिमित्त म सा. परिषदेने तालुक्याच्या गावी आयोजित केलेल्या व्याख्यानांपैकी एक व्याख्यान डॉ. सुधाकर भोसले ( पुणे विद्यापीठ ) यांचे पारनेर येथे 'तुका आकाशाएवढा' या विषयावर झाले.

## ६. सोलापूर शाखा

श्री. हिमांशु कुलकर्णी यांच्या 'बाभूळ वन' या काव्यसंग्रहास म. सा. प. पुणे चे 'गोखले पारितोषिक' मिळाल्याबद्दल त्यांचा सत्कार. शाखाध्यक्ष प्रा. यशस्विनी खाडिलकर, कार्याध्यक्ष श्री. रा. व्यं. छत्रपती व दत्ता हलसगीकर यांनी श्रीफल, गुच्छ देऊन कविवर्यांचा गौरव केला.

'बलुतं' कर्ते श्री. दया पवार यांच्या फॉरेस्टमधील बुद्धविहारात झालेल्या कार्यक्रमात श्री. दत्ता हलसगीकर व श्री. छत्रपती यांनी ग्रंथकर्त्यांचा श्रीफल–गुच्छ देऊन सत्कार केला.

नवसाहित्य परिषदेच्या विभागीय संमेलनास शाखेच्या वतीने ५१/– रु. ची देणगी दिली, संमेलनाध्यक्ष व स्वागताध्यक्षांचा सत्कार केला. या प्रसंगी श्री. छत्रपती, प्रा. विलास पाटील, दत्ता हलसगीकर, सौ. सिंधूताई कुलकर्णी आदी पदाधिकारी उपस्थित होते.

कवी संजीव यांच्या 'गझल गुलाब' या काव्यसंग्रहाचे प्रकाशन प्रसंगी प्रा. खाडिलकर, श्री. छत्रपती व अन्य पदाधिकाऱ्यांनी उपस्थित राहून कविवर्यांचा सत्कार केला.

दि. ६ जुलै रोजी प्रा. वसंत पाफळकर ( बार्शी ) यांचे 'कवितेत काय असते ?' या विषयावर व्याख्यान. प्रास्ताविक व परिचय दत्ता हलसगीकरांनी करून दिला. श्री. नागेश यांनी आभार मानले.

दि. २१ जुलै रोजी लोककवी मनमोहन यांचा श्रीफल–पुष्पगुच्छ देऊन सत्कार करण्यात आला.

कवी रा. ना. पवार, श्री. काकासो० जक्कल व श्री. रामकृष्ण पंत बेत, वकील या त्रिमूर्तींचा सत्कार करण्यात आला.

दि. १४ ऑगस्ट रोजी श्री. प. पु. देव यांचा 'मराठी संगीत रंगभूमीच्या शत-सांवत्सरिक महोत्सवाची सांगता' हा अभिनव साग्रसंगीत कार्यक्रम सादर करण्यात आला. त्यात प्रा. भालचंद्र जेऊरकर, श्री. पंचवाडकर, प्रा. नरेंद्र कुंटे, श्री. रा. ना. पवार यांनी भाग घेतला. प्रा. अनिल फडके यांनी प्रास्ताविक केले. श्री. छत्रपती यांनी आभार मानले.

दि. २८ ऑगस्टला प्रा. र. वा. मंचरकर (कोल्हापूर) यांचे 'साहित्यातील रसास्वादाच्या दिशा' या विषयावर व्याख्यान झाले. परिचय व प्रास्ताविक श्री. छत्रपती यांनी आणि आभार प्रदर्शन प्रा. मीर इसहाक शेख यांनी केले.

दि. ४ आक्टोबरला सौ. नीलिमा अंबिके यांचे सुश्राव्य गायन झाले. सौ. सिंधू-ताईंनी आभार मानले.

दि. १४ आक्टोबरला कोजागिरी निमित्त श्री. सिद्राम जाधव आणि मंडळी सुंद्रीवादनाचा व दुग्धपानाचा बहारदार कार्यक्रम सरस्वती मंदिर प्रशालेत झाला.

साहित्यपरिषदेच्या अमृतमहोत्सवानिमित्त प्रा. विलास पाटील यांचे माढा येथील वाचनालयात 'स्वप्ने कालची व आजची' या विषयावर व्याख्यान झाले. कार्याध्यक्ष श्री. छत्रपती यांनी ग्रामीण भागात साहित्याचा प्रचार नि प्रसार कसा होईल याविषयी माहिती दिली.

दि. २२ नोव्हेंबरला मौजे करकंब येथे श्री. दत्ता हलसगीकर व अन्य स्थानिक कवींच्या काव्यवाचनाचा कार्यक्रम झाला. श्री. र. पां. देशपांडे, श्री. दाभणे यांनी कार्यक्रमाचे व्यवस्थापन उत्तम केले. श्री. छत्रपती यांनी शाखा कार्याची माहिती दिली.

श्री. जोशी यांच्या 'अश्रू' या काव्यसंग्रहाचे प्रकाशन प्रसंगी शाखा चिटणीस श्री. नागेश यांनी कवींचा श्रीफल–पुष्प गुच्छ देऊन सत्कार केला.

दि. ५ डिसेंबरला पंढरपूर नगर वाचन मंदिर व सोलापूर शाखा यांच्या वतीने कवठेकर प्रशाला, पंढरपूर येथे श्री. ग. वा. बेहरे यांचे 'परमेश्वराचा जन्म' या विषयावर व्याख्यान झाले. प्रा. वदक, प्रा. रत्नपारखी, अशोक देशपांडे, पु. ज. बुवा यांनी कार्यक्रमाचे संयोजन केले. श्री. छत्रपती, कार्यवाह नागेश, तसेच साहित्य परि-षदेचे कार्यवाह श्री. म. श्री. दीक्षित आदी मंडळी यावेळी उपस्थित होती.

६ डिसेंबरला सोलापूर येथे साहित्यिक गप्पांचा कार्यक्रम श्री. ग. वा. बेहरे व म. श्री. दीक्षित यांचे समवेत झाला. या प्रसंगी आनंद कुंभार, अनिल फडके, प्रा. पाटील, प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुख, सौ. सिंधूताई कुलकर्णी यांनी समांतर साहित्य संमेलन दलित साहित्य, शासन व साहित्यिक इत्यादी विषयांवर प्रश्न विचारून दिलखुलास चर्चा केली.

कविवर्य हिमांशु कुलकर्णी हे लिव्हिंगस्टोन (आफ्रिका) येथे जात असल्याने दि. १४ नोव्हेंबरला त्यांना कौटुंबिक स्वरूपाचा निरोप देण्यात आला. शाखेचे पदाधिकारी, तसेच श्री. महेश कावळे व अन्य मंडळी यावेळी उपस्थित होती.

अहवाल काळात नैमित्तिक कारणानुसार सर्वश्री लक्ष्मीनारायणबोल्ली, नाट्य आराधनेचे डॉ. देगावकर, शशिकला साळगावकर, कुमार कोठावळे, पांडुरंग काळे, कु. लता वळसंगकर, प्रा. भगवानदास तिवारी आदी मंडळींचा गुणगौरव करण्यात आला.

स्व. महाकवी बेंद्रे, मोकाशी, बा. भ. पाटील, संगीत शिक्षक नाना पाटील, बाबूरावजी सुरवसे या मान्यवर दिवंगतांना शाखेच्या वतीने श्रद्धांजली वाहण्यात आली. स्व. पाटील यांच्या कुटुंबियांना शाखेकडून रु. ५१/ ची अल्पशी मदत शाखाध्यक्षांच्या हस्ते देण्यात आली.

दि. ११–१–८२ रोजी प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुख यांच्या अध्यक्षतेखाली स्व. कवी कुंजविहारी काव्यस्पर्धा आयोजिण्यात आली. पं. सुमतीबेन शहा यांच्या हस्ते पारितोषिक वितरण झाले. अमृतमहोत्सवांतर्गत एक कवी संमेलन ग्रामीण भागात घेण्याचे आयोजित केले आहे. कवी कुंजविहारी काव्य स्पर्धेसाठी श्री. शं. गो. पटवर्धन आणि पद्मश्री पं. सुमतीबेन शहा यांचे औदार्यपूर्ण सहकार्य लाभले आहे.

### ७. वाई शाखा

( १ ) 'साहित्य संस्कृती मंडळा'चे अध्यक्षपदी निवड झाल्याबद्दल डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांचा रविवार दि. १९-४-८१ रोजी सत्कार करण्यात आला. यावेळी डॉ. बारलिंगे यांनी 'संस्कृतीतील साहित्याचे स्थान' या विषयावर आपले विचार मांडले.

( २ ) 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर : व्यक्तित्व आणि साहित्य' या विषयावर आंबेडकर जयंतीच्या निमित्ताने श्री. सतीश कुलकर्णी यांचे व्याख्यान. ( २० एप्रिल ८१ )

( ३ ) दि. ३१-७-८१ रोजी शाखेच्या कार्यकारी मंडळाची पहिली सभा होऊन सन १९८१-८२ चे अंदाज पत्रक व कार्यक्रमांना मंजुरी देण्यात आली. परिषदेच्या 'रौप्यमहोत्सवा'साठी कार्यक्रम ठरविण्यात आले.

( ४ ) दि. २३-८-८१ रोजी वाई शाखेची वार्षिक सर्वसाधारण सभा पार पडली. कार्यकारिणीने दि. ३१-७-८१ च्या सभेत मंजूर केलेल्या विषयांना व कार्यक्रमांना मंजुरी देण्यात आली.

( ५ ) अमृत महोत्सवाचा भाग म्हणून वाई परिसरातील लेखक, कवी, कलावंताचा एक मेळावा माहे २७-९-८१ रोजी आयोजित करण्यात आला होता. यावेळी विविध प्रकारांतील ४५ कलावंतांनी मेळाव्यात भाग घेतला. कलावंतांची प्रोत्साहनात्मक पारितोषिकासाठी निवडही करण्यात आली.

( ६ ) अमृतमहोत्सवानिमित्त परिषदेचे अध्यक्ष प्रा. वसंत कानेटकर यांची ' मला नाटक कसे सुचते ' या विषयावर प्रकट मुलाखत श्री. ग. वा. बेहेरे यांनी घेतली, त्याच वेळी प्रा. वसंत कानेटकर यांच्या हस्ते मेळाव्यातील यशस्वी कलावंतांना पारितोषिके वाटण्यात आली.

दि. ६-१९-८१ रोजी पार पडलेल्या या समारंभाच्या अध्यक्षपदी तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी होते.

( ७ ) प्रसिद्ध कन्नड कवी, कविवर्य द. रा. बेंद्रे यांच्या श्रद्धांजली सभेत दि. ४-११-८१ प्रसिद्ध समिक्षक डॉ. अ. रा. तोरो यांचे ' कविवर्य बेंद्रे, जीवन व साहित्य ' या विषयावर माहितीपूर्ण व्याख्यान झाले.

( ८ ) सातारा जिल्ह्यातील उरूल ता. पाटण येथे प्रसिद्ध कादंबरीकार श्री. बजरंग शेलार यांच्या ' धरती ' या कादंबरीचे प्रकाशनाचा समारंभ, समाजभूषण, पु. पां. तथा बाबुराव गोखले ( कराड ) यांच्या शुभहस्ते पार पडला.

या वर्षात परिषदेच्या वाई शाखेस वाई नगरपालिका ( १०० रु ) आणि वाई अर्बन को-ऑपरेटिव्ह बँक ( ५०० रु. ) अशा देणग्या लाभल्यामुळे शाखेस स्थैर्य लाभले. या देणगीदारांची शाखा ऋणी आहे.

### ८. पिंपरी-चिंचवड शाखा :

दि. २६ जुलै १९८१ रोजी प्रा. वसंत कानेटकर यांचे शुभहस्ते महाराष्ट्र साहित्य परिषद पिंपरी-चिंचवड शाखेचे उद्‌घाटन झाले. आतापर्यंत शाखेचे जवळ जवळ ८० सभासद झाले आहेत.

दि. २७ ऑगस्ट १९८१ रोजी चिंचवड येथील हुतात्मा चापेकर विद्यालयात एक जाहीर कविसंमेलन शाखेच्या वतीने संपन्न झाले. सुप्रसिद्ध कवयित्री श्री. पद्‌मा गोळे यांचे अध्यक्षतेखाली झालेल्या या कविसंमेलनात सुमारे ४० कवींनी भाग घेतला. त्यात हडपसर पासून तळेगावपर्यंतचे कवी उपस्थित होते. श्री कल्याण इनामदार, सतीश इनामदार, सुधाकर नेर्लेकर, सहदेव मखामले, अशोककुमार त्रिभुवन इ. प्रमुख कवीही उपस्थित होते.

दि. १२ आक्टोबर १९८१ रोजी शाखेच्या वतीने कोजागिरी साजरी करण्यात आली. त्यानिमित्ताने साहित्यिक गप्पांचा कार्यक्रम ठेवण्यात आला होता. श्री. भाई वैद्य या कार्यक्रमास उपस्थित होते. पु. शि. रेगे यांच्या सावित्री या कादंबरीवर यावेळी चर्चा झाली तसेच सुप्रसिद्ध साहित्यीक कै. चिं. त्र्यं. खानोलकर यांच्या साहित्यावरही चर्चा झाली.

दि. २१ आक्टोबर १९८१ रोजी पिंपरी-चिंचवड नगरपालिकेने या शाखेला कार्यालयाकरिता दिलेल्या जागेत कार्यालयाच्या उद्‌घाटनाचा कार्यक्रम झाला. श्री.

शंकर पाटील यांच्या शुभहस्ते कार्यालयाचे उद्‌घाटन झाले. अध्यक्षस्थानी नगरपालिकेचे अध्यक्ष डॉ. श्री. श्री. घारे होते. तसेच म. सा. प. पुणे चे कार्यवाह प्रा. न. म. जोशी उपस्थित होते.

दि. २१ नोव्हेंबर १९८१ रोजी. पिंपरी येथील हिन्दुस्तान ॲन्टीबायोटिक्स वसाहतीमध्ये साहित्यिक चर्चा व कविता वाचनाचा जाहीर कार्यक्रम झाला. सर्वश्री गिरीश प्रभुणे, राजेन्द्र देव, प्रकाश कुलकर्णी, बाळ शुक्ल, नंदकुमार प्रभुणे इ. साहित्यिकांनी भाग घेतला.

दि. १० जानेवारी १९८२ रोजी. प्राधिकरणातील गंगानगर येथे परिषदेच्या वतीने काव्यवाचन, काव्यगायनाचा कार्यक्रम पार पडला. श्री. अशोककुमार त्रिभुवन यांच्या संचलनाखाली झालेल्या या कार्यक्रमात सुमारे २५ कवींनी भाग घेतला. गायक श्री. अरुण भेंडे यांनी गझल गायन केले. सर्वश्री सुभाष सरीन, गिरीश प्रभुणे, राजेन्द्र देव शाहीर मरळीकर, संजय कुलकर्णी सौ. माधुरी ओक, कु. मंजुषा मेंगे इ. कवींनी काव्यवाचनात भाग घेतला. अध्यक्षस्थानी नगरसेवक श्री. नारायण भावे होते. श्री. रमेश डोळस या उदयोन्मुख कवीने समारोप केला.

स्थापनेपासूनच या शाखेने असे विविध साहित्यिक कार्यक्रम घडवून आणले आहेत. पिंपरी चिंचवड नगरपालिका या शाखेस सर्वतोपरी सहाय्य करीत असून मार्च १९८२ पर्यंतच्या खर्चाकरिता नगरपालिकेने शाखेस रु. पाच हजार अनुदान मंजूर केले असून त्यातील रु. दोन हजार मिळाले आहेत. उर्वरित रु. तीन हजारमध्ये शाखेचे ग्रंथालय तसेच काही फर्निचर इ. घेण्याचे ठरले आहे.

दि. ३० व ३१ जानेवारी १९८२ रोजी अखिल भारतीय स्तरावरील शाहिरांचा भव्य मेळावा शाखेच्या वतीने व नगरपालिकेच्या सहकार्याने संपन्न होत आहे.

---

( वेळेवर हाती आले तेवढेच शाखावृत्तान्त वर छापले आहेत. )

# वणीची ग्रंथव्यवहार-परिषद

## गोविंद देशपांडे

---

" नव्या काळात राहण्याची घरे लहान झाली त्यात पुस्तकांना कोठे ठेवणार ? नव्या काळातील या व्यावहारिक अडचणींचा ग्रंथ व्यवहारावर परिणाम झाला " असे विचार नामवंत कवी श्री. आत्माराम रावजी देशपांडे उपाख्य कवी अनिल यांनी पुण्याच्या महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने दि. ३१ ऑक्टोबर व १ नोव्हेंबर १९८१ या तारखांना यवतमाळ जिल्ह्यातील वणी येथे पार पडलेल्या ग्रंथ-व्यवहार परिषदेच्या तिसऱ्या अधिवेशनाच्या उद्‌घाटन प्रसंगी व्यक्त केले.

' लोकनायक अणे ' नगरात सुप्रसिद्ध विचारवंत व समीक्षक प्राचार्य नरहर कुरुंदकर यांच्या अध्यक्षतेखाली हे अधिवेशन संपन्न झाले. याप्रसंगी विदर्भातील एक लेखक म्हणून कवी अनिल, एक पत्रकार म्हणून श्री. व. ना. एकबोटे व एक प्रकाशक म्हणून ' नागपूर प्रकाशन 'चे श्री. दि. मा. धुमाळ यांचा श्री. दे. य. गोहोकार यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. महाराष्ट्र परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. वि. रा. करंदीकर यांनी आणि स्वागताध्यक्ष श्री दादासाहेब हूड यांनी सर्व उपस्थितांचे स्वागत केले.

### खपाची हमी हवी

" तुम्ही-आम्ही ज्याला श्रेष्ठ वाङ्मय म्हणतो ते वाचकांना वाचण्याच्या लायकीचे वाटत नाही व त्यांना जे आवडते त्याला आपण वाङ्मय मानीत नाही, ही दरी कशी कमी करावयाची हा खरा प्रश्न आहे " असा अभिप्राय अधिवेशनाच्या अध्यक्षपदावरून बोलताना प्रा. कुरुंदकर यांनी व्यक्त केला. " ६ महिन्यांत ५०० प्रती खपल्या जाण्याची हमी आपण देऊ शकलो तर प्रकाशक कोणतेही पुस्तक छापावयास पुढे येतील " अशी ग्वाही त्यांनी दिली. ग्रंथ व्यवहारातील काही गोष्टी आपल्या नियंत्रणाखाली असल्या तरी अनेक गोष्टींवर आपला ताबा नाही हे त्यांनी समर्थपणे प्रतिपादन केले. या उद्‌घाटन सोहळ्याचे संचालन श्री. माधवराव सरपटवार यांनी केले तर श्री. नानाजी भागवत यांनी आभार मानले.

### साहित्य-अभिजात व लोकप्रिय

' साहित्य-अभिजात व लोकप्रिय ' या विषयावर डॉ. वि. रा. करंदीकर यांच्या

अध्यक्षतेखाली एक परिसंवाद झाला. त्यात सत्य, शिव आणि सौंदर्य यांनी परिपूर्ण ते अभिजात होय ( प्रा. म. वि. फाटक ) केवळ टिकणे महत्त्वाचे नाही, कसे टिकते ते महत्त्वाचे आहे ( मो. दा. देशमुख ) देशांतर, भाषान्तर व कालान्तर या कसोट्यांवर टिकणारे ते अभिजात ( प्रा. ह. श्री. शेणोलीकर ) अशी मते या परिसंवादात मांडण्यात आली.

## ग्रंथ व्यवहार चळवळ

'ग्रंथ व्यवहार चळवळीत विदर्भ-मराठवाडा मागे का ?' या विषयावरील परिसंवादाचे अध्यक्ष प्राचार्य कुरुंदकर हे होते. मराठवाड्यात मराठीची सतत गळचेपी झाली त्यामुळे मराठी प्रकाशन व्यवसाय संघटित झाला नाही ( तु. शं. कुलकर्णी ) पुस्तकांच्या पर्सनलिटीकडे लक्ष दिले जात नाही ( श्री. वि. गंधे ) ग्रंथ विक्रीच्या वेळी कमिशन देण्याची पद्धत बंद व्हावी ( पिंपळापुरे ), ग्रंथालयांचे स्थान लक्षात घेणे जरुरीचे ( अ. ल. लिमये ), लेखक पुरेसे कष्ट घेताना दिसत नाहीत ( प्रा. वसंत मिरासदार ) इत्यादी मते या परिसंवादात मांडण्यात आली. "अनुदान संहितेत थोडा बदल केला तर प्रत्येक जिल्ह्यात २० हजार ग्रंथ खपाची क्षमता आहे. महाराष्ट्रात ८० लक्ष रुपयांच्या ग्रंथखरेदीची क्षमता आहे, यात ६४ लक्ष रुपयांच्या ग्रंथालयांच्या खरेदीची क्षमता गृहीत नाही हे प्राचार्य कुरुंदकरांनी आकडेवारी देऊन प्रभावीपणे प्रतिपादन केले.

## साहित्य प्रसार

'साहित्य प्रसाराचे मित्र व मारेकरी' याही परिसंवादाच्या अध्यक्षपदी प्राचार्य नरहर कुरुंदकरच होते. नॅशनल बुक ट्रस्ट, साहित्य अकादमी, साहित्य संस्कृती मंडळ हे साहित्य प्रसाराचे मित्र आहेत, तसेच सहृदय समीक्षक, जाण असणारा ग्रंथपाल, शासन आदी मित्र आहेत ( श्री. म. श्री. दीक्षित ) मारेकरी असणाऱ्या व मित्र म्हणून वावरणाऱ्या अनेक संस्था आहेत, त्यांच्यापासून दूर राहिले पाहिजे. पोस्टर, पोएट्री व स्ट्रीटल्ये यांच्याकडे सहानुभूतीने पाहिजे ( श्री. श्री. भा. जोशी ) साहित्य न वाचता अभिप्राय देणारे प्राध्यापक खरे शत्रू आहेत, फॅशनेबल व टाळ समीक्षा लिहिणारे व लाचार लेखक हेच खरे मारेकरी आहेत (प्रा. शि. गो. देशपांडे ) स्वप्नरंजनात्मक लेखन करून पलायनवाद स्वीकारणारे लेखक, बांधिलकी न मानणारे साहित्यिक हे खरे शत्रू ( श्याम मानव ) समाजाभिमुख साहित्य निर्माण करणारा हा खरा मित्र ( श्री. अरुण साधू ) अशी विविध मते या परिसंवादात व्यक्त झाली. या परिसंवादाचा अध्यक्षीय समारोप अध्यक्षांच्या सूचनेवरून कवी अनिलांनी केला. नॅशनल बुक ट्रस्ट, साहित्य अकादमी हे मित्र, तर पुस्तक घेण्याची गरज असतानाही

तो न घेणारा प्राध्यापक हा शत्रू असे त्यांनी समारोप प्रसंगी सांगितले.

## मनोरंजन

सर्वश्री राम शेवाळकर, उल्हास मनोहर, वसंत सावंत, दत्ता हलसगीकर, सुभाष सावरकर, शि. गो. देशपांडे, श्रीपाद भालचंद्र जोशी, आ. रा. देशपांडे व कु. भाग्यश्री कावळे यांनी कविसंमेलन खूप गाजविले. याशिवाय सुरेश भट यांचा शेवाळकर संचलित 'रंग माझा वेगळा' हा व श्री. व. पु. काळे यांचे कथाकथन हे कार्यक्रम भरपूर मनोरंजन करून गेले.

## स्वातंत्र्याबद्दल जागरूकता हवी

"आपल्याला हवे असलेले ग्रंथ सक्तीने विकणे, स्वस्त विकणे, चांगले पण नको असलेले छापले जाणार नाही याची दक्षता घेणे यासाठी सर्वांनी जागृत राहिले पाहिजे. शासनाचा धिक्कार केला नाही तर शासन सरळ वागतेच असे नाही. असा अनुभव आहे. म्हणून स्वातंत्र्याबद्दलची उदासीनता आपण सोडली पाहिजे" असे कळकळीचे आवाहन समारोप प्रसंगी प्राचार्य नरहर कुरुंदकर यांनी केले.

## जमेची बाजू

अधिवेशनाचे अध्यक्ष प्राचार्य कुरुंदकर यांची अभ्यासपरिपूर्ण व प्रभावी भाषणे ही ग्रंथ व्यवहार परिषदेची जमेची मोठी बाजू. प्राचार्य राम शेवाळकरांची कुशल आणि डोळस आखणी ही दुसरी जमेची बाजू. ग्रंथ व्यवहाराशी संबंधित लोकांना उपयुक्त ठरणारी आणि त्याच्याशी संबंधित नसणारांना आनंद देणारी ही परिषद आयोजित केल्याबद्दल महाराष्ट्र साहित्य परिषद आणि प्रा. राम शेवाळकर धन्यवादास पात्र आहेत.

•

# त्रैवार्षिक कार्यवृत्तान्त

## ( १९७९-८२ )

---

परिषदेच्या सांप्रतच्या कार्यकारी मंडळाची मुदत येत्या ३१ मार्चला संपत आहे. नवे कार्यकारी मंडळ १ एप्रिल ८२ रोजी अस्तित्वात येईल. या निमित्ताने गेली तीन वर्षे ( एप्रिल १९७९ पासून ) कार्यकारी मंडळाने जे कार्य केले त्या कार्याचा एक संक्षिप्त वृत्तांत सभासदांपुढे ठेवणे उचित वाटते.

पहिली अभिमानाची व आनंदाची गोष्ट म्हणजे या तीन वर्षांत कार्यकारी मंडळाने एकजुटीने कार्य केले. किरकोळ वादविवाद झाले नाहीत असे नाही. पण संस्थेचे व्यापक हित ध्यानी घेऊन सर्वांनी अनाग्रही वृत्तीने वागून खेळीमेळीचे वातावरण सतत ठेवले. परिषदेची वाढलेली आजीव सभासदसंख्या, ग्रंथालयातील वाढते वाचक, परगावाहून येणाऱ्या व अतिथीभवनाचा लाभ घेणाऱ्या सभासदांचा वाढता संपर्क या सर्व गोष्टी या वातावरणामुळेच शक्य झाल्या.

लेखक, प्रकाशक, संपादक इत्यादी ग्रंथव्यवहाराशी संबंधित असणाऱ्या व्यक्तींचे तीन मेळावे आणि दिवाळी अंक स्पर्धा हे दोन नवे उपक्रम गेल्या तीन वर्षांत करण्यात आले. या मेळाव्यासाठी सर्व संबंधितांनी आपापल्या खर्चाने यावे व आपापल्या प्रश्नासंबंधी मुक्त चर्चा करावी असे प्रकट आवाहन करण्यात आले होते. लोणावळा, ठाणे आणि वणी ( यवतमाळ ) या तीन ठिकाणी हे मेळावे भरविण्यात आले होते. या मेळाव्यांना अपेक्षेइतकी उपस्थिती जरी नव्हती तरी ग्रंथव्यवहाराशी संबंधित असणाऱ्या अनेकांना एकत्रित आणण्याचे कार्य प्रथमच साधले गेले. शारदीय व्याख्यानमालेचा उपक्रम आधीच्या कार्यकारी मंडळाने सुरू केला होता. तो उपक्रम नवे व्याख्याते यांची योजना करून नेटाने पार पाडण्यात आला. इतर नित्याच्या कार्यक्रमात विपुलतेबरोबर विविधता राखण्याकडे विशेष लक्ष पुरविले गेले हे पत्रिका अंकातील ' परिषद वार्ता ' वरून सर्वांच्या ध्यानी येईल.

सभा, व्याख्याने, चर्चा, परिसंवाद या गोष्टी अटळ व उपयुक्त असल्या तरी त्यांचे महत्त्व तात्कालिक असते. अशा कार्यक्रमांपेक्षा काही भरीव व नित्योपयोगी कार्य साधण्याचाही यत्न केला.

बी. ए. एम्. ए पीएच.डी.चे विद्यार्थी आणि इतर होतकरू संशोधक यांचेसाठी ' भाषा व साहित्य : संशोधन ( संपादक डॉ. वसंत स. जोशी ) हा संशोधनशास्त्रासंबंधीचा अभिनव ग्रंथ प्रकाशित करण्यात आला. सा. सं. मंडळाने व पुणे विद्यापीठाने

प्रकाशनार्थ अनुदान दिल्यामुळे हा ६०० डेमी पृष्ठांचा ग्रंथ ३० रुपयांत वाचकांना उपलब्ध झाला आहे परिषदेने हाती घेतलेल्या वाङ्मयेतिहास योजनेतील तीन खंड यापूर्वी प्रकाशित झाले आहेत. इतर खंडांपैकी २ रा खंड (एकनाथ ते रामदास) डॉ. स. गं. मालशे यांनी पूर्ण केला असून तो प्रकाशित करण्याचा आमचा संकल्प होता. पण वर्षभर यत्न करूनही या खंडाच्या प्रकाशनार्थ मिळावयाचे अनुदान वेळेवर मिळू न शकल्यामुळे प्रकाशन लांबले याचे आम्हास दुःख आहे. वाङ्मयेतिहास-योजने-तील खंड ६ व ७ (१९२० ते १९८०) चे संपादन प्रा. गो. म. कुलकर्णी आणि डॉ. व. दि. कुलकर्णी या दोघा संपादकांवर दोन वर्षांपूर्वी सोपविण्यात आले. प्रस्तुत कालखंडातील वाङ्मयनिर्मिती ही संख्येच्या व विविधतेच्या दृष्टीने विपुल आणि बरीचशी गुंतागुंतीची असल्यामुळे, खंडाचे स्वरूप नि रूपरेषा आधी शास्त्रशुद्ध करावी असा संपादकांनी विचार केला व त्या दृष्टीने गाठीभेटी, पत्रव्यवहार, तज्ज्ञांची चर्चासत्रे इत्यादी मार्गांने ते सतत यत्नशील राहिले. त्यांची कार्यपद्धती ध्यानात घेता प्रस्तुत खंडास ते योग्य तो आकार देतील व परिषदेचे आणखी एक मौलिक प्रकाशन आगामी एकदोन वर्षांत वाचकांचे पदरी पडेल असा विश्वास वाटतो.

गेल्या तीन वर्षांत ठाणे, नेवासे, पिंपरी चिंचवड आणि खोपोली (रायगड) या चार ठिकाणी परिषदेच्या नवीन शाखासभा स्थापन करण्यात आल्या. या व इतर ७ शाखा कार्यान्वित आहेत म्हणून परिषदेचा वृक्ष पुण्याबाहेर सर्वदूर बहरत आहे. अहमद-नगर, सोलापूर, सांगली, सातारा, वाई, जळगाव आणि धुळे या इतर सात शाखांचे कार्य एकूण समाधानकारक चालू राहिले. परिषद आणि सर्व शाखा यांच्या संबंधात जवळीक उत्पन्न करण्याचा कार्यकारी मंडळाने हेतुपूर्वक यत्न केला व शाखांच्या पदाधिकाऱ्यांचे या कामी उत्तम सहकार्य लाभले.

परिषदेचे ' वा गो. आपटे संदर्भ ग्रंथालय ' वाचकांसाठी खुले करण्यात आले. अनामत रक्कम घेऊन सभासदांना (काही संदर्भात्मक व दुर्मिळ ग्रंथ सोडून) पुस्तके घरी देण्याचा उपक्रम यशस्वी ठरला. ग्रंथखरेदी, अभिप्रायार्थ भेटी आणि काही भेटी-दाखल दिलेले ग्रंथ यांमुळे ग्रंथालयातील संख्या १६२१ ची भर पडून आजमितीस सुमारे २०५०० झाली आहे. घरी नेऊन ग्रंथाभ्यास करणारांची संख्या ४०० आहे.

डॉ. आनंद यादव यांच्या संपादकत्वाने पत्रिकेचे गेल्या तीनएक वर्षांत दहा अंक प्रकाशित झाले. सभासदांनी सर्वसाधारणपणे अंकांचे स्वागत केल्याचे आढळून आले. ' ग्रामीण साहित्य ' विशेषांक गाजला, आणि उपयुक्तही ठरला. वाङ्मयीन नियत-कालिके चालविणे ही साहित्य संस्थांना आर्थिक दृष्ट्या न परवडणारी गोष्ट आहे. तथापि सभासदांचे सक्रिय सहकार्य आणि साहित्य संस्कृती मंडळाचे वार्षिक अनुदान यामुळे ' पत्रिके 'ची वाटचाल चालू आहे. ' पत्रिके ' द्वारे वाङ्मयप्रसार आणि सभासदांशी संपर्क या दोन्ही गोष्टी एकाच वेळी साधल्या जातात. व्यावसायिक दृष्टी

यात सुतराम नाही.

कार्यकारी मंडळाच्या मुदतीत संस्थेच्या अमृत महोत्सवाची पर्वणी आली. मे १९८१ अखेर अमृतमहोत्सवाचा मुख्य सोहळा दोन दिवस भरगच्च कार्यक्रम आखून साजरा करण्यात आला. या महोत्सवाच्या निमित्ताने साहित्यविषयक कार्य तीन अंगाने केले गेले. वाङ्मयेतिहासाला उपयुक्त ठरणारे तज्ज्ञ मंडळींचे एक चर्चासत्र दोन दिवस झाले. ग्रामीण विभागात साहित्य प्रसार करण्याच्या दृष्टीने शाखासभांच्या सहकार्याने ठिकठिकाणी व्याख्यानादी उपक्रम करण्यात आले. महोत्सवप्रसंगी 'अमृतशारदा' ( संपादक ग. वा. बेहेरे ) नामक एक नावीन्यपूर्ण व वाचनीय स्मरणिका प्रकाशित करण्यात आली. साहित्यसंस्थेला साजेल असेच या स्मरणिकेचे स्वरूप ठेवण्यात आले. दहा रु. मूल्य देऊन ही स्मरणिका सुमारे २०० व्यक्तींनी संग्रही बाळगली. महाराष्ट्र शासनाने वरील कामांसाठी अनुदान दिले होते. त्याचा योग्य तो विनियोग करण्यात आला.

कार्यकारी मंडळाच्या कालावधीत वार्धा, अकोला व रायपूर या ठिकाणी तीन अ. भा. मराठी साहित्य संमेलने भरली. या तिन्ही संमेलनांच्या कामकाजात कार्यकारी मंडळाने आत्मीयतेने भाग घेतला; किंबहुना संमेलनांचे संयोजन करणारे 'मराठी साहित्य महामंडळ' या मध्यवर्ती संस्थेचे कार्य अधिक लोकाभिमुख व साहित्यामुख करण्याचाही यथाशक्ती यत्न केला. ज्या ठरावांमुळे ही तीन संमेलने गाजली ते ठराव परिषदेचे होते ही गोष्ट अभिमानाने नमूद करावीशी वाटते. मंत्र्यांची उपस्थिती आणि शासनाचा हस्तक्षेप या दोन प्रश्नांसंबंधी परिषदेने साहित्य जगताच्या प्रतिक्रिया आपल्यापरी व्यक्त करण्यास कुचराई केली नाही. शासन आणि साहित्य संस्था यांच्यातील दरी कमी करणे, तसेच संस्थेच्या स्वायत्ततेला बाध न येऊ देता शासनाचा साहित्याच्या एकूण व्यवहारात अधिकाधिक उपयोग करून घेणे एवढेच यामागे उद्दिष्ट होते. शासनाशी परिषदेचा ( किंवा इतर साहित्य संस्थांचा ) नित्याचा भांडण तंटा कधीच नव्हता व नाही. शासनाच्या काही निर्णयांमुळे असंतोष उत्पन्न होत गेला तेवढ्यापुरत्या प्रतिक्रिया व्यक्त केल्या. लोकशाही युगात हे सारे अटळ व अंती हितावह असते.

कार्यकारी मंडळाने कारभार हाती घेतला तेव्हापासून गेल्या अडीचतीन वर्षांत सुमारे २०० नवे आजीव सभासद केले गेले. हे सभासद महाराष्ट्र व बृहन्महाराष्ट्रातील सर्व विभागातले व सामाजिक स्तरातले आहेत हे आवर्जून सांगावेसे वाटते. आजीव सभासद वाढीमुळे संस्थेचा स्थिरनिधी वाढतो, व्याजरूपाने वार्षिक उत्पन्न वाढते आणि पर्यायाने संस्था आर्थिक दृष्ट्या अधिकाधिक स्वावलंबी होते. गेल्या तीन वर्षांत कार्यकारी मंडळाने स्थिरनिधीत ४० हजार रु.ची भर घातली. याशिवाय विशिष्ट कार्यक्रमांसाठी म्हणून २५ हजार रु. राखीव निधीही वाढविला. या दोन्ही निधींत

लक्षणीय भर पडल्यामुळे कार्यक्रमांची संख्या नि गुणवत्ताही वाढविता आली.

या कालावधीत परिषदेचे अध्यक्ष प्रा. वसंत कानेटकर यांनी अनेक वेळी उपस्थित राहून, तसेच पुण्यात व इतरत्र व्याख्याने देऊन अध्यक्ष ही केवळ मानाची व शोभादायक जागा नाही हे दर्शविले. कार्याध्यक्ष डॉ. वि. रा. करंदीकर यांनी कार्यकारी मंडळास वेळोवेळी उचित मार्गदर्शन करून संस्थेची प्रतिष्ठा राखली. परिषदेच्या तिन्ही विश्वस्तांनी कार्यकारी मंडळाला सहकार्य देऊन असेच प्रोत्साहित केले. कार्यकारी मंडळ, विशेषतः परगावचे सभासद आणि स्थानिक पदाधिकारी यांच्यात समजूतदारपणा आणि सहकार्याची भावना होती म्हणून संस्थेचा कारभार निष्कलंक, क्रियात्मक व चैतन्यशील राहिला. यश आणि अपयश या दोन्हींचे उत्तरदायित्व सामूहिकरित्या कार्यकारी मंडळाकडे जाते. त्यामुळे व्यक्तिगत ऋणनिर्देश इथे टाळले आहेत. पगारी निष्ठावान सेवकांव्यतिरिक्त परिषदेचे कार्य सर्वांनी निरपेक्ष सेवावृत्तीने जमेल तेवढे आणि प्रामाणिकपणे केले आहे. ते करीत असता सूपभर साधले, ओंजळ दोन ओंजळ सांडले तर त्याबद्दल खंत बाळगण्याचे फारसे कारण नाही. आपापले व्यवसाय सांभाळून सार्वजनिक कार्य करणे ही कठीण गोष्ट आहे. ती सर्वांना सारख्याच उत्कटतेने जमते असे नाही.

शेवटी नव्या कार्यकारी मंडळास आमच्या सदिच्छा व सहकार्य नेहमी लाभेल एवढे आश्वासन देऊन हा वृत्तांत आटोपता घेतो.

**पु. शं. पतके**
कोषाध्यक्ष

**म. श्री. दीक्षित**
**न. म. जोशी**
**द. ता. भोसले**
कार्यवाह

अनुक्रमणिका

## भाषा व साहित्यसंशोधन

संपादक : डॉ. वसंत स. जोशी

पृष्ठे : डेमी अंदाजे ६०० मूल्य : ३० रुपये

### या ग्रंथात

विषय परिचय ( व. स. जोशी ), संशोधन : स्वरूप आणि पद्धती ( व. दि. कुलकर्णी ), भाषावैज्ञानिक संशोधनाच्या नव्या दिशा ( अशोक रा. केळकर ), बोलीभाषांचा अभ्यास ( सु. बा. कुलकर्णी ), अभिलेखागारे ( ग. ह. खरे ), ऐति० कागदपत्रे : संशोधन संपादन (गो. त्र्यं. कुलकर्णी), प्राचीन हस्तलिखित आणि त्यांचे जतन ( यू. म. पठाण ), वृत्तपत्रे आणि संशोधन ( स. गं. मालशे ), लेखविद्या ( सौ. शोभना गोखले ), महानुभावांच्या सांकेतिका लिप्या : निर्मितिमीमांसा ( यू. म. पठाण ), पाठचिकित्सा ( वि. भि. कोलते ), पाठचिकित्साविषयक परिभाषा ( वेंकटशास्त्री जोशी ), कालनिर्णय पद्धती ( ग. ह. खरे ), संहितेचा संख्याशास्त्रीय अभ्यास ( सु. ग. प्रभुगावकर ), भाषा आणि साहित्य ( अशोक रा. केळकर ), साहित्यसमीक्षा आणि संशोधन ( द. का. संत ), संशोधनातील तीन प्रारंभिक प्रक्रिया ( स. गं. मालशे ), विशिष्ट साहित्यकृतीचा अभ्यास ( व. दि. कु. ), विशिष्ट ग्रंथकाराचा अभ्यास (प्र. ल. गावडे), तत्त्वविज्ञानविचार आणि मराठी संशोधन ( वि. रा. करंदीकर), तौलनिक वाङ्मय काही विचार ( पंडित आवळीकर ), विशिष्ट कालखंडाचा अभ्यास ( गो. म. कुलकर्णी ), वाङ्मयेतिहास लेखन : काही विचार ( रा. श्री. जोग ), विद्यापीठीय प्रबंधलेखन ( हे. वि. इनामदार ), कोशरचना आणि मराठी वाङ्मय ( सु. रा. चुनेकर, ग्रंथालयीन संदर्भसाहाय्य ( म. प. पेठे ), वर्णानुक्रमपद्धती ( आनुपूर्वी ) : मो. रा. वाळंबे, अभ्यासक संशोधनासाठी मार्गदर्शक संदर्भसूची : (अशोक केळकर) विद्यापीठीय स्तरावरील मराठी संशोधन ( म. प. पेठे ), याशिवाय उपयुक्त परिशिष्टे, विस्तृत सूची इत्यादी.

कार्यवाह : म. सा. परिषद्, टिळक रस्ता, पुणे ३०

## महाराष्ट्र-साहित्य-परिषदेची मौलिक प्रकाशने

(क्र. १ ते ३, कमिशन १५%)

| | रु. पैसे |
|---|---|
| १. मराठी वाङ्मयाचा इतिहास : संपादक : प्रा. ग. श्री. जोग | |
| खंड ३ (१६८०–१८००) | ३०·०० |
| खंड ४ (१८००–१८७४) | ३०·०० |
| खंड ५ (दोन भागांत, १८७५–१९२०) | ५५·०० |
| २. म. सा. संमेलन : अध्यक्षीय भाषणे : संपादक : डॉ. भीमराव कुलकर्णी | |
| खंड १ (१८७८–१९४२) : प्रती शिल्लक नाहीत. | १०·०० |
| खंड २ (१९४३–१९६४) : प्रती शिल्लक नाहीत. | १०·०० |
| खंड ३ (१९६५–१९५९) | ३·०० |
| ३. भाषा : अंतसूत्र आणि व्यवहार : संपादक : डॉ. मु. ग. पानसे | ६·०० |

### सवलतीच्या दराची प्रकाशने

(खालील) ४०% कमिशन, टपालखर्च वेगळ.

| | |
|---|---|
| १. संस्कृत नाट्यादर्श : डॉ. के. ना. वाटवे | १२·०० |
| २. द्रौपदीस्वयंवर : अज्ञात मुसलमान कवी, संपादक : डॉ. वा. दा. गोखले | ५·०० |
| ३. शास्त्रीय परिभाषा कोश : संपादक : आपटे–जोशी | ६·०० |
| ४. म. सा. परिषदेचा इतिहास : लेखक : म. द. वा. पोतदार व श्री. श्री. दां नवरे | ७·०० |
| ५. म. सा. पत्रिका : लेखसूची | ५·०० |
| ६. महाराष्ट्र : एक अभ्यास : डॉ. इरावती कर्वे | १·०० |
| ७. खाडिलकरांचा विनोद : डॉ. गो. के. भट | १·५० |
| ८. श्रीवनभुवनी : प्रा. म. वा. धोंड | १·७० |
| ९. शरच्चंद्र : एक दर्शन : संपादक : डॉ. हेमंत इनामदार | ५·०० |

पत्रव्यवहार : कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य-परिषद
टिळकरस्ता, पुणे ४११०३०

